# THEOLOGICAL CLASS BOOK.

# ईश्वरविद्या.





PUBLISHED BY THE AMERICAN MISSION.



मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.

सन १८५७.

# अनुक्रमणिका.

प्रकरणें. पृष्ट.

# प्रस्तावना.

ईश्वर विद्येचें ज्ञान होण्याचीं मुख्य साधनें सृष्टि आणि ईश्वरी शास्त्र हीं दोनच आहेत. ह्मणून सृष्टींतील पदार्थमात्रांची उत्पत्ति स्थिति आणि व्यवस्था, जी ईश्वराने केली आहे आणि त्यांमध्यें जी ईश्वरसत्ता चालू आहे, त्याविषयीं सुप्रकाशित बुद्धि आणि विवेक यांच्या योगाने विचार करण्यावरून ईश्वराचें अस्तित्व, गुण आणि स्वभाव यांविषयीं, व मनुष्यांचा ईश्वरासीं व एकमेकासीं जो संबंध आहे, त्याविषयीं ज्ञान झाल्याने धर्माचीं जीं तत्वें कळूं येतात, ह्मणजे ईश्वराविषयीं, आपणाविषयीं आणि एकमेकांविषयीं जीं कर्त्तव्यकर्मै पूर्ण करणें मनुष्याचा अवश्य धर्म आहे ह्मणून समजतें, त्यास सृष्टिजन्य ईश्वरविद्या ह्मणतात. आणि सदहू गोष्टींविषयीं ईश्वरी शास्त्रावरून जें ज्ञान होतें, त्यास शास्त्रोक्त ईश्वरविद्या ह्मणतात. या दोन्ही प्रकारचें ईश्वरविद्येचें कथन प्रथम विभागेंकरून करावें हें योग्य आहे. परंतु ग्रंथविस्तार न होतां अभ्यास करणारांस सुलभ व सुबोध्य व्हावें, ह्मणून या ग्रंथामध्यें ईश्वरविद्येच्या सिद्धांताचे आधार आणि प्रमाणें सृष्टिजन्यज्ञानावरून आणि शास्त्रोक्त ज्ञानावरून जीं मिळतात, तीं दोन्ही एकदम दाखवून हरएक सिद्धांताचा उलगडा केला आहे. आणि शास्त्राधार दाखविते वेळेस शास्त्रांतील वाक्यें उतरून न घेतां केवळ त्या वाक्यांचें ठिकाण मात्र दाखविलें आहे. आणि या ग्रंथांतील सिद्धांताचें ज्ञान अभ्यास करणारांस स्पष्टपणें व सुलभ रीतीने व्हावें व सिद्धांताचा अभिप्राय ध्यानांत धरण्यास सोपें पडावें ह्मणून हा सर्व ग्रंथ प्रश्नोत्तररूपाने रचिला आहे.

# ईश्वरी विद्या.

## प्रकरण १.

## ईश्वराचें अस्तित्व.

---

**प्रश्न १.** ईश्वर ह्मणजे काय?

**उत्तर.** जो स्वतां सनातन असतां सर्व जें कांहीं वस्तुतः आहे त्याचा कर्त्ता आणि नियंता आहे, आणि ज्याच्या ठायीं अत्यंत पूर्णता आहे, त्यास ईश्वर ह्मणावें.

**प्र० २.** ईश्वर आहे हें कशावरून सिद्ध होतें?

**उ०** सृष्टींतील वस्तुमात्रांवरून आणि ईश्वरी शास्त्रांतील बोधावरून सिद्ध होतें. इब्री. ३:४. गीतें. १९:१–३. रो० १:१९,२०.

**प्र० ३.** सृष्टींतील वस्तुमात्रांवरून ईश्वराचें अस्तित्व कसें सिद्ध होतें?

**उ०** दोन प्रकारें होतें. (१) या सृष्टींतील वस्तुमात्रांस विकार, ह्मणजे पालट, नेहमी होत असतो ह्मणून त्या अनादि ह्मणजे अनुत्पन्न नव्हत. कारण जें कांहीं अनादि आहे त्याला वृद्धि अथवा क्षय आणि नासणें किंवा सुधरणें यांची अगदी संभावना नसतां, तें सर्वदां अपालट आहे. परंतु या सृष्टींतील वस्तुमात्रांस पालट आहे; ह्मणून त्या अनादि नसतां उत्पन्न झालेल्या आहेत. आतां जसें कित्येक कल्पितात, त्याप्रमाणें या सृष्टीनें आपण आपणास उत्पन्न केलें असें ह्मणावें, तर ती उत्पन्न झाल्यापूर्वीं तिच्या

ठायीं कर्तृत्व होतें, ह्मणजे कार्यच आपल्या उत्पत्तीचें कारण आहे, असें होईल. परंतु कार्य आपल्या उत्पत्तीचें कारक असणें अगदीं असंभाव्य आहे. आणि जसें कित्येक ह्मणतात तसें, ही सृष्टि आपोआप ह्मणजे सहजगतीनें उत्पन्न झाली असें ह्मणावें तर नास्तित्वापासून अस्तित्व आपोआप होतें, ह्मणजे कर्त्यावांचून कार्य होतें, असें होईल. परंतु नास्तित्वापासून अस्तित्व आपोआप होणें हेंहि अगदीं असंभाव्य आहे. तथापि ही सृष्टि उत्पन्न झालेली आहे, असें पूर्वीं ठरलेलें आहे. यास्तव ज्यापेक्षां या सृष्टीनें आपण आपणास निर्माण केलें असें ह्मणतां येत नाहीं, आणि ही सहजगतीनें आपोआप झाली असेंहि ह्मणतां येत नाहीं, त्यापेक्षां इजहून अन्य अशा कोणी तरी कर्त्यानें ही निर्माण केली आहे, असें समजणें अवश्य आहे. आणि त्याच कर्त्याला ईश्वर ह्मटलें आहे. (२) अणखी या सृष्टींतील वस्तुमात्रांमध्यें जो उद्देश दिसून येतो त्यावरूनहि ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होतें. कारण कीं या सृष्टीची मूळरचना व इजमध्यें घडणारे कार्यांचा नियमितपणा व सुमेळ व इजमधील वस्तुमात्रांची व्यवस्था हीं जीं असाधारण सत्तेनें झालीं व होत आहेत, त्या सर्वांमध्यें अपार ज्ञानाचा आणि अत्यंत चातुर्याचा उद्देश दिसून येतो. आणि उद्देशकावांचून उद्देश होऊं शकत नाहीं. यास्तव या सर्वांचा उद्देशक आहे, आणि त्यालाच ईश्वर ह्मटलें आहे. याप्रमाणें सृष्टींतील वस्तुमात्रांवरून ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होतें.

प्र० ४. ईश्वर आहे असा विश्वास धरणें सर्व मनुष्यांस अवश्य आहे काय?

उ० होय, कारण कीं ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं, सृष्टींतील वस्तुमात्रांवरून असें निभ्रांत प्रमाण पटतें कीं, ईश्वर नाहीं असें समजण्याची यत्किंचितहि जागा राहत नाहीं. ह्मणून ईश्वर आहे असा विश्वास धरणें हें मनुष्यांचें अवश्य काम आहे. आणि जे कोणी नास्तिक मत धरितात, ह्मणजे ईश्वर नाहीं असा विश्वास धरितात ते ईश्वराच्या अस्तित्वाचीं निःसंशय प्रमाणें बुध्या दृष्टीआड करून केवळ दुष्ट बुद्धीनें तसें मत धरितात असें समजावें. रोम. १:२०,२१.

प्र० ५. ईश्वर नसेल असी कल्पना करण्याची आवड मनुष्यांस जन्मस्वभावेंकरून आहे कीं काय?

उ० होय, कदाचित् ईश्वर नसेल असी कल्पना करून आपणास फसवावें असा मनुष्याच्या बुद्धीचा कल जन्मस्वभावानें आहे. हें आपल्या अनुभवावरून आणि दुसऱ्यांच्या साक्षीवरून उघड दिसतें. रोम. १:२८. गीतें ८२:५. इयो. २१:१४,१५.

प्र० ६. ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं अविश्वासी होण्याचा जो बुद्धीचा कल मनुष्यांस स्वभावेंकरून आहे, त्याचें कारण काय?

उ० मनुष्यें जन्मस्वभावाचीं भ्रष्ट व पापिष्ट असतां त्यांस पाप करण्याची गोडी आहे. यास्तव आपला हिशेब घेऊन प्रतिफळ देईल असा पवित्र व सर्व समर्थ प्रभु ईश्वर

आहे, असा विश्वास धरण्याने जें भय व दुःख होतें तें न व्हावें ह्मणून ते ईश्वर नाहीं असें मत धरीत असतात. गीतें १४:१.—१०:४.

प्र० ७. ईश्वर आहे असा विश्वास धरणें हा धर्माचा पाया आहे कीं काय?

उ० होय, असा विश्वास धरणें हा धर्माचा पाया आणि मूळतत्वच आहे. इब्री. ११:६.

प्र० ८. सर्व सृष्टीचा कर्त्ता व नियंता जो ईश्वर तो एक आहे किंवा अनेक आहेत?

उ० सर्व सृष्टीचा कर्त्ता व नियंता जो ईश्वर तो एकच आहे. याचें पहिलें प्रमाण हें आहे कीं, ह्या सर्व सृष्टीची उत्पत्ति रचना व व्यवस्था हीं पाहिलीं असतां एकाच नियंत्याच्या हातचीं आहेत असें दिसतें. दुसरें, ईश्वराच्या ठायीं जे परिपूर्ण गुण आहेत ह्मणून सर्व लोक कबूल आहेत. त्यांवरून पाहतां एकाहून अधिक ईश्वर असणें असंभाव्य दिसतें; ह्मणजे जर ईश्वर सर्वांहून श्रेष्ठ आहे तर तो एकच असावा. कारण सर्वांहून श्रेष्ठ असा एकाहून अधिक असणें असंभाव्य आहे. अणखी जर एक ईश्वर सर्वव्यापी आहे तर दुसरा राहील कोठें? तसेंच जर एक ईश्वर सर्वसमर्थ सर्वज्ञानी, इत्यादि गुणांचा आहे तर दुसऱ्याची गरज काय? तिसरें, अणखी जे दोन किंवा अनेक देव मानितात तेहि कबूल आहेत कीं, सर्वांहून चांगला व सर्वांहून श्रेष्ठ असा एकच ईश्वर आहे. तथापि मनुष्यांहून श्रेष्ठ आणि ईश्वराहून हलकीं असीं दुसरीं बहुत क्षुद्र दैवतें आहेत असें त्यांचें जें मत आहे तें अगदीं अयुक्तिक आहे. कारण ज्याच्या ठायीं कोणत्याहि प्रका-

रचें उणेपण आहे, ह्मणजे सामर्थ्य, ज्ञान, पवित्रता इ० गुणांची पूर्णता ज्यामध्यें नाहीं व ज्यांस दुसऱ्या प्राण्यासारिखे विकार आहेत त्यांस ईश्वर ह्मणणें शोभत नाहीं. कारण जो सनातन सर्वसंपत्तिवान आणि पूर्ण चांगुलपणाचा आहे त्यावांचून दुसऱ्या कोणास ईश्वर ही संज्ञा शोभत नाहीं.

प्र० ९. सृष्टि आणि ईश्वर हीं अद्वैत आहेत असें समजणें योग्य आहे कीं काय?

उ० नाहीं. असें समजणें अगदीं अयोग्य आहे. कारण पहिलें, ईश्वर अनादि व निर्विकार आहे, परंतु सृष्टि ही उत्पन्न झालेली आणि विकारयुक्त आहे. यास्तव ईश्वर आणि सृष्टि हीं अद्वैत आहेत असें ह्मणण्याने ईश्वर सादी व सांत आणि विकारयुक्त आहे असें ठरेल. परंतु ईश्वर सादी, सांत व विकारयुक्त आहे असें कोणी ह्मणूं शकत नाहीं. यास्तव तो सृष्टीपासून भिन्न आहे असें सिद्ध होतें. दुसरें, कर्त्ता व कार्य हीं नेहमी भिन्न असतात. आतां सृष्टि हें कार्य आहे, आणि ईश्वर हा कर्त्ता आहे. हा कर्त्ता सनातन काळापासून आहे. परंतु सृष्टि ही काळाच्या मर्यादेंत उत्पन्न झालेलें कार्य असी आहे. यास्तव जसें घड्याळ व घड्याळ करणारा हीं अद्वैत नाहींत, तसा ईश्वर व सृष्टि हीं अद्वैत नाहींत. तिसरें, सृष्टींतील अनात्मिक पदार्थांस जडत्व व ज्ञानशून्यता आहे, असें असतां ते ईश्वरासीं अद्वैत किंवा ईश्वराचा अंश आहेत असें ह्मटल्यास ईश्वर जड निर्जीव व ज्ञानशून्य आहे असें ह्मणावें लागेल. चवथें, सृष्टींतील आत्मिक व सबुद्ध प्राण्यांमध्यें अज्ञान, मूढता, कुबुद्धि, दुष्कर्म हीं आहेत.

असें असतां ते ईश्वराचे अंश आहेत असें ह्मटल्यास ईश्वराहि अज्ञानी, मूढ, दुर्बुद्धि आणि दुष्कर्मी आहे असें समजावें लागेल. परंतु ईश्वर तर नित्य सर्वज्ञानी सूज्ञ पवित्र आणि सत्कर्मी आहे. यास्तव तो सृष्टीहून भिन्न आहे असें समजणें अवश्य आहे.

---

## प्रकरण २.

## पवित्र शास्त्र.

प्र० १. पवित्र शास्त्र ह्मणजे काय?

उ० जे शास्त्रग्रंथ ईश्वराने आपल्या आत्म्याच्या प्रेरणेने आपल्या भक्तांकडून लिहविले आहेत ते; ह्मणजे ख्रिस्ती शास्त्रांतील जुना व नवा करार यांतील सर्व ग्रंथ यांस पवित्र शास्त्र ह्मटलें आहे. इब्री. १:१,२. तिम. ३:१६.

प्र० २. पवित्र शास्त्राचा प्रथम भाग जो जुना करार ह्मटलेला आहे त्यांत कोणकोणते ग्रंथ आहेत?

उ० १ उत्पत्ति. २ निर्गम. ३ लेवीय. ४ गणना. ५ अनुवाद. ६ यहोशवा यांचें पुस्तक. ७ न्यायाधीश यांचें पुस्तक. ८ रूथ हिचें पुस्तक. ९ शमुवेलाचें पहिलें पुस्तक. १० शमुवेलाचें दुसरें पुस्तक. ११ राजे यांचें पहिलें पुस्तक. १२ राजे यांचें दुसरें पुस्तक. १३ कालवृत्तांत याचें पहिलें पुस्तक. १४ कालवृत्तांत याचें दुसरें पुस्तक. १५ इज्रा. १६ नेहेम्या. १७ एस्तेर इचें पुस्तक. १८ ईयोब याचें पुस्तक. १९ गीतांचें पुस्तक. २० नीति. २१ उपदेशक. २२ शलमोनाचें गीत. २३ यशायाचा भविष्यवाद. २४ इर्मयाचा भविष्यवाद. २५ इर्मयाचा विलाप.

२६ यहेज्केलाचा भविष्यवाद. २७ दानियलाचें पुस्तक. २८ होशेहा. २९ योएल. ३० आमोस. ३१ ओबद्या. ३२ योना. ३३ मीखा. ३४ नहूम. ३५ हबाकुक. ३६ जफान्या. ३७ हग्गाई. ३८ जखार्या. ३९ मलाखी. हे एकूनचाळीस ग्रंथ आहेत.

प्र० ३. पवित्र शास्त्राचा दुसरा भाग जो नवा करार ह्मटलेला आहे, त्यांत कोणकोणते ग्रंथ आहेत ?

उ० १ मात्थीचें शुभवर्त्तमान. २ मार्कसाचें शुभवर्त्तमान. ३ लूकाचें शुभवर्त्तमान. ४ योहान्नाचें शुभवर्त्तमान. ५ प्रेषितांचीं कृत्यें. ६ रोमेकरांस पौलसाचें पत्र. ७ करिंथकरांस पौलसाचें पहिलें पत्र. ८ करिंथकरांस पौलसाचें दुसरें पत्र. ९ गलती यांस पौलसाचें पत्र. १० एफससकरांस पौलसाचें पत्र. ११ फिलिप्पैकरांस पौलसाचें पत्र. १२ कलस्सैकरांस पौलसाचें पत्र. १३ थेस्सलनिकेकरांस पौलसाचें पहिलें पत्र. १४ थेस्सलनिकेकरांस पौलसाचें दुसरें पत्र. १५ तीमथ्यसाला पौलसाचें पहिलें पत्र. १६ तीमथ्यसाला पौलसाचें दुसरें पत्र. १७ तितसाला पौलसाचें पत्र. १८ फिलेमोनाला पौलसाचें पत्र. १९ इब्री यांस पत्र. २० याकोबाचें पत्र. २१ पेत्रसाचें पहिलें पत्र. २२ पेत्रसाचें दुसरें पत्र. २३ योहान्नाचें पहिलें पत्र. २४ योहान्नाचें दुसरें पत्र. २५ योहान्नाचें तिसरें पत्र. २६ यहूदाचें पत्र. २७ प्रगटाविणें. हे सत्तावीस ग्रंथ आहेत.

प्र० ४. अपाक्रिफा ह्मटलेले ग्रंथ जे कोणी कोणी जुने कराराच्या पुस्तकांस जोडतात, ते ईश्वरप्रणीत ग्रंथ आहेत कीं काय ?

उ० ते ग्रंथ ईश्वरप्रणीत आहेत याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. परंतु ते ईश्वरप्रणीत नाहींत याविषयीं बहुत प्रमाणें आहेत. त्यांतील पहिलें हें आहे कीं, त्या ग्रंथांचे कर्त्ते आपण हे ग्रंथ ईश्वरप्रेरणेने लिहिले असें ह्मणत नाहींत. दुसरें हें आहे कीं, त्या ग्रंथांचा परस्परांसीं किंवा पवित्र शास्त्रांतील ग्रंथांसीं सर्व प्रकारें मेळ पडत नाहीं. तिसरें हें आहे कीं, यहूदी लोकानी या ग्रंथांस ईश्वरप्रणीत असें कधीं मानलें नाहीं. कारण कीं मलाखी जो शेवटला भविष्यवादी आहे त्याच्या वेळेपासून ईश्वरी शास्त्र लिहिणें बंद झालें असें ते समजत होते, आणि हे ग्रंथ तर मलाखीच्या काळानंतर झाले आहेत. चवथें हें आहे कीं, येशू ख्रीस्त व प्रेषीत हे त्या ग्रंथांतील एकाहि वाक्याचा उपन्यास आपल्या ग्रंथांत करीत नाहींत. पांचवें असें आहे कीं, प्राचीन काळचे ख्रिस्ती मंडळ्यानी त्या ग्रंथांस ईश्वरप्रणीत असें कधीं मानिलें नाहीं.

**प्र० ५.** तर अपाक्रिफा ह्मटलेल्या ग्रंथांस आह्मी कसें मानावें ?

उ० ते केवळ मानवी ग्रंथ असतां, इतर इतिहासादि ग्रंथांतील गोष्टी समजण्यास जशा उपयोगी आहेत तसेंच या ग्रंथांतील गोष्टीविषयींहि समजावें.

**प्र० ६.** पवित्र शास्त्रांतील ग्रंथ मुळीं कोणत्या भाषांमध्यें लिहिले ?

उ० जुन्या करारांतील ग्रंथ इब्री भाषेमध्यें आणि नव्या करारांतील ग्रंथ ग्रीक भाषेमध्यें लिहिले.

**प्र० ७.** सेपत्युएजंट ह्मणजे काय ?

उ० जुन्या कराराच्या पुस्तकांचा मूळ इब्री भाषेंतून

ग्रीक भाषेमध्यें जो तर्जुमा सुमारें सत्तर मनुष्यानी मिळून केला त्यांस सेपट्युएजंट ह्मणतात. येशू ख्रीस्ताच्या अगोदर सुमारें १५० वर्षें हा तरजुमा समाप्त झाला होता.

प्र० ८. पवित्र शास्त्राचें हल्लीं चालू जें इंग्लीश भाषांतर आहे तें केव्हां झालें ?

उ० सुमारें अडीच शे वर्षांमागें पहिला जेम्स नामक इंग्लंड देशाचा राजा याच्या कारकिर्दींत झालें. त्याने या कामावर आपल्या देशांतील सर्वांहून विद्वान मनुष्यांतले चौपन मनुष्यांस नेमलें. त्यांतून केवळ सत्तेचाळीस जणानी तें काम हातीं धरलें, आणि सुमारें साहा वर्षांमध्यें त्यानी हें भाषांतर तयार करून सन १६१३ मध्यें छापिलें. त्याच्या अगोदर इंग्लीश भाषेंत दोन चार तर्जुमे झाले होते ते लक्षून हा झाला.

प्र० ९. या पवित्र शास्त्राचा तर्जुमा दुसऱ्या किती भाषांमध्यें झाला आहे ?

उ० हल्लीं या शास्त्राचा तर्जुमा प्राचीन आणि अर्वाचीन मिळून सुमारें दोन शे साठ वेगळाल्या भाषांमध्यें झाला आहे. आणि पुढें थोड्याच काळाने जगांतील सर्व भाषांमध्यें होईल असा भरवसा आहे.

प्र० १०. ईश्वराने आपल्या प्रेरणेने लिहविलेलें धर्मशास्त्र मनुष्यांस द्यावें याचें अगत्य आहे कीं काय ?

उ० होय. मनुष्यांस त्यांचें मरणोत्तर स्थितीविषयीं निश्चित ज्ञान व्हावें, ईश्वराचे गुण त्यांस स्पष्टपणें समजावे, त्याचीं कर्त्तव्य कर्मै कोणतीं व कशीं आहेत हें त्यांस पुरतेपणीं समजावें, आणि तीं कर्त्तव्य कर्मै पाळण्याचीं पुरतीं उत्तेजनें त्यांस व्हावीं, आणि मुख्यत्वेंकरून त्यांस

तारणोपायाचें निभ्रांत ज्ञान व्हावें ह्मणून ईश्वराने मनुष्यांस आपल्या प्रेरणेने लिहिलेलें शास्त्र द्यावें याचें फार अगत्य आहे. २ तिम. १:१०. ३:१६,१७. २ करिं.५:१४, १५. इब्री. ११:२६. लूका. २:१०,११.

प्र० ११. शास्त्रदानाविषयींची ईश्वरी प्रेरणा ह्मणजे काय?

उ० पवित्र शास्त्राच्या ग्रंथांत काय, कसें आणि केव्हां लिहावें याचें ज्ञान प्राप्त करून देण्यासाठीं ईश्वराने आपल्या आत्म्याची जी सूचना शास्त्रग्रंथांच्या कर्त्यांस दिल्ही, तिला शास्त्रदानाविषयींची ईश्वरी प्रेरणा ह्मटलें आहे.

प्र० १२. पवित्रशास्त्राच्या कर्त्यांस ते ग्रंथ लिहिण्यासाठीं सदरहु प्रकारची ईश्वरी प्रेरणा मिळाली होती याचें काय प्रमाण?

उ० त्यांस असी प्रेरणा मिळाली होती याचें एक विशेष प्रमाण असें आहे कीं, हे ग्रंथ लिहिण्यासाठीं आपणांस ईश्वरी प्रेरणा मिळाली, असी पक्की खातरी असल्यावांचून त्यांच्याने आपण हे ग्रंथ ईश्वरी प्रेरणेने लिहिले आहेत, असें प्रसिद्ध करवतेना. आणि आपण हे ग्रंथ ईश्वरी प्रेरणेने लिहिले आहेत असी खातरी तर त्यांस तसी प्रेरणा खरोखर मिळाली असल्यावांचून त्यांस होऊं शकतीना. यास्तव हे ग्रंथ आह्मी ईश्वरी प्रेरणेने लिहिले आहेत असें पवित्र शास्त्रकर्त्यांनी निर्धाररूपें जें ह्मटलें आहे त्यावरून असें अनुमान होतें कीं त्यांस ईश्वरी प्रेरणा मिळाली असावी. आणि दुसरें प्रमाण असें आहे कीं, ईश्वर, येशू ख्रीस्त, दूत, मनुष्य, काळ, अनंतकाळ, आकाश लोक आणि नरक लोक इ० गोष्टींविषयीं त्यानी जें कांहीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे, तें त्यांस ईश्वरी प्रेरणा मिळाली

असल्यावांचून त्यांस लिहितां आलें नसतें. २ तिम. ३:१६. २ पेत्र. १:२०, २१. १ करिं. २:१३. गलती. १:११, १२. प्रग. १:१,२.

**प्र० १३.** पवित्र शास्त्र ईश्वरी प्रेरणेनें लिहिलेलें आहे असें ह्मणण्यावरून त्या शास्त्रांत जें कांहीं लिहिलें आहे तें सर्व ईश्वर आपणच बोलला किंवा ईश्वराने आपण स्वतां केलें असें समजावें कीं काय?

उ० असें अगदीं नाहीं. कारण कीं त्यांत लिहिलेलीं बहुत बोलणीं व करणीं सैतानाचीं आणि दुष्ट माणसांचीं आहेत. परिक्षिक जो सैतान त्याने आमचें मूळ आईबापांस जें कांहीं सांगितलें तें लबाडीने सांगितलें; इयोबाचे तिघे मित्र देवाविषयीं जें खरें नव्हतें तें बोलले; चांगले मनुष्यानी धरलेलीं अयोग्य मतें व केलेलीं अयोग्य कर्मेंहि शास्त्रांत लिहिलीं आहेत. यास्तव शास्त्रग्रंथांतील संबंधावरून उघड दिसतें त्याप्रमाणें त्यांतील बोलणीं व करणीं कोणाचीं आहेत हें आह्मी समजावें; ह्मणजे मागील पुढील अन्वय आणि संबंध पाहून जीं बोलणीं व करणीं ईश्वराचीं आहेत असें दिसेल, तींच ईश्वरास लावावीं; आणि जीं इतर प्राण्यांचीं आहेत तीं इतर प्राण्यांस लावावीं. आणि जें कांहीं शास्त्रांत लिहिलें आहे तें आमच्या बोधासाठीं लिहिलें आहे असें समजावें. उत्प. ३:२-५. इयो. ४२:८ ९. २ तिम. ३:१६.

**प्र० १४.** ख्रिस्ती शास्त्र ज्याला पवित्र शास्त्र असें ह्मटलें आहे, तें ईश्वरप्रणीत शास्त्र आहे याचें काय प्रमाण?

उ० इतिहासावरून;— योग्य साक्षिदारासमोर घडलेले जे चमत्कार यांत वर्णिले आहेत त्यांवरून;— या शास्त्रांत

कथिलेलीं भविष्यें जीं पूर्ण झालीं व पूर्ण होत चाललीं आहेत त्यांवरून;— यांत लिहिलेले वर्णनाची अनुपम्य प्रगल्भता, यांतील गोष्टीचा प्रकार व सुमेळ, आणि यांत शिकविलेले नीतिसंबंधी नेमाची यथार्थता शुद्धता व पूर्णता यांवरून;— ज्यानी या शास्त्राचा अंगीकार केला त्यांचा स्वभाव आणि आचरण यांविषयीं जी उत्कृष्ट सुधारणा झाली त्यावरून;— या शास्त्राचे ग्रंथ लिहिणारांच्या धार्मीकपणावरून;— यांत शिकविलेले धर्माचा जो मोठा प्रसार झाला त्यावरून;— आणि या शास्त्रांत प्रगट केलेल्या धर्माचा सृष्टिजन्य ज्ञानावरून कळूं येणाऱ्या धर्मासीं जो सुमेळ पडतो त्यावरून;—पवित्र आत्म्याकडून पालटलेले व सुप्रकाशीत झालेले मनुष्यांच्या अनुभवावरून. हें शास्त्र ईश्वरप्रणीत आहे, असें प्रमाण पटतें. तें येणेंप्रमाणें.

१. पवित्र शास्त्राविषयीं कोणत्याहि इतिहासामध्यें जे दाखले सांपडतात ते साक्ष देतात कीं, या शास्त्राचे वेगळाले भाग (त्यांतील कित्येक तर सर्वाहून पुरातन ग्रंथ आहेत) हे जेव्हां लिहिले गेले, तेव्हांपासून हे ईश्वरप्रणीत ग्रंथ आहेत असा ह्यांचा अभिप्राय दर्शविलेला आहे. आणि ज्यानी ज्यानी या शास्त्राचा अंगीकार केला त्या सर्वांनी हें ईश्वरप्रणीत शास्त्र आहे असें नेहमी मानिलें आहे. प्राचीन काळीं घडलेल्या गोष्टींविषयीं जी हकिकत या शास्त्रांत सांगितली आहे ती सर्वाहून प्राचीन व विख्यात असें बहुत विधर्मी ग्रंथकारांच्या लेखासीं देखील मिळती. याप्रमाणें या शास्त्रांतील इतिहासासीं मानवी इतिहासाचा जो मेळ दिसतो त्यावरून हें शास्त्र खरें आणि ईश्वरप्रणीत आहे असें एक प्रमाण पटतें.

२. चमत्कार ह्मणजे सृष्टीचा नियमित आणि चालू क्रम पालटून केलेलें कृत्य, ज्याला अमानुष कृत्यहि ह्मणतात, तें वास्तविक पाहिल्यास ज्या स्रष्ट्याने हे सृष्टिक्रम लाविले, त्यावांचून दुसऱ्या कोणासहि करण्याची शक्ति नाहीं. आणि आपण पाठविलेले पैगंबराचा ह्मणजे गुरूचा अधिकार किंवा आपण त्याद्वारें देविलेलें शास्त्राचें खरेपण, याविषयींचें प्रमाण देणें असल्या योग्य कारणावांचून दुसऱ्या कोणत्याहि कारणासाठीं सदरीं सांगितलेले चमत्कार ईश्वर माणसाकडून करवील असें समजण्यास कांहीं आधार नाहीं. यास्तव मोशे, भविष्यवादी, प्रभु येशू ख्रीस्त आणि प्रेषीत, यांकडून घडलेले चमत्कारांवरून प्रमाण पटतें कीं ते ईश्वरप्रेरीत गुरु होते आणि त्यानी लिहून दिल्हेले शास्त्रग्रंथ ईश्वरदत्त आहेत. निर्ग. १४:१६,२१. २ राजे. २:८, १४. मात्थी ४:२३,२४. मार्क. १६.२०. इब्री.२:४. लू. ८:२४. योहा. ११:४३,४४. प्रे० ५:१२,१५,१६.

३. भविष्यज्ञान ह्मणजे पुढें होणाऱ्या गोष्टींचें ज्ञान केवळ ईश्वरालाच आहे. यास्तव जो भविष्यकाळीं घडणाऱ्या गोष्टींचें कथन करितो, तो स्वतां ईश्वर किंवा त्याने प्रेरलेला भविष्यवादी असावा. ख्रिस्ती शास्त्राच्या ग्रंथकर्त्यानी तर या शास्त्रांत बहुत भविष्यगोष्टी सांगितल्या. आणि त्या गोष्टी घडण्याविषयीं जीं भविष्यें सांगितलीं तीं त्या गोष्टी घडण्याच्या पूर्वीं शेंकडों आणि हजारों वर्षांमागें सांगून ठेविलीं असतां, त्या सर्व गोष्टी आपापल्या योग्य काळीं भविष्यवचनांत सांगितल्याप्रमाणें पूर्ण झाल्या व होत चालल्या आहेत, त्यावरून हें शास्त्र ईश्वरप्रणीत आहे असें मजबूत आणि निर्विवाद प्रमाण पटतें. उत्प. १६:१२ होशे.

३:४. अनु. १८:२१,२२. २८:३७. यशा. ५३:७,९. मार्था. २४:१,२. इर्मे. २८:९.

४. ईश्वर, ख्रीस्त, पवित्र आत्मा, मनुष्य, दूत, काळ, अनंतकाळ, सौख्य लोक, नरक लोक, इत्यादिविषयीं जें वर्णन या शास्त्रांत आहे, तें जरी साधें व बाळबोध भाषेनें लिहिलें आहे, तरी तें इतकें अतक्र्य आणि प्रगल्भ आहे कीं तसें दुसरे कोणतेहि ग्रंथीं अढळत नाहीं. आणि ईश्वरी प्रेरणेवांचून कोणाला तसें वर्णन लिहितां येणार नाहीं. ह्मणून हें शास्त्र ईश्वरी प्रेरणेचें असावें.

अणखी या शास्त्राचे वेगळाले ग्रंथ जरी सुमारें तीस वेगळाल्या मनुष्यानी वेगळाल्या ठिकाणीं आणि वेगळाल्या काळीं सुमारें १५०० वर्षांचे गतीमध्यें एकमेकांचें कांहीं सम्मत न घेतां लिहिले आहेत, तरी त्या सर्व वेगळाले ग्रंथांचा एकमेकासीं पूर्ण मेळ पडतो. त्यावरून प्रमाण पटतें कीं तें ईश्वरदत्त असावें. अणखी नीतिसंबंधी ह्मणजे ईश्वरसेवेविषयीं व मनुष्याच्या परस्पर वर्त्तुणकींविषयीं जे नियम आणि आज्ञा या शास्त्रांत आहेत, ते इतके पवित्र यथार्थ धार्मीक आणि पूर्ण आहेत कीं, असे नियम ईश्वरी प्रेरणेवांचून कधीं कोणी लिहूं शकला नसता. कारण ते पतित मनुष्याच्या स्वाभावीक बुद्धीसीं व स्वभावासीं अगदीं विरुद्ध आहेत. साक्रेटीस, प्लेटो इ० ग्रीक ज्ञानी आणि सीसरो सेनिका इ० रोमी ज्ञानी, आणि मनू, व्यास, वाल्मीक, वसिष्ट, गौतम इ० हिंदु ज्ञानी यांचे ग्रंथ ख्रिस्ती शास्त्रांतील ग्रंथांसीं लावून पाहिले असतां फार हलके व तुच्छ दिसतात. यावरून अनुमान होतें कीं ख्रिस्ती शास्त्राच्या ग्रंथकारानी आपल्याच तर्कानें नव्हे पण ईश्वरी प्रेरणेनें

हे ग्रंथ लिहिले आहेत. उत्प. १:३. मात्थी २२: ३७-४०. गीत १२: ६.

५. ज्यानी या शास्त्राचा अंगीकार केला त्यांचा स्वभाव व आचरण यांची उत्कृष्ट सुधारणा झाली आहे. या शास्त्राच्या उपदेशानें मोठाले नास्तीक, निश्शास्त्रवादी, विधर्मी ज्ञानी व मूर्त्तिपूजक लोक आणि यहूदी, पाखांडी आणि ख्रिस्ती नीतिज्ञ, यांस प्रबोधित करून सद्धर्मी केलें आहे. या शास्त्राच्या उपदेशाने अज्ञान्यांस व ज्ञान्यांसहि प्रबोधित केलें, निराश झालेल्यांस आशावान केलें, शोकार्तांस समाधानयुक्त केलें, आणि दुर्गुणी व दुराचारी असे हजारों हजारांस सद्गुणी व सदाचारी करून आकाशांत जाण्यास तयार केलें आहे. आणि या शास्त्राच्या आज्ञाधारणाचें फळ असें उत्तम आहे कीं जर सर्व ठिकाणचे सर्व मनुष्य या आज्ञा पूर्णपणें पाळतील तर ही पृथ्वी सौख्यलोकवत् होईल, यांत कांहीं संशय नाहीं. यास्तव ज्या शास्त्राचा गुण असा आहे, तें ईश्वरदत्त असावें असा निश्चय होतो. गीत. १९: ७. १ करिं. १: २१. रोम. १५: ४. प्रे०२: ४१. २ तिम. ३:१६,१७.

६. या शास्त्राचे ग्रंथकार मोठे धार्मीक मनुष्य होते. त्यावरून असें अनुमान होतें कीं, जें त्यांस सत्य वाटलें त्यावांचून दुसरें कांहीं त्यानी या ग्रंथांत लिहिलें नसावें. आणि हे ग्रंथ दुष्ट मनुष्यानी लिहिले असें तर कोणी ह्मणूं शकणार नाहीं. कारण कीं सर्व दुष्ट कर्मांचा आणि दुष्ट वासनांचा या ग्रंथांत पूर्ण निषेध केला आहे. आणि असीं कर्मैं करणारे मनुष्य सर्वकाळच्या शासनास योग्य आहेत असें यांत स्पष्टपणें लिहिलें आहे. यास्तव हें शास्त्र दुष्ट

मनुष्यानी आपल्या इच्छेने लिहिलें नसावें, पण धार्मिक मनुष्यानी ईश्वरी प्रेरणेने लिहिलें असावें, असें सिद्ध होतें. २. पे. १: २१.

७. या शास्त्रांतील बोध, मनुष्याचा जन्मस्वभाव आणि दुष्ट इच्छा व भ्रष्ट वासना यांसीं अगदीं प्रतिकूळ आहे; ह्मणून सर्व दुष्ट मनुष्य पहिल्यापासून या धर्माचा मोठा विरोध करीत आले आहेत. आणि हा विरोध साधारण दुष्ट मनुष्यानी केला असें केवळ नव्हे, पण मोठे धूर्त्त, ज्ञानी, विद्वान, पराक्रमी आणि सरकारी अधिकारी अशा दुष्ट मनुष्यानीहि या धर्मावर आपलें शस्त्र धरलें. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या तीन शतकांपर्यंत ख्रिस्ती मंडळ्यांच्या दाहा मोठाल्या छळणुकी झाल्या; त्यानंतर कांहीं काळपर्यंत ख्रिस्ती मंडळ्यांस स्वस्थता झाल्यावर पुनःपुनः मोठाल्या छळणुकी होत गेल्या तरी ख्रिस्ती धर्म टिकून राहिला, असें केवळ नाहीं पण ह्या छळणुकींच्या वेळीं विशेषेंकरून फार पसरला; ही गोष्ट निर्विवाद आहे. तर ज्यापेक्षां या धर्माचा नाश करण्यासाठीं इतके पराक्रमी शत्रूनी पराकाष्ठेचे यत्न केले असतांहि अत्यंत दुःसह छळणुकीच्या वेळेस देखील हा धर्म टिकून राहिला असें केवळ नव्हे पण फार वाढलाहि, त्यापेक्षां यावरून उघड दिसतें कीं, हा धर्म अमानवी ह्मणजे ईश्वरी प्रेरणेनेच उत्पन्न झाला व चालला आहे. प्रे० २: ४७. २ करिं. १०: ४.

८. सृष्टिजन्य ज्ञानावरून जें कांहीं धर्मसंबंधीं ज्ञान प्राप्त होतें त्याचा या शास्त्रांतील बोधासीं चांगला मेळ पडतो. यावरून दिसतें कीं ज्याने ही सृष्टि निर्माण केली त्यानेच ह्मणजे ईश्वराने हें शास्त्र दिल्हें आहे.

९. आणि ज्यांच्या मनाचा पुनर्जन्म झाला आहे, ह्मणजे ज्यांस ईश्वराच्या पवित्र आत्म्याने पालटवून सुप्रकाशित व सदाचारी केलें आहे; त्या सर्वांच्या अनुभवास असें येतें कीं हें शास्त्र खरें आणि ईश्वरप्रणीत आहे.

या सर्व प्रमाणांवरून निभ्रांत सिद्धांत होतो कीं, हें शास्त्र ईश्वरप्रणीत आहे. सदरीं सांगितलेल्या प्रत्येक भिन्न भिन्न प्रमाणावरूनहि या शास्त्राची सत्यता दिसती. परंतु हीं सर्व प्रमाणें एकदम लावून पाहिल्यास फारच पूर्ण आणि निभ्रांत खातरी होती कीं हें शास्त्र ईश्वरप्रणीत आहे. या सर्व प्रमाणांवरून झालेला सिद्धांत इतका लखलखीत आणि निर्विवाद आहे कीं जो कोणी मनोभावाने या प्रमाणांचा विचार करितो, त्यास हें शास्त्र ईश्वरप्रणीत आहे असी खातरी झाल्यावांचून राहत नाहीं.

प्र० १९. हें पवित्र शास्त्र आमचा विश्वास आणि आचरण यांविषयीं परिपूर्ण आणि अचूक नियम असें आहे कीं काय?

उ० होय, हें शास्त्र आमचा विश्वास आणि आचरण यांविषयीं अगदीं अचूक आणि पूर्ण नियम असें आहे. यास्तव यांत कांहीं नवें घालावयाचें नाहीं आणि यांतून कांहीं काढावयाचें नाहीं. धर्मसंबंधी ज्या सर्व गोष्टी विश्वासणें व आचरणें अवश्य आहेत त्या सर्वांविषयींचा बोध यांत ईश्वरी पूर्णतेने ईश्वरी अचूकपणाने आणि ईश्वरी अधिकाराने लिहिला आहे. यास्तव सर्व धर्मसंबंधी वाद, सर्व धर्म सभांचे ठराव, सर्व प्राचीन आणि अर्वाचीन ग्रंथकारांचीं मतें, शुभवर्त्तमानाच्या उपदेशाचा प्रकार आणि सर्व धर्मोपदेशकांचीं मतें, यांविषयींचा निर्णय या शास्त्राचे आधारा-

वरूनच केला पाहिजे. हरएक धर्मसंबंधी गोष्टीविषयीं जो ठराव या शास्त्ररूप न्यायाधिशाकडून होईल त्यावर ज्यापासीं अपील करावें असा दुसरा कोणी वरिष्ट न्यायाधीश नाहीं. यास्तव शास्त्रांतील सिद्धांताच्या बोधापेक्षां मानवी तर्क आणि विवेक यांच्या बोधाला मानावयाचें नाहीं. कारण असें केल्यास मनुष्य ईश्वराहून श्रेष्ठ आहे असें मानल्याप्रमाणें होईल. प्रग. २२;१८,१९. यशा. ८:२०. गाला. १:८. २ पेत्र. १:१९.

प्र० १६. ख्रिस्ती व्यवस्थेंतील लोकानी आपला विश्वास व आचरण यांविषयींचे नेम काढण्यास जसा नव्या कराराचा आधार धरावा तसाच जुन्या कराराचाहि धरावा कीं काय ?

उ० जुन्या कराराच्या ज्या भागांमध्यें नीतिसंबंधी ईश्वरी आज्ञा आहेत, आणि ज्यांमध्यें विशेषेंकरून शुभवर्त्तमानसंबंधी उपदेश आहे, आणि ज्यांमध्यें भविष्यवचनें व भक्तिसंबंधी बोध आहे, त्या सर्व भागांचा आधार नव्या करारांतील पुस्तकांप्रमाणें घ्यावा. परंतु जुन्या कराराचे जे भाग किंवा नियम विशेषेंकरून यहूदी लोकांस मात्र लागू आहेत; ह्मणजे जे विशेषें त्यांकरितांच दिल्हे होते, ते पाळण्यास ख्रिस्ती लोक बांधले नाहींत. कारण ज्या उद्देशाने ते लाविले होते ते उद्देश ख्रिस्ती व्यवस्थेकडून पूर्ण झाले असतां, पुढें ते पाळण्याचें अगत्य राहिलें नाहीं. तथापि मनुष्यजातीचा तारणोपाय आणि पवित्रीकरण याचा प्रकार आणि गुण उघड करून दाखविण्यासाठीं ते ख्रिस्ती लोकांसहि फार उपयोगी आहेत. जुना करार व नवा करार या दोन्ही भागांचें मुख्य तात्पर्य एकच आहे. ह्मणजे

एकाच ईश्वराविषयीं, एकाच तारणाऱ्याविषयीं, एकाच कृपेच्या मार्गाविषयीं, एकाच पश्चात्तापाविषयीं, एकाच विश्वासाविषयीं आणि एकाच प्रतिफळाविषयीं जुना करार व नवा करार या दोन्ही भागांमध्यें शिकविलें आहे. रोम. ३:३१. १ तिम. ३:१६,१७.

प्र० १७. पवित्र शास्त्राचें पुस्तक सर्व माणसांजवळ असणें अवश्य आहे कीं काय?

उ० होय, तें प्रत्येक मनुष्याजवळ असावें. पवित्र शास्त्राचें पुस्तक केवळ उपदेशक वर्गाजवळ मात्र असावें, आणि श्रोते वर्गाजवळ नसावें असी जी रोमनक्याथोलीक मंडळीची वहिवाट आहे ती अगदी अयोग्य आहे. यो० ५:३९. यशा० ३४: १६. लूका १६: २९. प्रे० १७:११.

प्र० १८. आह्मास जी सदसद्विवेकशक्ति आहे तिचा उपयोग शास्त्रज्ञान प्राप्त करण्यासाठीं कोणत्या प्रकारें करावा?

उ० कोणतें शास्त्र ईश्वरप्रणीत आहे तें समजण्यासाठीं, आणि अमुक शास्त्र ईश्वरप्रणीत आहे असें समजल्यावर त्यांतील अभिप्राय व बोध समजून घेण्यासाठीं आह्मी आपल्या विवेकाचा उपयोग करावा. परंतु ईश्वरास पसंत होईल असें शास्त्र आह्मी आपल्याच तर्कानें काढण्यास पाहूं नये. कारण नुसते मानवी तर्कानें ईश्वरी शास्त्राचें ह्मणजे ईश्वरी इच्छेचें यथार्थ ज्ञान कोणासहि होऊं शकत नाहीं.

प्र० १९. पवित्र शास्त्रांतील सर्व गोष्टी एकसारिख्याच सुबोद्ध आणि स्पष्ट आहेत कीं काय?

उ० पवित्र शास्त्रांतील सर्व गोष्टी एकसारिख्याच स्पष्ट

व समजण्यास सुलभ अशा नाहींत. तरी धर्माचे मुख्य आणि अवश्यक सिद्धांत जे आहेत ते या शास्त्रांत अशा रीतीने कथिले आहेत कीं, जो कोणी मनोभावाने, नम्रतेने आणि तत्परतेने हें शास्त्र वाचील त्यास ते सिद्धांत समजल्यावांचून राहणार नाहींत. कारण ते सिद्धांत विश्वासाविषयीं असोत किंवा आचरणाविषयीं असोत तरी ते सर्व प्रकारच्या व सर्व स्थितींतल्या माणसांस समजण्यास अडचण पडूं नये अशा सुबोद्ध व ठसण्याजोगे रीतीने लिहिले आहेत. यशा. ३५:८. योहा. ७;१७.

प्र० २० धर्मसंबंधी मुख्य सिद्धांतांची यथायोग्य समजूत असणें सर्व मनुष्यांस अवश्य आहे कीं काय?

उ० होय, धर्मसंबंधी सर्व मुख्य सिद्धांतांविषयीं यथार्थ व योग्य समज असणें प्रत्येक मनुष्यास अवश्य आहे. कारण कीं मनुष्यांच्या भावना वासना आणि आचरण हें त्यांच्या मताप्रमाणें बहुधा होत असतें. धर्मसिद्धांतांविषयीं योग्य समज नसल्यावरून कोणी धार्मिक ह्मणजे भावीक मनुष्यहि मोठ्या नाशकारक चुकींमध्यें असतां, आपण जें करितों तें ईश्वरास रुजू आहे असें मानावें हें संभाव्य आहे. याच कारणावरून पौलसाने ख्रिस्ती लोकांचा पाठलाग करणें योग्य आहे असें मानिलें होतें. परंतु पुढें योग्य समज पावल्यावर तो त्याच कर्मावरून आपणास निंदक, छळणारा, आणि पिडणारा असें मानून अपराधी मानिता झाला. सदरीं सांगितलेला ख्रीस्तविरोध जो पौलसाने केला, तो करणें सत्कर्म आहे असें मनोभावाने मानून जरी त्याने केला, तरी त्याच्या धर्मसिद्धांताच्या अज्ञानावरून तो त्या पापाविषयीं निर्दोष ठरला असें नाहीं.

आणि पुढें जर तो योग्य समज पावून आपल्या त्या पापापासून फिरला नसता, तर तो नाशासच गेला असता यांत कांहीं संशय नाहीं. यावरून उघड दिसतें कीं धर्मसिद्धांतांविषयीं खरा व यथार्थ समज असणें प्रत्येक मनुष्यास अवश्य आहे. नीति १६:२५. योहा० ८:२४. प्रे० २६:९.१ तीम. १:१३.२ पे० २:१,२.२ योहा. १०,११.

प्र० २१. शास्त्रांतील वाक्यें अथवा शब्द आह्मी आपल्या साधारण भाषणांत अथवा लिहिण्यांत कोणत्या रीतीने काढावे?

उ० आह्मी ईश्वरी शास्त्रांतील वाक्यें अथवा शब्द मोठ्या भिडेने मर्यादेने आणि गंभीरपणाने योग्य प्रसंगीं मात्र काढावे, आणि हलक्या व थट्टा मस्करीच्या कामासाठीं काढूं नये. प्रभु, देव, ख्रीस्त, विश्वास, आकाश, नरक, नष्ट होणें, दंडी ठरणें, शाप आणि आशीर्वाद, हे किंवा असल्या अभिप्रायाचे दुसरे शब्द हलक्या किंवा विनोदाच्या भाषणांत किंवा लिहिण्यांत काढावे हें फार अनुचित आहे. जो कोणी ईश्वर व ईश्वरी शास्त्र याचें महत्व आणि गांभीर्य मनांत आणील, त्यास अशा प्रकारें शास्त्रवचनांचा उपयोग करणें हें दुर्भाषण व ईश्वरनिंदा आहे असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. निर्ग० २०:७. या० ५:१२.

प्र० २२. तर आह्मी पवित्र शास्त्राचा उपयोग कसा करावा?

उ० तें सर्वोत्तम आणि अत्यंत मोलवान आहे, असें समजून आह्मी तें स्थिरतेने, नम्रतेने, आणि मनोभावाने अंगीकारावें. आणि आदराने व कृतज्ञतेने, दक्षतेने आणि

तत्परतेने, आणि विश्वास ठेवून व प्रार्थना करून आह्मी त्याचा अभ्यास करावा आणि त्यांतील बोधाप्रमाणें आपलें आचरण घडण्याविषयीं झटावें, हें योग्य आहे. परंतु या पवित्र शास्त्रास दुसऱ्या ग्रंथांसारिखें हलकें आणि सामान्य मानणें आणि त्यांतील बोध समजून घेण्याची व त्याप्रमाणें चालण्याची हयगय करणें, हें पवित्र शास्त्राची अमर्यादा करणें; ह्मणजे ईश्वराचा निरोप तुछ मानणें, त्याने देऊं केलेली कृपा अव्हेरणें, आणि आपलें अनहित व अनंतकाळिक गोष्टींचा उपहास करणें असें आहे. गीत. १९: ८,१०. एफे. २:२०. योहा. ८;२४. ५:३९. मात्थी २२: २९. १ पे. २:२.

---

## प्रकरण ३.

# ईश्वराचे अवश्यक व मानसीक गुण.

प्र० १. ईश्वराचे अवश्यक गुण ह्मणजे काय आणि ते कोणते आहेत?

उ० ईश्वराचे जे गुण त्याच्या अस्तित्वास ह्मणजे स्थितीस अवश्य आहेत, परंतु ज्याकडून त्याचा मनोभाव प्रगट होत नाहीं, त्यांस अवश्यक गुण ह्मटलें आहे. स्वयंभूत्व, सनातनता, अपालटपणा, सर्वव्यापकता, सर्वज्ञता, सर्वसमर्थता, आणि स्वतंत्रता; हे अवश्यक गुण ईश्वराच्याठायीं आहेत.

प्र० २. ईश्वराचे मानसीक गुण ह्मणजे काय आणि ते कोणते आहेत?

उ० ईश्वराचे जे गुण त्याचा मनोभाव ह्मणजे मनोवृत्ती

दाखवितात त्यांस मानसिक गुण ह्मटलें आहे. चांगुलपणा, सुज्ञता, पवित्रता, न्यायीपणा, कृपाळूपणा, आणि सत्यता, हे मानसिक गुण ईश्वराच्या ठायीं आहेत.

प्र० ३. ईश्वर स्वयंभू आहे ह्मणजे काय आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० तो स्वयंभू आहे ह्मणजे तो कधीं उत्पन्न झालेला नसतां सनातन काळापासून आहे; आणि त्याच्या अस्तित्वाचें कारण आणि आधार त्याच्याच ठायीं आहे. तो असा आहे हें यावरून समजतें कीं ज्यापेक्षां तो सर्व जें कांहीं आहे त्याचा उत्पन्न करणारा आणि आधार आहे आणि त्याच्या पूर्वीं कांहींच नव्हतें; त्यापेक्षां तो आपण स्वतां अनुत्पन्न असावा. कारण जो सर्वांचा मूळ आहे आणि ज्याच्या पूर्वीं कोणी नव्हता, तो कोणाकडून कधीं उत्पन्न झालेला आहे असी कल्पना अगदीं असंभाव्य आहे. शास्त्रांत त्याला यहोवा; मी आहें; जो होता आणि आहे आणि होणार; अशा ज्या संज्ञा दिल्ह्या आहेत त्यांचा अर्थ असाच होतो. गीत ८३:१८. निर्ग. ३:१४. प्रग. १:४..

प्र० ४. ईश्वर सनातन आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० तो सनातन आहे ह्मणजे तो आदिअंतावेगळा आहे. तो नव्हता असा काळ कधीं झाला नाहीं, आणि तो असणार नाहीं असा काळ कधीं यावयाचा नाहीं; ह्मणजे तो सदांसर्वदां आहेच. तो असा आहे हें त्याच्या स्वयंभूत्वावरून उघड दिसतें; कारण ज्याला आदि नाहीं त्याचा अंत कसा होईल? तो सनातन आहे असें शास्त्रांत बहुत

ठिकाणीं स्पष्टपणें सांगितलें आहे. अनु. ३३:२७. गीत ९०:२. १०२:२५—२७.

प्र० ५. ईश्वर अपालट आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० तो अपालट आहे ह्मणजे त्याचें तत्व, गुण, योजना, सुख देण्याविषयींचीं वचनें, आणि दंड लावण्याविषयींचीं वचनें, हीं कधीं बदलावयाचीं नाहींत. तो असा आहे, हें यावरून समजतें कीं ज्यापेक्षां तो स्वयंभू आणि सनातन आहे त्यापेक्षां तो अपालटहि असावा हें उघड आहे. कारण ज्याला आदि व अंत नाहीं त्याचा पालट कसा व कोणाकडून होऊं सकेल? सृष्टीची उत्पत्ति स्थिति आणि व्यवस्था यांचा जो अपालट क्रम त्याने चालविला आहे त्यावरून आणि शास्त्रांतील स्पष्ट वाक्यांवरून असेंच समजतें. याको. १:१७. गीत ३३:११.

प्र० ६. ईश्वर सर्वव्यापक आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० तो सर्वव्यापक आहे ह्मणजे तो सृष्टींतील सर्व ठिकाणीं सर्वदां आहे. तो सदांसर्वदां सर्व ठिकाणीं असा आहे कीं, तो एका ठिकाणीं आहे आणि दुसऱ्या ठिकाणीं नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. तरी तो असा सर्वव्यापी असतांहि सर्व वस्तुमात्रांसीं अलिप्त आहे. तो असा आहे हें यावरून समजतें कीं, तो सृष्टींतील सर्व ठिकाणेच सर्व वस्तुमात्रांचा उत्पन्न करणारा, व्यवस्था करणारा आणि अधिकारी आहे, आणि त्यासंबंधी त्याचीं कामें सर्व ठिकाणीं सर्वदां घडत असतात, यावरून दिसतें कीं तो सर्वव्यापी आहे. आणि शास्त्रांतहि असेंच सांगितलें आहे. गीत १३९:७-१०.

प्र० ७. ईश्वर सर्वज्ञ आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० ईश्वर सर्वज्ञ आहे ह्मणजे त्याला सर्व गोष्टींचें परिपूर्ण ज्ञान आहे. हरएक ठिकाणच्या हरएक प्राण्यांविषयीं, हरएक वस्तूविषयीं व हरएक गोष्टीविषयीं, भूत वर्त्तमान आणि भविष्य ह्या तिन्ही काळीं जें कांहीं घडतें तें तो निरंतर, स्पष्टपणें आणि अचुकपणें जाणतो. तो असा आहे हें यावरून समजतें कीं, तो सर्व वस्तूंचा उत्पन्न करणारा चालविणारा रक्षण करणारा आणि अधिकारी असतां, तो त्या सर्वांस पूर्णपणें जाणणारा असावा हें अवश्य आहे. कारण त्या सर्व वस्तूंस पूर्णपणें जाणल्यावांचून तो त्यांस कसा उत्पन्न करूं व संभाळूं व चालवूं शकेल? अणखी ह्या सृष्टीसंबंधी त्याचीं जीं कामें आह्मास दिसून येतात त्यांवरूनहि तो सर्वज्ञ आहे असें दिसतें, आणि शास्त्रांत तो असाच वर्णिलेला आहे. गीत ९४: ९,१०. प्रे० १५:१८. १ काळ. २८:९.

प्र० ८. ईश्वर सर्वसमर्थ आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० तो सर्वसमर्थ आहे ह्मणजे त्याला असी अपार शक्ति आहे कीं जें कांहीं त्याच्या इच्छेस येईल तें करावयास तो सर्वदां पूर्ण शक्तिमान आहे. ह्मणजे जें कांहीं त्याच्या गुणांस व स्वभावास विरूद्ध नाहीं आणि जें अर्थातच असंभाव्य नाहीं, तें सर्व तो आपल्या इच्छेस येईल तेव्हां करावयास समर्थ आहे. तो ह्या सर्व सृष्टीचा उत्पन्न करणारा चालविणारा रक्षणारा आणि अधिकारी असतां तो सर्व समर्थ असणें अवश्य आहे. कामावरून कर्त्याची शक्ति

दिसती. आणि ईश्वराचीं कामें अनंत व अपार सामर्थ्याचीं आहेत. यावरून उघड दिसतें कीं तो सर्वशक्तिमान आहे. तो असा आहे ह्मणून शास्त्रांतहि बहुत ठिकाणीं सांगितलें आहे. प्रग. १९: ६. मात्थी १९:२६.

**प्र०** ९. ईश्वर स्वतंत्र आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे याचें प्रमाण काय?

उ० तो स्वतंत्र आहे ह्मणजे तो आपलें अस्तित्व, स्थिति, गुण आणि सुख यांविषयीं अथवा दुसऱ्या कोणत्याहि वस्तूविषयीं जें कांहीं त्याला करणें आहे, त्याविषयीं तो दुसऱ्या कोणावर अवलंबून राहत नाहीं. तो असा आहे याचें प्रमाण हें आहे कीं, तो सर्वांहून श्रेष्ठ आणि सर्वांचा मूळआधार आहे आणि दुसरे सर्व त्याच्या आश्रयावर राहतात, ह्मणून तो आपण कोणाच्या आश्रयावर राहत नाहीं हें उघड आहे. शास्त्रांतहि असेंच सांगितलें आहे. एफे. ४:६.

**प्र०** १०. ईश्वर चांगला आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० तो चांगला आहे ह्मणजे, जेणेंकडून त्याला कोणत्याहि प्रकारें बाध लागणार नाहीं, व जेणेंकडून सर्व सृष्टीचें सर्वांहून मोठें हित होईल असें सर्व गोष्टी मनांत आणून त्याला वाटतें, व जें प्रत्येक प्राण्याच्या स्थितीस योग्य व हितावह आहे, तें सर्व सुख आपल्या प्रत्येक प्राण्यास इहलोकीं आणि परलोकीं देण्यास त्याला आवडतें. तो असा आहे हें सृष्टीची उत्पत्ति स्थिति संरक्षण आणि अधिकार, हीं चालविण्यांत, प्राणीमात्रांच्या सुखाच्या ज्या योजना तो करितो त्यांवरून उघड दिसतें. आणि शास्त्रांतहि असेंच सांगितलें आहे. गी. ११९:६८. १३६:१.

प्र० ११. ईश्वर सुज्ञ आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे याचें प्रमाण काय?

उ० तो सुज्ञ आहे ह्मणजे सृष्टीचें सर्वांहून मोठें हित साधण्यासाठीं सर्वोत्तम कार्यें करण्याची योजना करणें, व तीं कार्यें सिद्धीस नेण्यासाठीं सर्वोत्तम साधनें व उपाय निवडून चालविणें याविषयीं तो पूर्णपणें समर्थ व तत्पर आहे. ईश्वराची सुज्ञता ही जसी त्याच्या मानसिक गुणांमध्यें गणिली आहे तसीच त्याच्या अवश्यक गुणांमध्येंहि गणतां येईल. कारण सृष्टीचें सर्वांहून मोठें हित साधण्याच्या उद्देशानें सर्वोत्तम कार्यें करण्याची योजना करणें आणि तीं सर्वोत्तम साधनानी सिद्धीस नेणें यासाठीं त्याची सर्वज्ञता हा अवश्यक गुण आणि चांगुलपणा हा मानसिक गुण या उभयतांचा संयोग होत असतो. ही सुज्ञता ईश्वराच्या ठायीं आहे हें त्याची सर्वज्ञता व चांगुलपणा यांवरून आणि विशेषेंकरून मनुष्यजातीच्या उद्धारासाठीं जो उपाय त्यानें केला आहे त्यावरून उघड दिसतें. हा गुण त्याच्या ठायीं आहे असें शास्त्रांतहि सांगितलें आहे. रोम.१६:२७.

प्र० १२. ईश्वर पवित्र आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० ईश्वर पवित्र आहे ह्मणजे त्याचा स्वभाव पूर्णपणें शुद्ध व सरळ आहे. तो कधीं कांहीं पाप करीत नाहीं व करवीत नाहीं, असें केवळ नाहीं पण पापाच्या निवारणाचा उपाय करितो. तो असा आहे हें सृष्टीची उत्पत्ति प्रतिपाळण आणि अधिकार यांसंबंधीं जीं त्याचीं कामें त्यांवरून; आणि मानसिक प्राण्यांसीं ज्या प्रकारें तो वागतो

त्यावरून, आणि त्याच्या शास्त्रांवरून उघड दिसतें. यशा. १:४. ६:३. लेवी १९:२. याको. १:१३,१७.

प्र० १३. ईश्वर न्यायवान आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० ईश्वर न्यायवान आहे ह्मणजे तो कोणाचा कांहीं अन्याय कधीं करीत नाहीं. सर्वांसीं सर्वदां न्यायानें वागून प्रत्येकाच्या कर्मास जें योग्य तेंच प्रतिफळ त्यास भरून देण्यास त्याला आवडतें. या गुणामुळें तो पवित्र जनांस सुख आणि पापी जनांस दुःख हें प्रतिफळ इहलोकीं व परलोकींहि देतो. तो असा न्यायवान आहे हें त्याची पवित्रता, चांगुलपणा इत्यादि दुसरे गुणांवरून आणि मानसिक प्राण्यांस जो न्याय तो लागू करितो त्यावरून आणि शास्त्रांतील स्पष्ट वचनांवरून उघड दिसतें. गी. ११९:१३७.

प्र० १४. ईश्वर कृपाळू आहे ह्मणजे काय आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० ईश्वर कृपाळू आहे ह्मणजे तो दुःखितांचा कळवळा करितो इतकेंच केवळ नव्हे, पण जे आपल्या पापामुळें नाश पावण्यास योग्य झाले आहेत त्यांचेंहि कल्याण करण्याची इच्छा त्यास आहे. दया व कृपा हे दोन्ही शब्द सामान्य भाषणामध्यें एकच अर्थानें बोलत असतात खरें. परंतु ज्यानें आपली अवकृपा पावण्याजोगें कांहीं केलें नसतां दुःखांत पडला आहे, त्याचीं दुःखें निवारण करून कल्याण करणें यास दया, आणि ज्यानें आपली अवकृपा पावण्याजोगें कांहीं केलें आहे, त्याचीं दुःखें निवारण करून कल्याण करणें यास कृपा ह्मणावें, अशाच भिन्न अर्थानें हे शब्द या ग्रंथामध्यें योजले आहेत. दयाळूपणा हा ईश्वराच्या चांगुलपणाच्या

पोटीं आहे. परंतु कृपाळूपणा हा त्याचा निराळा गुण आहे. ईश्वर कृपाळु आहे हें तो पाप्यांसीं जी सहनता धरितो आणि त्यांस जीं अनेक सुखें देतो त्यावरून, आणि मुख्यत्वेंकरून त्यांचा उद्धार साधण्यासाठीं आपला एकुलता पुत्र दिल्हा यावरून, आणि त्या योगें पाप्यांचा सर्वकाळिक दंड सोडवून त्यांस सर्वकाळिक सुख देतो यावरून आणि शास्त्रांतील स्पष्ट वचनांवरून सिद्ध होतें. एफे. २:४,५.

प्र० १५. ईश्वर सत्यवान आहे ह्मणजे काय, आणि तो असा आहे हें कशावरून समजतें?

उ० ईश्वर सत्यशीळ आहे ह्मणजे त्याला केवळ सत्याचीच आवड आहे. तो हरएक गोष्टीविषयीं जें वर्णन करितो तें त्याच्या वास्तविक अर्थाप्रमाणें करितो; सुख देण्याविषयीं जीं वचनें तो देतो तीं तो बरोबरच पूर्ण करितो; आणि दंड लावण्याविषयीं जीं वचनें तो देतो तींहि तो बराबरच पूर्ण करितो. आणि जीं भविष्यें तो कळवितो तींहि तो यथाकाळीं पूर्ण करितो. सारांश त्याचें बोलणें व करणें अगदीं एकसारिखें आहे. ईश्वर सत्यवान आहे हें त्याच्या दुसऱ्या गुणांवरून, मानसिक प्राण्यांसीं जी वर्त्तणूक तो करितो तिजवरून आणि त्याच्या शास्त्रावरून उघड दिसतें. गण. २३:१९.

प्र० १६. ईश्वर आह्मास दुर्ज्ञेय आहे कीं काय?

उ० होय तो आह्मास दुर्ज्ञेय आहे. याचें कारण हेंच कीं त्याला पुरतेपणीं जाणण्यास आमची मती पुरत नाहीं. आणि यांत कांहीं विपरीत नाहीं, कारण ईश्वर अनंत आहे, परंतु आह्मी सांत व अल्पबुद्धीचे आहों. असें असतां अनंत ईश्वरास सांत व अल्प प्राण्यानी पूर्णपणें जाणावें हें असं-

भाव्य आहे. यास्तव मनुष्यानी ईश्वराला पूर्णपणें जाणावें हें असाध्य आहे. तरी आह्मी त्याची भक्ति करून त्याच्या आज्ञा पाळाव्या व आपला उद्धार साधावा यासाठीं त्याविषयींचें जितकें ज्ञान आह्मास अवश्य आहे तितकें सृष्टिजन्य ज्ञानावरून आणि ईश्वरी शास्त्रावरून आह्मास समजण्याजोगें आहे. ईयो. ११:७. रो. १:१९,२०. ११:३३,३८.

प्र० १७. ईश्वराच्या गुणांचें महत्व कशामध्यें आहे?

उ० त्याच्या अवश्यक गुणांच्या अनंतपणामध्यें आहे.

प्र० १८. ईश्वराचें गौरव कशामध्यें आहे?

उ० त्याच्या मानसिक गुणांच्या अत्यंत उत्कृष्टतेमध्यें आहे. कारण जर ईश्वर पूर्ण दयाळु व पवित्र व न्यायवान नसता तर त्याचें अनंत सामर्थ्य व ज्ञान हें केवळ अनंत नाशास कारण झालें असतें. निर्ग. ३३:१८,१९.

---

## प्रकरण ४.

# ईश्वराचें त्र्यैकपण.

प्र० १. ईश्वराचें त्र्यैकपण ह्मणजे काय?

उ० देवपणाच्या ठायीं जें व्यक्तित्र्यैकत्व आहे; ह्मणजे बाप, पुत्र, पवित्र आत्मा, अशा तीन भिन्न व्यक्ति मिळून एक ईश्वर असणें, असा जो ईश्वराचें असण्याचा प्रकार आहे, त्यास ईश्वराचें त्र्यैकपण ह्मटलें आहे. देवपणांतील ह्या तीन व्यक्ति जरी संख्येने भिन्न आहेत, तरी त्या तत्वानें आणि गुणानी अगदीं अभिन्न आहेत. ह्मणून देवपणामध्यें ह्या तीन व्यक्ति आहेत, असें ह्मटल्यावरून तीन ईश्वर आहेत, असें समजावयाचें नाहीं. पण ह्या तिन्ही मिळून एकच

ईश्वर आहे, असें समजावयाचें आहे. यास्तव ह्या त्र्यैक ईश्वराविषयीं बोलणें आहे तेव्हां, शास्त्रांत त्याला यहोवा ; ह्मणजे ईश्वर किंवा परमेश्वर असी संज्ञा दिल्ही आहे. आणि ह्या त्र्यैकांतील पृथक् व्यक्तीविषयीं बोलणें आहे तेव्हां, बाप, पुत्र, पवित्र आत्मा, ह्या पृथक् संज्ञा दिल्ह्या आहेत.

प्र० २. ईश्वराच्या त्र्यैकपणाचें ज्ञान सृष्टिजन्य ज्ञानावरून होण्याजोगें आहे कीं काय?

उ० नाहीं. सृष्टीचा उत्पन्न करणारा, चालविणारा आणि अधिकारी असा कोणी आहे व तो एकच आहे, आणि तो अमुक गुणांनी युक्त आहे, इतकें सृष्टिजन्य ज्ञानावरून समजण्याजोगें आहे. परंतु त्याच्या असण्याचा प्रकार कसा आहे, हें सृष्टिजन्य ज्ञानावरून कदापि समजूं शकणार नाहीं. कारण कीं कर्त्याचें अस्तित्व व गुण हे त्याच्या कर्मांवरून उघड दिसतात. परंतु त्याच्या असण्याचा प्रकार कसा आहे, हें त्याच्या कार्यांवरून समजत नसतें. ह्मणून ईश्वराच्या त्र्यैकपणाचें ज्ञान सृष्टिजन्य ज्ञानावरून होण्याजोगें नाहीं.

प्र० ३. तर ईश्वराच्या त्र्यैकपणाचें ज्ञान कोठून होतें?

उ० ईश्वराच्या त्र्यैकपणाचें ज्ञान केवळ ईश्वराने दिल्हेल्या शास्त्रावरून होतें. आणि शास्त्रांत पाहिलें असतां सर्वांस सहज दिसून येईल कीं, जरी ईश्वर एक आहे असें बहुत ठिकाणीं सांगितलें आहे, तरी त्या एकामध्यें बाप, पुत्र, पवित्र आत्मा, असे तिघे जण आहेत, आणि ते तिघे जण पृथक् असतांहि एक आहेत. असेंहि बहुत वाक्यांत स्पष्ट दाखविलें आहे. १ योहा० ५:७. योहा० १:१–३.

उत्प० १:२६. मात्थी २८:१९. २ करिं० १३:१४. गा- ला० १:३. १ पे० १:२. उत्प० ३:२२. ११:७.

प्र० ४. बाप, पुत्र व पवित्र आत्मा, ह्या तिहींतून प्रत्येक खरोखर व तत्वशः ईश्वर आहे कीं काय?

उ० होय आहे. कारण शास्त्रांत त्यांतील प्रत्येकाला, ईश्वरी नामें, आणि संज्ञा व ईश्वरी गुण, सत्ता आणि कामें, व ईश्वरी अधिकार हे लाविले आहेत; आणि त्यांतील प्रत्येकास ईश्वरी मान भजन हीं समर्पिलीं आहेत. यावरून सिद्ध आहे कीं बाप, पुत्र व पवित्र आत्मा ह्यांतून प्रत्येक जण खरोखर आणि तत्वशः ईश्वर आहे. यहू० १. योहा० ४:२३. यशा० ९:६. योहा० १:१. १०:१३. २०:२८. इब्री. १:८. १ योहा० ५:२०. रोम० ९:५. तित० २:१३. प्रग० १:८. १७:१४. इर्मे० २३:६. इब्री. १३:८. मात्थी २८:१८. १८: २०. योहा० २१:१७. इब्री. ३:४. कल० १:१६,१७. एफे० १:२२. प्रे० १०:४२. योहा० ५: २३. इब्री. १:६. प्रग० ५:१३. प्रे० ७:५९. ५:३,४. योहा० ३:५. १:१३. २ तिम० ३:१६. २ पे० १:२१. १ करिं० ३:१६. ६:१९. योहा० १६:१३. लूका. १२: १२. ३:२२. इब्री. ९:१४. १ करिं. २:१०. गीत १३: ९:७. ईयो० २६:१३. ३३:४. २ करिं० १३:१४. प्रग० १:४,५.

प्र० ५. ज्या अर्थी ईश्वर एक आहे त्याच अर्थी तो त्र्यैकहि आहे कीं काय?

उ० असें नाहीं. तो व्यक्तिपर्यायेंकरून त्र्यैक आहे आणि तत्वेंकरून एक आहे. यास्तव तो एका अर्थी एक आहे आणि दुसऱ्या अर्थी त्र्यैक आहे. तरी जसें हिंदु-

शास्त्रांतील ब्रह्म, प्रारंभीं एक असतां त्याच्या त्रिगुणांचा क्षोभ होऊन, मग त्यापासून ब्रह्मा विष्णु आणि महेश हे तीन देव झाले ह्मणून सांगितलें आहे, आणि तें एकच ब्रह्म त्रिरूपें नटलें आहे, आणि त्या त्रिमूर्त्तींमध्यें कांहीं भिन्नता नाहीं असेंहि पुन्हा वर्णिलें आहे; तसें ख्रिस्ती शास्त्रांतील ईश्वराचें त्र्यैकपण नाहीं. एका ईश्वरामध्यें तीन व्यक्ति आहेत, आणि त्या तीन व्यक्ति भिन्न व्यक्ति असतां, त्या तिहीं मिळून एक ईश्वर आहे. असा जो ईश्वराच्या असण्याचा प्रकार आहे, तो अलिकडे झालेला नसतां, सनातन आहे आणि त्यांत कांहीं पालट कधीं व्हावयाचा नाहीं. १ योहा० ५:७. २ करिं० १३:१४. याको० १:१७.

प्र० ६. मृन्मय शरीर, प्राणमय जीव आणि विवेकमय आत्मा अशा तीन भिन्न प्रकारानी मनुष्य बनला आहे, त्या तीन प्रकारांमिळून जसा मनुष्य एक आहे, तसा बाप, पुत्र, पवित्र आत्मा या तिहींमिळून ईश्वर एक आहे, असी उपमा ईश्वराच्या त्र्यैकपणाचा अर्थ समजावण्यासाठीं लावणें योग्य आहे कीं काय ?

उ० अगदीं योग्य नाहीं. कारण मनुष्यामध्यें हे जे तीन प्रकार कल्पिले आहेत, त्या सर्वांची केवळ एकच व्यक्ति होती. आणि त्या व्यक्तीला लाक्षणिक अर्थानें जें बोलणें, तें खेरीज करून आपणाविषयीं प्रथम पुरुषीं मात्र बोलतां येतें. परंतु ईश्वराच्या त्र्यैकपणामध्यें ज्या तीन व्यक्ति आहेत, त्या स्वतंत्र कर्त्ते असतां त्यांतील प्रत्येकास समजणें, इच्छिणें व क्रिया करणें, यांची पूर्ण शक्ति आहे; असें समजून त्या परस्परांस मी, तूं, तो, असें भिन्नपुरुषरूपें

बोलतात. यास्तव ही उपमा त्यांस अगदीं लागत नाहीं. १ पेत्र. १:२.

प्र० ७. ईश्वर एकच व्यक्ति असतां उत्पन्न करणारा, तारणारा, आणि पवित्र करणारा अशा तीन वेगळाल्या संज्ञानी तो आपणास प्रगट करून, ह्या तीन प्रकारच्या हुद्यांचीं कामें करितो, असा ईश्वराच्या त्र्यैकपणाचा अर्थ धरणें योग्य आहे काय ?

उ० अगदीं अयोग्य आहे. कारण असा अर्थ धरल्यास ईश्वराच्या त्र्यैकपणांतील तीन व्यक्ति केवळ नावाच्या मात्र आहेत, आणि खरोखर भिन्न व्यक्ति नव्हत असें ठरेल. मग ईश्वराच्या त्र्यैकपणांतील व्यक्तीला परस्परांविषयीं मी, तूं, तो, असें त्रिपुरूषरूपें बोलतां येणार नाहीं. परंतु वर सांगितल्याप्रमाणें ईश्वराच्या त्र्यैकपणांतील तीन व्यक्ति भिन्न व स्वतंत्र कर्त्ते अशा आहेत, ह्मणून सदरीं सांगितल्या-प्रमाणें अर्थ धरणें अयोग्य आहे. १ पे० १:२.

प्र० ८. ईश्वराच्या त्र्यैकपणांतील तीन व्यक्ति भिन्न आहेत, ह्मणून वियुक्तहि आहेत कीं काय ?

उ० असें नाहीं. जरी त्या भिन्न आहेत तरी त्या वियुक्त नाहींत. जसा मनुष्याचा देह त्याच्या आत्म्यापासून भिन्न आहे तरी वियुक्त नाहीं; किंवा जशा मनाच्या शक्ति मनाहून भिन्न आहेत, तरी त्या वियुक्त नाहींत, तसेंच ईश्व-राच्या त्र्यैकपणांतील तीन व्यक्ति, जरी भिन्न व स्वतंत्र कर्त्ते आहेत, तरी त्या परस्परापासून वियुक्त नाहींत.

प्र० ९. ईश्वराच्या त्र्यैकपणांतील व्यक्तीमध्यें कांहीं उंचनीचपणा आहे काय ?

उ० ईश्वराच्या त्र्यैकांतील तिन्ही व्यक्ति अधिकाराने

व महत्वानें अगदी समान आहेत. आणि वास्तविक पाहिल्यास त्यांमध्यें कांहीं उंचनीचपणा नाहीं. तरी मनुष्यासाठीं तारणोपाय करण्याच्या कामामध्यें जीं वेगळालीं कामें ह्या तिघांनीं चालविलीं, त्या कामांच्या वेगळाल्या प्रकारांवरून शास्त्रामध्यें त्यांस भिन्न पदव्या लाविल्या आहेत. या अर्थानें पवित्र आत्मा हा, बाप व पुत्र यांचा अंकित असा दर्शविला आहे, आणि पुत्र हा बापाचा अंकित असा दर्शविला आहे. आणि त्याप्रमाणें पुत्र, बापाच्या आज्ञा पाळितो व पवित्र आत्मा हा बापाच्या व पुत्राच्या आज्ञा पाळितो असें दर्शविलें आहे. परंतु हा उंचनीचपणा केवळ तारणोपायाच्या कामाचे जे वेगळाले हुद्दे ह्या त्रिवर्गांनीं चालविले त्यांपरत्वें मात्र आहे. वास्तविक पाहिल्यास त्यांमध्यें कांहीं उंचनीचपणा नाहीं. योहा० १४:२६. योहा० १५:२६.१योहा० ४:९.

प्र० १०. देवपणांतील दुसरा जो पुत्र तो ईश्वर व मनुष्यहि आहे कीं काय?

उ० होय त्याच्या ठायीं पूर्ण ईश्वरी प्रकृति आहे, आणि पूर्ण मानवी प्रकृतिहि आहे; ह्मणजे मानवी देह आणि मानवी आत्मा आहे. असा तो द्विविध प्रकृतीचा व्यक्ति आहे. त्याच्या ठायीं ईश्वरी आणि मानवी ह्या दोन्ही प्रकृति अशा संयुक्त झाल्या आहेत कीं त्या वियुक्त होऊन दोन भिन्न स्वतंत्र कर्त्ते अशा होऊं शकत नाहींत, तथापि तो असा द्विविध व्यक्ति होण्यांत, ईश्वरी प्रकृति पालटून मानवी झाली, किंवा मानवी प्रकृति पालटून ईश्वरी झाली, किंवा ह्या दोन्ही प्रकृति मिश्रित होऊन अभिन्न झाल्या, असेंहि नाहीं. तर ख्रीस्ताची ईश्वरी आणि मानवी प्रकृति

यांचा संयोग अशा प्रकारें झाला आहे कीं, त्या उभय प्रकृतींचे आपापले गुण व धर्म न पालटतां, तो त्या दोहों प्रकृति मिळून एक संयुक्त व्यक्ति असा झाला आहे. जसें आपण मनुष्याविषयीं बोलत असतां कधीं त्याच्या शरिराविषयीं मात्र बोलतों व कधीं त्याच्या आत्म्याविषयीं मात्र बोलतों आणि कधीं शरीर व आत्मा ह्या दोहोंमिळून जो एक मनुष्य त्याविषयीं बोलतों; तसें शास्त्रांतहि कधीं ख्रीस्ताच्या मनुष्यपणाविषयीं मात्र व कधीं त्याच्या ईश्वरपणाविषयीं मात्र व कधीं ह्या दोन्ही प्रकृति मिळून जो एक ख्रीस्त आहे त्याविषयीं सांगितलेलें आहे. आणि अशा प्रकारें सांगत असतां ख्रीस्ताच्या एका प्रकृतीचे गुणधर्म त्याच्या दुसऱ्या प्रकृतीस लावण्यांत येतात. यास्तव शास्त्रांतील ज्या वाक्यांत त्यास ईश्वरी गुण स्वभाव व कर्में लाविलीं आहेत तीं वाक्यें त्याच्या ईश्वरी प्रकृतीस लागतात; आणि ज्या वाक्यांमध्यें त्यास मानवी गुण स्वभाव व कर्में लाविलीं आहेत तीं वाक्यें त्याच्या मानवीपणास लागतात असें समजावें. मानवी प्रकृति व ईश्वरी प्रकृति ह्या संयुक्त होऊन एक प्रकृति कसी झाली, आणि त्या एका व्यक्तीच्या ठायीं ज्या दोन प्रकृति आहेत त्या अमिश्रित राहून त्यांचे आपापले गुण धर्म काईम कसे राहतात हें समजणें आमच्या बुद्धीपलिकडे आहे खरें; तरी असें होणें असंभाव्य नाहीं हें आह्मास समजतें. मनुष्याचा आत्मा व देह हे दोन्ही भिन्न प्रकारचे असतां, संयुक्त होऊन एक मनुष्य झाला; तरी त्याच्या दोन्ही प्रकारांचे आपापले गुणधर्म तसेच काईम राहतात. बरें मनुष्यांतील आत्मा व शरीर हीं भिन्न प्रकारचीं असतां त्यांची एक व्यक्ति होणें जर असंभाव्य

वाटत नाहीं तर मानवी प्रकृति आणि ईश्वरी प्रकृति या दोन्ही संयुक्त होऊन ख्रीस्त ही एक व्यक्ति होणें असंभाव्य कां वाटावें? आणि त्याच्या ठायीं ह्या दोन प्रकृति असतां तो एक व्यक्ति आहे असें शास्त्रांत स्पष्टपणें दाखविलें आहे. यास्तव तो असी संयुक्त व्यक्ति आहे असा विश्वास धरणें योग्य आहे. योहा० १: १,१४. फिली. २: ६,७. कल. २:९. मात्थी १:२३. १ तिम० ३:१६. योहा० १०:३३.

प्र० ११. ख्रीस्ताच्या ठायीं पूर्ण मानवीपण होतें हें कशावरून समजतें?

उ० त्याच्या ठायीं खरोखर आणि पूर्ण मानवी प्रकृति होती हें पुढें सांगतों त्या गोष्टींवरून उघड आहे. (१) तो स्त्रीपासून झाला. (२) त्याला मानवी शरीर आणि मानवी आत्मा होता आणि पाप खेरीज करून दुसऱ्या सर्व गोष्टींविषयीं तो इतर मनुष्यांसारिखा होता. (३) ईश्वराने त्यास विधिसंबंधी व नीतिसंबंधी सर्व ईश्वरी आज्ञा पाळणें अवश्य केलें, आणि त्याने त्या सर्व पाळल्या. (४) तो ज्ञानांत व शक्तींत आणि देवाच्या व माणसाच्या कृपेंत वाढला. (५) त्याला दुसऱ्या मनुष्यांसारिखी भूक तहान लागली, आणि त्याने खाल्लें व पिलें. (६) तो दुःखित झाला, थकला व शिणला, आणि मर्त्य असून, शेवटीं मारला गेला. (७) त्याला मनुष्य व मनुष्याचा पुत्र अशा संज्ञा शास्त्रांत लाविल्या आहेत. या सर्वांवरून उघड दिसतें कीं जरी तो ईश्वर होता, तरी तो मनुष्यहि होता. गाला० ४:४ इब्री ७:२६. फिली० २:६. लु० २:५२. मात्थी. ४२. योहा० १९:२८. मार्क. २:१६. योहा० ४:७. लु० २४:३२. योहा० ४:६. मार्क. १५:३७. १ तीम० २:५. योहा० ३:१३.

प्र० १२. ख्रीस्ताच्या ठायीं मानवी व ईश्वरी प्रकृतीचा जो संयोग झाला, तो सर्वकाळपर्यंत तसाच राहील कीं काय?

उ० असें दिसतें कीं तो संयोग सर्वकाळपर्यंत तसाच राहील. तथापि त्याचें मानवीपण गौरवी अवस्थेंत राहिल. फिलिप्प० ३:२०,२१.

प्र० १३. आह्मास ईश्वराच्या त्र्येकपणाचा सिद्धांत कांहीं प्रकारें दुर्बोध्य आहे कीं काय?

उ० हा सिद्धांत आमच्या बुद्धीस अत्यंत गहन आणि गूढ आहे खरा. तरी तो आमच्या बुद्धीस असंगत किंवा असंभाव्य वाटण्याजोगा नाहीं. कारण वास्तवीक पाहिलें तर ईश्वराचा त्र्येकपणा हा त्याचें अस्तित्व किंवा गुण यांहून अधिक गहन किंवा दुर्बोध्य आहे असें नाहीं. आणि जसें ईश्वराचें अस्तित्व व गुण आमच्या अल्प व सांत बुद्धीस दुर्बोध्य व गहन आहेत, तसाच त्याचा त्र्येकपणाहि आह्मास गहन व दुर्बोध्य असावा, यांत कांहीं असंगत नाहीं. परंतु आह्मा कालच्या अल्पमति प्राण्यांस, अनाद्यनंत ईश्वराच्या असण्याचा प्रकार व त्याचे अनंत गुण हे पूर्णपणें समजावे असें मत मात्र अयुक्तिक आणि असंगत दिसतें. १ तिम० ३:१६. इयो० ११:१७.

प्र० १४. आह्मास ईश्वराच्या त्र्येकपणाचा सिद्धांत कोणत्या गोष्टीविषयीं गूढ व दुर्बोध्य आहे?

उ० देवपणांत तीन ईश्वरी व्यक्ति आहेत, या गोष्टी-विषयीं तो सिद्धांत गूढ किंवा दुर्बोध्य नाहीं. कारण देव-पणांत अशा तीन व्यक्ति आहेत, हें शास्त्रामध्यें अगदी स्पष्टपणें दाखविलें आहे. परंतु एका देवपणांत तीन ईश्वरी

व्यक्ति असणें व त्या तीन व्यक्ती मिळून एकच ईश्वर असणें, असा जो ईश्वराच्या असण्याचा प्रकार तो मात्र आह्मास गहन व दुर्बोध्य आहे.

प्र० १५. ईश्वराचा त्र्येकपणा समजण्यास गहन व गूढ आहे ह्मणून आह्मी त्याविषयींचा शास्त्रबोध अमान्य करून अव्हेरावा कीं काय?

उ० असें करणें अगदीं अयोग्य आहे. कारण ईश्वराविषयीं जी गोष्ट आह्मी पुरतेपणीं समजूं शकत नाहीं, ती नाकबूल करावी असा नेम धरल्यास, त्याचें अस्तित्व गुण आणि बहुत कामें व तीं करण्याचे त्याचे मार्ग, जे आह्मी पुरतेपणीं समजूं शकत नाहीं, तेहि आह्मास नाकबूल करावे लागतील; कारण तें सर्व त्याच्या त्र्येकपणासारिखेच गहन व दुर्बोध्य आहेत. यास्तव आह्मासारिखे अल्पमति आणि पतित अवस्थेच्या आणि अंधारांत बुडालेल्या अज्ञानी व भ्रमिष्ट प्राण्यांस हेंच शोभतें कीं, ईश्वर आपल्या शास्त्रद्वारें जें कांहीं शिकवितो, तें आह्मी विश्वासाने मान्य करावें. परंतु जर आह्मी ईश्वरी बोध दुराग्रहाने अमान्य करूं, तर आह्मी अविश्वासाच्या दंडास पात्र होऊं.

प्र० १६. जर ख्रीस्त ईश्वर नसला तर त्याला जे भजतात ते मूर्त्तिपूजक होतात कीं नाहीं?

उ० होय, जर ख्रीस्त ईश्वर नसला तर त्याला भजणें हें, कुमारी मार्या, आणि दुसरे साधु आणि मानलेले वीर यांस किंवा काष्ट पाषाणादीच्या मूर्त्तींस भजणें, यासारिखीच मूर्त्तीपूजा आहे. कारण कीं जो खरोखर ईश्वर आहे त्यावांचून दुसरा कोणीहि ईश्वरी भजनास योग्य नाहीं. निर्ग० २०:३–५. मात्थी ४:१०.

प्र० १७. देवपणांतील तीन व्यक्तींतील प्रत्येक जण ईश्वरी भजनास योग्य आहे कीं काय?

उ० होय, ईश्वराच्या त्र्येकांतील प्रत्येक व्यक्ति, ईश्वरी भजनास पूर्णपणें योग्य आहे. कारण (१) त्या त्र्येकांतील प्रत्येक व्यक्ति खरोखर आणि पूर्णपणें ईश्वर आहे. आणि त्यांतील प्रत्येक व्यक्तीस ईश्वरी भजन समर्पिल्याचे दाखले शास्त्रांत आहेत. आणि (२) विचार करून पाहिल्यास समजतें कीं ईश्वराचें भजन जर करणें आहे, तर त्याच्या असण्याचा प्रकार जाणून त्याप्रमाणें त्यास भजण्याने त्याचें विशेष गौरव होतें. कारण ईश्वर जसा आपले गुण व कामें यांवरून तसाच आपल्या असण्याच्या प्रकारावरूनहि सर्व उत्पन्न झालेल्या प्राण्यांहून वेगळा आणि श्रेष्ठ आहे. आणि आमचा तारणोपाय करण्याच्या कामाचे जे वेगळाले भाग ह्या तिघानी चालविले, त्यांमुळें तर आह्मी त्या तिहीं व्यक्तींस ईश्वरी भजन समर्पावें हें फारच योग्य आणि अवश्य दिसतें. १ पेत्र० १:२. २ करिं० १३:१४.

प्र० १८. तर ईश्वराच्या त्र्येकपणाचा सिद्धांत जाणणें व विश्वासणें फार अगत्य आहे कीं काय?

उ० होय, फार अगत्य आहे. आमच्या उद्धाराचा उपाय करण्यासाठीं ईश्वराचें हें त्र्येकपण किती अवश्य व सयुक्तिक दिसतें, हें पाहिल्यास हा सिद्धांत फार अगत्याचा वाटतो. वास्तविक पाहिल्यास शुभवर्त्तमानाचा सर्व पाया याच सिद्धांतावर आहे. यास्तव हा सिद्धांत ख्रिस्ती धर्माचा फार अवश्यक आणि भारी सिद्धांत आहे असें समजलें पाहिजे.

---

## प्रकरण ५.

# ईश्वराच्या योजना.

प्र० १. ईश्वरी योजना ह्मणजे काय?

उ० जें कांहीं घडतें त्याविषयीं, ह्मणजे ज्या सर्व वस्तु, प्राणी आणि गोष्टी झाल्या आहेत व होत आहेत व होणार आहेत, त्यांविषयीं ज्या अपालट इच्छा, बेत अथवा संकेत ईश्वराने पहिल्यापासून केले आहेत, त्यांस ईश्वरी योजना ह्मटलें आहे.

प्र० २. ईश्वराच्या योजना ह्या, जें कांहीं घडतें त्यांतील अमुक गोष्टीस मात्र विशेषें लागतात आणि दुसऱ्या गोष्टींस लागत नाहींत असें आहे कीं काय?

उ० असें नाहीं. जें कांहीं घडतें त्यांतील सर्व आणि प्रत्येक गोष्टीस ईश्वरी योजना लागतात. ह्मणजे जसें कार्याविषयीं तसें त्याच्या कारणाविषयीं, आणि जसें परिणामाविषयीं तसें त्याच्या साधनाविषयीं आणि जसें स्वतंत्र कर्त्यांच्या इच्छांविषयीं तसे त्याचे हेतु व प्रयोजनें यांविषयीं ईश्वराने योजना केल्या आहेत. साकार ह्मणजे जड सृष्टि, आणि निराकार ह्मणजे मानसिक सृष्टि, यांतील प्रत्येक गोष्टीविषयीं सलगरूपें ह्मणजे सर्व गोष्टींचा विचार एकदम मनांत आणून त्याप्रमाणें ईश्वर आपल्या योजना करितो.

प्र० ३. निवडण्याविषयींच्या ईश्वरी योजना ह्मणजे काय?

उ० मनुष्य जातींतील अमुकानीं आत्म्याच्या पवित्र करण्याने आणि खरेपणाच्या विश्वासाकडून तारणाऱ्याच्या योगाने तारण पावावें. परंतु बाकीचे जे मनुष्य आपले पापमार्ग न सोडितां त्यांत चालतात, आणि तारणाऱ्यावर वि-

श्वास ठेवून उद्धार प्राप्त करून घेण्याविषयीं जें आमंत्रण ईश्वराने आपल्या शुभवर्त्तमानामध्यें त्यांस दिल्हें आहे, तें स्वेच्छेने अव्हेरितात, त्यांनी आपल्या पापामुळें नाशास जावें असा जो ईश्वराचा ठराव किंवा बेत सनातन काळापासून झाला आहे, त्याला निवडण्याविषयीं ईश्वरी योजना ह्मटलें आहे. या योजनांप्रमाणें जे तारण पावतात, ते तारणोपाय स्वीकारल्यावरून न्यायीकृत होण्याने आणि विश्वास धरण्याकडून पवित्र होण्याने तारण पावतात. आणि जे नाश पावतात ते पाप न सोडल्यामुळें आणि तारणोपाय न स्वीकारल्यामुळें नाश पावतात. नुसता निवडला असल्यावरून कोणी तारण पावतो असें नाहीं, पण तो तारणाऱ्याला अंगीकारितो आणि शुभवर्त्तमानांत सांगितल्याप्रमाणें उपाय करितो ह्मणून तो तारण पावतो. तसेंच नुसता निवडला नसल्यामुळें कोणी नाश पावतो असें नाहीं. पण तो पापी असल्यावरून आणि तारणाऱ्याला न अंगीकारल्यावरून नाश पावतो असें आहे.

प्र० ४. मनुष्याच्या तारणाविषयीं ईश्वराच्या ज्या योजना आहेत, त्या सांकेतीक आहेत अथवा असांकेतीक आहेत? ह्मणजे अटीच्या आहेत किंवा बिनअटीच्या आहेत?

उ० त्या सांकेतीक ह्मणजे अटीच्या आहेत. परंतु मनुष्य जातींतील अमुक, पुढें पश्चात्ताप करून विश्वास ठेवितील आणि चांगलीं कर्में करितील हें पूर्वज्ञानाने जाणून त्यावरून ईश्वराने त्यांस निवडिलें; आणि बाकीचे मनुष्य असें करणार नाहींत हें पूर्वज्ञानाने जाणून त्यावरून ईश्वराने त्यांस अव्हेरिलें, असा त्या अटीचा अर्थ नाहीं. परंतु ख्रीस्त जो तारणारा तो पाप्यांसाठीं प्रायश्चित्त व मध्यस्तीं करील

आणि निवडलेले मनुष्य आपल्या पापांचा पश्चात्ताप करून ख्रिस्तावर विश्वास ठेवितील, आणि त्याच्या आज्ञांप्रमाणें चालतील त्यामुळें ते तारण पावतील; आणि जे निवडलेले नाहींत ते मनुष्य त्याजवर विश्वासणार नाहींत व पाप सोडणार नाहींत, त्यामुळें नाशास जातील असा त्या अटीचा अर्थ आहे. तथापि जे तारण प्राप्त करून घेण्यासाठीं पश्चात्ताप करून विश्वास ठेवितात, ते असें करण्यानें कांहीं पुण्य करितात आणि त्यामुळें निवडले जाऊन तारण पावतात असें नाहीं. ईश्वराने जें त्यांस निवडलें तें शुद्ध कृपेने निवडलें आहे, आणि त्याच्या कृपेनेच ते तरतात.

प्र० ५. सर्व वस्तु आणि प्राणी यांच्या अस्तित्वाविषयीं व सर्व गोष्टींच्या घडण्याविषयीं आणि विशेषेंकरून मनुष्यांच्या मरणोत्तरस्थितीविषयीं, ईश्वराने अगोदर योजना करून ठेविल्या आहेत हें कशावरून समजतें?

उ० या सृष्टीसंबंधीं जीं कांहीं कामें ईश्वर करितो त्यांविषयीं त्याने पूर्वीं योजना केल्या असाव्या हें पुढील विचारांवरून उघड दिसतें. (१) प्रथम हा कीं, कोणताहि सबुद्ध प्राणी आपल्या कामांविषयीं पूर्वीं योजना करितो मग तीं कामें करितो. तसेंच ईश्वरहि सृष्टीची उत्पत्ति रक्षण चालविणें आणि व्यवस्था यांविषयीं जीं कांहीं कामें करितो त्यांविषयीं त्याने पूर्वीं कांहीं योजना केल्या असाव्या. (२) अणखी सबुद्ध प्राणी कामें करण्यापूर्वीं तीं कसीं व केव्हां करावीं याविषयीं जसी योजना करितात, तसेंच तीं अमुक कार्यें घडविण्याच्या हेतूस्तव करावीं असाहि उद्देश करीत असतात. त्याप्रमाणें ईश्वरहि सृष्टीसंबंधीं जीं कांहीं कामें करितो, तीं केव्हां कसीं करावीं

याविषयीं जसी पूर्वीं योजना करितो, तसेंच तीं अमुक कार्यें घडविण्याच्या उद्देशानें करावीं असी योजना करितो, हें उघड आहे. (३) ईश्वराला सर्व गोष्टींचें पूर्वज्ञान आहे. परंतु त्याचें पूर्वज्ञान अचूक आणि निश्चित आहे, ह्मणून जें कांहीं निश्चित नाहीं, त्याविषयींचें पूर्वज्ञान ईश्वराला होऊं शकत नाहीं. आणि जें कांहीं घडावें असी ईश्वराची इच्छा किंवा योजना नाहीं तें घडण्याचा निश्चयहि होऊं शकत नाहीं. यास्तव जर ईश्वराला सर्व गोष्टींचें पूर्वज्ञान आहे, तर त्यानें त्यांविषयीं पूर्वीं योजनाहि केल्या आहेत असें सिद्ध होतें. (४) आणि ईश्वरानें सर्व गोष्टींविषयीं पूर्वीं योजना केल्या आहेत असें शास्त्रांत स्पष्टपणें सांगितलें आहे. प्रे०. १५:१८. यशा. १४:२४,२६,२७. ४६:१०. नीति १९:२१. इयो. १४:५. प्रे० १७:२६. गीत ३३:११. प्रे० २:२३.१३:४८. एफे. १:४, ५, ९, ११. २:१०. ३:११. रोम. ८:२८, ३०. ९:११-१६. ११:५, ७. २ तिम. १:९. २:१९. १ थेस. ५:९. २ थेस. २:१३. १ पेत्र. १:२. २:८. २ पे. १:१०. योहा. १३:१८. १५:१६, १९.

प्र० ६. ईश्वर आपल्या योजना कशा सिद्धीस नेतो?

उ० सर्व जें कांहीं होतें तें उत्पन्न करण्यानें, त्यांचा सांभाळ करण्यानें, त्यांस चालविण्यानें आणि त्यांची व्यवस्था करण्यानें तो आपल्या योजना सिद्धीस नेतो. कारण कीं सर्व प्राणी, वस्तु आणि गोष्टी, ज्या ह्या सृष्टीमध्यें होतात, त्या ईश्वराची इच्छा बेत किंवा ठराव यावांचून होऊं शकत नाहींत. यास्तव आपल्या योजना सिद्धीस जातील अशा रीतीनें ईश्वर त्या सर्व गोष्टी घडवितो आणि

चालवितो. प्रे०. ४:२७,२८. लुका २२;२२. योहा. १७:२,६,९. यशा. १४:२४,२७. गीत ११५:३.

**प्र०** ७. ईश्वराने सर्व गोष्टींविषयीं आणि मनुष्यांच्या सर्व कर्मांविषयींहि पूर्वींच योजना करून ठेविल्या आहेत, यावरून मनुष्याची मानसिक स्वतंत्रता नाहींसी होती किंवा त्याची जबाबदारी जाती, किंवा ते आपल्या बऱ्या वाईट कर्मांप्रमाणें स्तुतीस किंवा दोषास पात्र नाहींत असें होतें कीं काय?

उ० असें अगदीं नाहीं. कारण जरी मनुष्यांच्या सर्व कर्मांविषयीं ईश्वराने पूर्वींपासून योजना करून ठेविल्या आहेत, तरी मनुष्य आपल्या कर्मांत अनात्मीक यंत्रासारिखा नाहीं. मनुष्याने सर्व हेतु व कारणें मनांत आणून जसें आपल्या इच्छेस येईल तसें वागावें हीच मनुष्याची मानसिक स्वतंत्रता आहे. आणि प्रत्येक मनुष्याचें मन त्यास साक्ष देतें कीं जें कांहीं आपण करितों, तें सर्व हेतु व कारणें मनांत आणून जसें आपल्या इच्छेस येतें, तसेंच आपण करितों. आणि कोणतेंहि मानसिक कर्म आह्मी जुलमाने किंवा बळात्काराने करीत नाहीं. अणखी विचार केल्यावरून उघड दिसतें कीं ईश्वराने केलेल्या योजनांवरून आमच्या मानसिक स्वतंत्रतेला कांहीं अडथळा होण्याजोगा नाहीं. कारण कीं ईश्वराने कोणत्याहि गोष्टींविषयीं केलेल्या योजना, ईश्वराने स्वतां आह्मास पूर्वीं कळविल्यावांचून कळत नसतात. यास्तव आमचें कोणतेंहि कर्म आह्मी केल्यापूर्वीं त्याविषयींची ईश्वरी योजना कसी होती हें आह्मास समजूं शकत नाहीं. आणि आमच्या अमुक कर्मांविषयीं ईश्वरी

योजना कशी आहे, हें आह्मास ठाऊक नसतां, आमच्या इच्छेप्रमाणें वर्त्तण्याविषयीं त्या योजनेवरून कसा प्रतिबंध होईल? होऊं शकत नाहीं. आणि ज्यापेक्षां मनुष्य आपलीं सर्व कामें आपल्याच इच्छेप्रमाणें पूर्ण स्वतंत्रतेने करितात, त्यापेक्षां त्यावरून ते स्तुतीस किंवा दोषास पात्र व्हावे हें यथार्थच आहे, आणि त्या कर्मांची पूर्ण जबाबदारी त्यांजवर आहे. लुका २२:२२ प्रे०. २:२३. यशा. ६६:३.

प्र० ८. ईश्वरी योजनांविषयीं जो सिद्धांत आतां स्थापित झाला आहे, त्यावरून शुभवर्त्तमानांत सांगितल्या रितीने आपलें तारण प्राप्त करून घेण्याविषयीं कोणाला कांहीं निराशा होण्याजोगी आहे कीं काय?

उ० अगदीं नाहीं. जर माझें तारण व्हावें असी ईश्वराची योजना असेल तर मी उपाय केले किंवा न केले तरी मी तरेनच; आणि जर माझा नाश व्हावा असी ईश्वरी योजना असेल तर मी कितीहि उपाय केले किंवा न केले तरी मी नाश पावेनच; यास्तव मला आपलें तारण प्राप्त करून घेण्यासाठीं कांहीं उपाय करण्याचें अगत्य व उपयोग नाहीं; असें मत फार असंगत, खोटें आणि दुष्ट बुद्धीचें आहे. हें मत अगदीं असंगत आहे, कारण कीं कार्यें घडून येण्याचे उपाय किंवा साधनें जीं केल्यावांचून तीं कार्यें घडूं नयेत असा ईश्वराचा निश्चित नेम आहे, ते उपाय हें मत तुच्छ करितें. आणि हें मत खोटें आहे कारण कीं हें मत सृष्टिक्रमासीं आणि ईश्वरी सूत्रासीं आणि शास्त्रांतील बोधासीं अगदीं विरुद्ध आहे. हें मत दुष्ट बुद्धीचें आहे, कारण कीं ईश्वराला

दोषी ठरवून पाण्यास निर्दोष ठरवावें असा या मताचा अभिप्राय आहे. यास्तव या मताचा अंगीकार कोणी करूं नये व याप्रमाणें कोणी चालूं नये. कारण ईश्वराच्या सर्व योजना सहउपाय आहेत; ह्मणजे गोष्ट किंवा कार्य घडण्याविषयीं योजना करितांना ती गोष्ट किंवा तें कार्य जेणेंकडून घडावें त्या उपायाचीहि योजना ईश्वराने केली आहे. कार्य आणि कारण यांचा असा दृढ संबंध ईश्वराने करून ठेविला आहे कीं उपायावांचून कार्य होऊं नये आणि उपाय केले असतां, कार्य झाल्यावांचून राहूंच नये. हा कार्यकारणांचा नेम जसा शेतकरी कारागीर विद्यार्थी इ०स लागतो तसाच तारण प्राप्त करून घेणाऱ्यासहि लागतो. अमुक शेतकऱ्यास पीक देण्याची योजना करितांना ईश्वराने असेंहि ठरविलें आहे कीं शेतकऱ्याने नांगरावें पेरावें आणि तशाने पीक पावावें. ईश्वराने पीक देण्याची किंवा न देण्याची योजना केली आहे त्याप्रमाणें घडेल; असें समजून आपणास नांगरणें पेरणें इ० उपाय करण्याचें अगत्य नाहीं असें कोणी शेतकऱ्याने ह्मटल्यास सर्व त्यास मूर्ख ह्मणतील. कां कीं कारणावांचून कार्य व्हावें असें ईश्वराने योजलेंच नाहीं. आणि मनुष्याच्या तारणाविषयीं ईश्वराने पूर्वीं योजना केल्या आहेत ही गोष्ट जितक्या प्रकारें निश्चित आहे, तितक्याच प्रकारें ही गोष्ट निश्चित आहे कीं, जो कोणी पश्चात्ताप करून तारणाऱ्यावर विश्वास ठेवील आणि त्याच्या आज्ञा पाळील, त्याचें तारण होईल. यास्तव मनुष्याच्या तारणाविषयीं ईश्वराने पूर्वीं योजना करून ठेविल्या आहेत, ह्या सिद्धांतावरून तारण प्राप्त करून घेण्याचे उपाय

करण्याविषयीं कोणास निराशा होण्याचें कारण नसतां, उलटें यत्न करून पाहण्याचें उत्तेजन आहे. जसें पीक द्यावें किंवा न द्यावें याविषयींच्या ईश्वराच्या योजना झालेल्या आहेत हें समजून शेतकऱ्यास पेरणी करण्याची निराशा होत नाहीं पण उत्तेजन होतें, तसेंच मनुष्याच्या तारणाविषयीं ईश्वराने पूर्वीं योजना करून ठेविल्या आहेत हें समजल्यानेहि मनुष्यास तारण प्राप्त करून घेण्याचे उपाय करण्याचें उत्तेजन होतें. प्रे० २७:२३,२४,३१.

प्र० ९. आह्मी आपलीं कर्मे ईश्वराच्या योजनांकडे पाहून करावीं किंवा ईश्वराच्या आज्ञांकडे पाहून करावीं?

उ० आह्मी आपलीं सर्व कर्मे केवळ ईश्वराच्या आज्ञाप्रमाणें करावीं. कारण ईश्वराच्या योजना ज्या आह्मास कार्य घडण्यापूर्वीं कळत नसतात, त्या आमच्या कर्मांचे नियम आहेत असें नाहीं. पण ईश्वराच्या आज्ञा ज्या त्याने आपल्या शास्त्रद्वारें स्पष्टपणें कळविल्या आहेत त्या आज्ञा आमच्या कर्मांचे नियम आहेत. यास्तव आह्मी आपलीं सर्व कर्मे ईश्वराच्या आज्ञांकडे पाहून करावीं. अनु. २९:२९.

प्र० १०. आह्मी ईश्वराच्या योजनांविषयीं कसा समज धरावा आणि त्यांविषयीं काय मानावें?

उ० त्या योजना ईश्वराने स्वछंदाने दुराग्रहाने किंवा उगाच योग्य कारणावांचून केल्या आहेत, असें आह्मी कधींहि मानूं नये. परंतु त्या योजना ईश्वराने आपलें अपार चातुर्य आणि चांगूलपण यांकडून सर्वोत्तम कारणांवरून व उत्तम आणि परमहितावह असीं कार्यें घडविण्याच्या उद्देशाने योजल्या आहेत, असें समजावें. जरी त्या

योजना योग्य व हितावह कशा आहेत, हें आमच्या अल्प मतीस समजत नसलें, तरी त्यावरून आह्मी त्या योजनांचा धिःकार करावा किंवा त्यावरून ईश्वरास दोष लावावा हें अगदीं अयोग्य आहे. यास्तव ईश्वराच्या सनातन योजनांविषयींचा हा सिद्धांत आह्मी मोठ्या भिडेने, नम्रतेने, आणि मान्यबुद्धीने मानावा.

प्र० ११. ईश्वरी योजनांविषयींचा हा सिद्धांत नवीन काढलेला आहे किं काय ?

उ० नाहीं; तो पवित्र शास्त्राइतका जुना आहे, आणि सर्व खरे व सुधारलेले ख्रिस्ती मंडळ्यांच्या विश्वासप्रकरणांत हा सिद्धांत अढळतो.

प्र० १२. ईश्वरी योजनांविषयींचा हा सिद्धांत उपदेशकानीं लोकांस शिकवावा याचें अगत्य आहे किं काय ?

उ० होय; कारण कीं हा सिद्धांत लोकानी समजावा व मानावा ह्मणूनच ईश्वराने आपल्या शास्त्रांत प्रगट केला आहे. अणखी पापी माणसाच्या तारणाची आशा केवळ याच सिद्धांताच्या आधारावर आहे. कारण कीं जर पापी माणसाचें तारण ख्रीस्ताकडून करण्याविषयीं ईश्वराने योजना केल्या नसत्या, तर कोणी पापी कधीं तारण पावला नसता. यास्तव हा सिद्धांत सर्वांनी समजावा व अंगीकारावा याचें मोठें अगत्य आहे. इर्म. २६: २. २३: २८. यशा. ३०: ९, १०. २ तिम. ४: ३.

---

## प्रकरण ६.

# उत्पत्ति.

प्र० १. उत्पत्ति ह्मणजे काय?

उ० उत्पन्न करण्याची जी क्रिया तिला उत्पत्ति ह्मटलें आहे. ती असामोग्रीक आणि ससामोग्रीक अशा प्रकारची आहे. सामोग्रीवांचून ह्मणजे शून्यापासून उत्पन्न करणें यास असामोर्ग्रीक उत्पत्ति ह्मटलें आहे. आणि पूर्वीं उत्पन्न झालेल्या पदार्थांची सामोग्री घेऊन त्याचा कांहीं पदार्थ करणें, ह्मणजे पूर्वीं उत्पन्न झालेल्या पदार्थास रूपांतर करणें यास ससामोग्रीक उत्पत्ति ह्मटलें आहे. ही पृथ्वी प्रथम अस्ताव्यस्त स्थितीमध्यें उत्पन्न झाली, ती असामोग्रीक उत्पत्ति होय. आणि मनुष्यांचा देह प्रथम मातीचा घडला गेला ती ससामोग्रीक उत्पत्ति होय. ह्या प्रकारची उत्पत्ति करणें, रचणें ह्या शब्दांकडून दर्शविली आहे. उत्पत्ति १: १. २: ७.

प्र० २. उत्पत्तीच्या कामांमध्यें काय काय आहे?

उ० आकाश व पृथ्वी आणि ज्या सर्व वस्तु यांमध्यें आहेत त्या, ह्मणजे सर्व दृश्य व अदृश्य वस्तु व सर्व सजीव निर्जीव आणि सर्व सबुद्ध व अबुद्ध प्राणी; हीं उत्पत्तीचीं कामें आहेत. कल. १:१६.

प्र० ३. ह्या सर्व वस्तूंचा निर्माण करणारा कोण आहे?

उ० सर्वसमर्थ परमेश्वर आहे. उत्प. १:१.

प्र० ४. परमेश्वराने ह्या सर्व वस्तु कशा निर्माण केल्या?

उ० त्याने आपल्या सामर्थ्ययुक्त शब्दाने केल्या. ह्मणजे त्याने इच्छा मात्र केली आणि उत्पत्ति सिद्ध झाली.

उत्पत्ति करण्यासाठीं इच्छा करावी, ह्मणजे आपला मनोदय दाखवावा यावांचून दुसरें कांहीं ईश्वरास करावें लागलें नाहीं. इब्री ११:३. गीत ३३:६,९.

प्र० ५. ईश्वराने ह्या सर्व वस्तु किती दिवसांमध्यें उत्पन्न केल्या ?

उ० त्याने साहा दिवसांत ह्या सर्व वस्तु निर्माण केल्या. तरी जर त्यास योग्य दिसलें असतें, तर तो एका क्षणांत ह्या सर्व वस्तु निर्माण करण्यास समर्थ होता, यांत कांहीं संशय नाहीं. ह्या उत्पत्तीच्या वेगळाल्या भागांविषयीं ह्मटलें तर ते एकामागें एक असे अनुक्रमाने दर वेळेस थोडे थोडे झाले. तरी त्या प्रत्येक भागाची उत्पत्ति क्षणमात्रांतच झाली. त्याप्रमाणें जर ईश्वरास योग्य दिसलें असतें तर तो ह्या उत्पत्तीचे सर्वच भाग एकदम क्षणमात्रांत निर्माण करण्यास समर्थ होता, हें उघड आहे. उत्पत्ति १:३,११,२१,२५,२७. निर्ग, २०:११.

प्र० ६. जग उत्पन्न झाल्याला किती वर्षें झालीं ?

उ० सर्वांहून अचुक काळगणनेवरून समजलें आहे कीं प्रभु येशू ख्रीस्ताच्या जन्मापूर्वीं सुमारें ४००० वर्षें हें जग निर्माण झालें. ह्मणजे आतांपासून सुमारें ५८५० वर्षांमागें हें जग उत्पन्न झालें.

प्र० ७. ज्या काळीं हें जग उत्पन्न झालें, त्याच्या पूर्वीं झाल्याने कांहीं अधिक पवित्रता किंवा अधिक सुख जगांत झालें असतें किंवा कांहीं अधिक चांगले बेत सिद्धीस गेले असते असें आहे कीं काय ?

उ० असें अगदीं नाहीं. ज्या काळीं हें जग उत्पन्न झालें त्याच्या पूर्वीं हजार वर्षांमागें हें उत्पन्न व्हावें असें ज्या

कारणावरून दिसेल, त्याच कारणावरून हें त्याच्याहि पूर्वीं लाखो व अनंत वर्षांमागें व्हावें असें दिसेल. ह्मणजे ज्या काळीं हें जग झालें त्यापूर्वीं हजार किंवा लाख वर्षांमागें हें उत्पन्न व्हावें ह्मणून जीं कारणें सांगतां येतील, तींच कारणें, हें जग त्यापूर्वीं कोट्यावधी किंवा अनंत वर्षांमागें व्हावें याविषयीं सांगतां येतील. ज्या काळीं हें जग उत्पन्न झालें, त्याच काळीं कां झालें, आणि त्याच्या पूर्वीं किंवा त्याच्या नंतर कां झालें नाहीं याचीं योग्य कारणें ईश्वराला निःसंशय माहीत आहेत. परंतु तीं त्याने आह्मास कळविलीं नाहींत, ह्मणून आमच्याने त्यांविषयीं कांहीं ठराव करवत नाहीं.

प्र० ८. उत्पत्तींतील सर्व वस्तु ईश्वराने कोणत्या स्थितींत निर्माण केल्या?

उ० अगदी पूर्ण आणि यथासांग स्थितीमध्यें निर्माण केल्या. जें कांहीं ईश्वराने उत्पन्न केलें त्यांत ह्मणजे जड किंवा मानसिक उत्पत्तींतील कोणत्याहि वस्तूमध्यें कांहीं खोड, दोष किंवा अपूर्णता नव्हती. प्रत्येक वस्तु आणि प्रत्येक प्राणी पूर्ण, यथासांग आणि परिपक्व असा ईश्वराने उत्पन्न केला. आणि जेव्हां ही उत्पत्ति झाली तेव्हां इंतील प्रत्येक वस्तु एकदम अशा पूर्ण व परिपक्व स्थितीमध्यें उत्पन्न झाली कीं, ती लागलीच आपापल्या जातीचें बीज व संतति निपजावयास योग्य होती. उत्प. १: ३१.

प्र० ९. ह्या सर्व वस्तु ईश्वराने कशासाठीं निर्माण केल्या?

उ० पवित्रता आणि सुख उत्पन्न करण्यांत आपल्या सर्व गौरवी गुणांचें तेज प्रगट करण्याने आपल्या परोपका-

रिक बुद्धीची तृप्ति करण्यासाठीं त्याने ह्या सर्व वस्तु निर्माण केल्या. ईश्वराने आपले गुण प्रगट केल्यावांचून पवित्रता व सुख हीं कोणाला प्राप्त होऊं शकत नाहींत. आणि ईश्वराने आपले गुण प्रगट करून दाखविले असतां, पवित्रता आणि सुख हीं प्राप्त झाल्यावांचून राहत नाहींत, असें आहे. ह्मणून ह्या दोन्ही हेतूंस्तव ईश्वराने दूत, मनुष्य, व सृष्टींतील दुसऱ्या सर्व वस्तु निर्माण केल्या, असें उघड दिसतें. ईश्वराचें सर्वांहून मोठें गौरव आणि सृष्टीचें सर्वांहून मोठें हित, ह्या दोन गोष्टींचा फार निकट व दृढ संबंध आहे; ह्मणजे ईश्वराचें गौरव झाल्यावांचून सृष्टीचें हित व्हावयाचें नाहीं. आणि सृष्टीचें हित होण्याने ईश्वराचें गौरव झाल्यावांचून राहावयाचें नाहीं. रोम० ११: ३६. प्रग. ४:११. करि०१०:३१.१ नीति १६:४.

---

प्रकरण ७.

# ईश्वरी सूत्र.

प्र० १ ईश्वरी सूत्र ह्मणजे काय?

उ० सृष्टींतील वस्तुमात्रांस रक्षणें, वागविणें, अधिकृत करणें व व्यवस्थित करणें, असें जें कांहीं ईश्वर आपल्या मनोदयाप्रमाणें करितो त्यास ईश्वरी सूत्र ह्मटलें आहे.

प्र० २ असें ईश्वरी सूत्र सर्व सृष्टीमध्यें चालत आहे हें कशावरून समजतें?

उ० यावरून दिसतें कीं ह्या सृष्टींतील सर्व वस्तुमात्रांस रक्षणें, वागविणें, व्यवस्थित करणें व अधिकृत करणें, यांमध्यें जो नियमितपणा, मेळ, चातुर्य आणि चांगुलपणा दिसून येतो, त्याप्रमाणें या सर्व सृष्टीचें काम

चालविणें, हें ज्या ईश्वराने ही सृष्टी निर्माण केली, त्यावांचून दुसऱ्या कोणाच्याने करवणार नाहीं. कारण जसें ह्या सृष्टीच्या उत्पत्तीस अनंत सामर्थ्य अनंत ज्ञान व अनंत चांगुलपणा हे गुण अवश्य होते, तसेंच इचें रक्षण व अधिकार यांसाठींहि तेच अनंत गुण अवश्य आहेत, ह्मणजे तशाच अनंत गुणांनी युक्त अशा कर्त्यावांचून कोणाच्याने हें सूत्र चालवणार नाहीं, हें उघड आहे. (२) अणखी ज्यापेक्षां सृष्टींतील सर्व वस्तु निर्माण झालेल्या आहेत त्यापेक्षां त्या सर्व ईश्वरी सूत्रांच्या स्वाधीन असणें अवश्य आहे, कारण हरएक गोष्टीविषयीं स्वतंत्र असणें ह्मणजे स्वाधारावर व स्वसत्तेत असणें, हें एका अनादि ईश्वरावांचून दुसऱ्या कोणास नाहीं. ह्मणून ज्याने ह्या सर्व वस्तु उत्पन्न केल्या, त्याच्या सत्तेत ह्या असाव्या, ह्मणजे त्यांवर त्याचेंच सूत्र चालावें हें अवश्य आहे. (३) अणखी सर्व पृथ्वींतील सर्व पिढ्यांतले लोक, ही सृष्टि ईश्वरी सूत्राखालीं आहे, असा विश्वास आजपर्यंत धरीत आले आहेत. ह्मणून ह्या सृष्टीवर ईश्वरी सूत्र चालत आहे, हा सिद्धांत सर्व लोकांस प्रत्यक्ष प्रमाणासारिखा भासतोसें दिसतें. (४) अणखी ईश्वरी शास्त्रांत तर पूर्ण स्पष्टपणें शिकविलें आहे कीं, ही सृष्टि ईश्वरी सूत्राखालीं आहे. इब्री १:३. कल. १:१७. गीत १०३:१९. दानी. ४:३४; ३५. गीत १३५:६.

**प्र०** ३. ईश्वर आपलें सूत्र ह्या सृष्टीमध्यें कसें चालवितो?

उ० उपाय ह्मणजे साधनें यांच्या योगाने व उपायावांचूनहि चालवितो. जेव्हां तो उपायावांचून हें चाल-

वितो, तेव्हां दुसऱ्या वस्तूच्या साधनाचा उपयोग न करितां केवळ आपल्याच कृतीनें हें चालवितो. आणि जेव्हां साधनाच्या योगानें तो हें चालवितो, तेव्हां सृष्टींतील वस्तु व स्वतंत्र कर्त्ते यांचीं कामें तो अशीं घडवितो कीं, जरी ते स्वतंत्र कर्त्ते आपल्या खासगत इच्छेप्रमाणें आपलीं सर्व कामें करितात तरी ईश्वर त्यांस असें आवारतो किंवा प्रेरितो कीं, त्यांच्या सर्व स्वतंत्र कर्मांकडून ईश्वराचेच मनोदय सिद्धीस जातात. याप्रमाणें उपायावांचून किंवा उपायाच्या योगानें अशा दोन्ही प्रकारें ईश्वर आपलें सूत्र या सृष्टीमध्यें चालवितो.

प्र० ४. हें ईश्वरी सूत्र सृष्टींतील सर्व वस्तूंस साधारण रीतीनें जसें लागतें, तसेंच सृष्टींतील प्रत्येक वस्तूस पृथक पृथकहि लागतें कीं काय?

उ० होय, ईश्वराचें सूत्र ह्या सृष्टींतील सर्वांहून श्रेष्ठ दुतांस जसें लागतें, तसेंच ह्या पृथ्वींतील सर्वांहून सूक्ष्म व अल्प अशा किड्यांसहि लागतें, व जसें वस्तूच्या किंवा प्राण्याच्या जातीस लागतें, तसेंच त्यांतील प्रत्येक वस्तूस व प्रत्येक प्राण्यासहि लागतें. जसें सर्वांहून मोठ्या गोष्टीस तसें सर्वांहून लाहान गोष्टीसहि लागतें. ह्मणजे जगांतील राज्याच्या उलटापालटीस जसें, तसेंच एका चिमणीच्या पडण्याला आणि मस्तकाच्या केंसाच्या मोजण्यालाहि लागतें. सबुद्ध प्राण्याच्या बाह्य कृत्यांस जसें, तसेंच त्यांच्या मनांतील विचार भावना व वासना यांसहि लागतें. ह्मणजे सृष्टींतील सर्व प्राणी, वस्तु, आणि गोष्टी, हीं ईश्वरानें आपण स्वतां केलीं असोत किंवा उपायाच्या योगानें करविलीं असोत, किंवा स्वतंत्र कर्त्यांचीं कामें असोत, तरी

त्या सर्वांस सलगरूपें आणि प्रत्येकास पृथक् पृथक् रीतीने ईश्वरी सूत्र लागतें. ईश्वरी सूत्राबाहेर किंवा आपोआप ह्मणजे सहजगतीने असें कांहींच ह्या सृष्टीमध्यें घडत नाहीं. मात्थी १०: २९–३१. यशा० ४५:७. नीति २१: १. उत्प० ४५:७. इर्मे. ३१: ३५. अमो० ९:९. इयो० ५:६,७,१७,१८. २ काळ० १६:९.

**प्र**० ५. सृष्टींतील सर्वांहून लाहान जीव व वस्तु यांकडे देखील ईश्वराने आपलें लक्ष लावून त्यांचें रक्षण व व्यवस्था इ० करावें हें ईश्वराला शोभतें कीं काय?

उ० निःसंशय शोभतें. जर त्यांस उत्पन्न करणें हें ईश्वराला शोभतें तर त्यांचें रक्षण व व्यवस्था करणें हें कां शोभणार नाहीं? कारण त्यास उत्पन्न करण्याने जसे मोठे आणि भारी परिणाम सिद्धीस जातात, तसेच मोठे व भारी परिणाम त्यांचें रक्षण व व्यवस्था करण्यानेंहि होतात यांत कांहीं संशय नाहीं. सर्वांहून लाहान प्राणी किंवा सर्वांहून क्षुल्लक गोष्ट यांकडे ईश्वर लक्ष लावितो असें ह्मटल्याने त्यास कांहीं लघुत्व येतें, असें कोणी ह्मणतात, पण असें कांहीं नाहीं. त्याच्या विशाळ राज्यांतील सर्वांहून भारी व थोर गोष्टीस जसें, तसें सर्वांहून लाहान आणि हलक्या गोष्टींसहि ईश्वराचें सूत्र लागतें असें समजल्याने, त्याचें श्रेष्ठपण, चांगुलपण, आणि चातुर्य यांची विशेष थोराई दिसून ईश्वराचें अधिक गौरव होतें. आणि ज्या गोष्टी प्रथम घडते वेळेस लाहान व हलक्या दिसतात, त्याच गोष्टी परिणामीं सर्वांहून मोठ्या अगत्याच्या व श्रेष्ठ आहेत, असें वारंवार दिसून येतें. यास्तव कोणती गोष्ट ईश्वराच्या लक्षास योग्य आहे व कोणती योग्य नाहीं, हें आमच्याने ठरववत नाहीं.

प्र० ६. ईश्वराचें सूत्र सृष्टींतील सर्व आणि प्रत्येक गोष्टीस लागतें असा विश्वास न धरणें ह्मणजे हा सिद्धांत नाकबूल करणें याचें काय फळ होतें?

उ० ईश्वरासीं मान्यवृत्ति धरणें, त्यावर भरवसा ठेवणें, त्याची आशा धरणें व त्याची प्रार्थना करणें, यांविषयींचा सर्व आधार नाहींसा होतो, आणि त्यामुळेंच हीं फार अगत्याचीं अवश्य कामें करण्याची हयगय होती, असें फळ होतें.

प्र० ७. ईश्वरी सूत्र जसें मोठ्या तसें लाहान आणि प्रत्येक गोष्टीला लागतें असा विश्वास धरण्याचें काय फळ होतें?

उ० (१) सर्व गोष्टींत ईश्वराची सत्ता व अधिकार कबूल केला जातो. (२) सर्वदां सर्व गोष्टींविषयीं प्रत्यक्ष ईश्वरावरच भरवसा ठेवणें याचें अगत्य दिसतें. आणि त्याचे उपकार जे आपणावर होतात ते कबूल केले जातात. (३) आणि त्याचें सद्भय धरणें, त्याजवर भाव ठेवणें, त्याचा आभार मानणें, त्याची आशा धरणें आणि त्याची भक्ति करणें, यांची प्रेरणा मनुष्यांस प्राप्त होती.

प्र० ८. आपल्या हातच्या कामांमध्यें आपलें सूत्र चालविण्याचा अधिकार ह्मणजे सत्ता ईश्वरास आहे कीं नाहीं?

उ० होय अवश्य आहे. ज्यापेक्षां त्याने सृष्टींतील सर्व वस्तु आपल्याच सामर्थ्यानें शून्यापासून केल्या, त्यापेक्षां त्या सर्व प्रकारें त्याच्या खासगत आहेत. यास्तव त्याच्या अनंत चांगुलपणास व अनंत सुज्ञतेस नीट दिसेल त्याप्र-

माणें त्याने आपलें सूत्र त्यांमध्यें चालवावें असी सत्ता त्यास आहे, ही गोष्ट अगदी निर्विवाद व स्वतःसिद्धच आहे.

प्र० ९. सर्व गोष्टींविषयीं सर्व प्रसंगीं ईश्वरी सूत्रास मान्य व्हावें हें आमचें कर्त्तव्य कर्म आहे कीं काय?

उ० होय आहे. कारण (१) सर्व वस्तूंवर आपलें सूत्र चालवावें असा पूर्ण अधिकार ईश्वरास आहे. (२) त्याचें सूत्र अत्यंत चांगुलपणाचें व अत्यंत सुज्ञतेचें व पूर्ण पवित्रतेचें व अगदी यथान्याय असें आहे. यास्तव तेंच मानणें यांत आमचें सर्वाहून मोठें कल्याण आहे. ह्मणून आह्मी ईश्वराच्या सूत्रास सर्वदां मान्य करावें. जर एकादी गोष्ट ईश्वरी सूत्राविरुद्ध किंवा ईश्वरीसूत्राबाहेर घडेल, तर मात्र आह्मी तिला मान्य होऊं नये. परंतु असी गोष्ट ह्या सृष्टीमध्यें कधीं घडावयाची नाहीं, हा पूर्ण निश्चय आहे. यास्तव सर्व गोष्टींविषयीं ईश्वरी सूत्रास मान्य असणें हें आह्मास अवश्य आहे. आणि ईश्वरी सूत्रास मान्य करितांना, आह्मी त्याच्या व्यवस्था एकदेशीय दृष्टीने पाहूं नये, पण सर्व गोष्टींचा मेळ पाहून त्या ध्यानांत आणाव्या; आणि त्या व्यवस्थांच्या प्रकाराविषयीं विचार करितांना आह्मी त्यांचे हेतु प्रयोजनें व परिणामहि लक्षांत आणावे, ह्मणजे त्यांस मान्य होणें कठीण वाटणार नाहीं. गीत १४५: १७. यशा० २८: २९. रोम० ८:२८. गीत ३९: ९. मात्थी ६: ४०. २६: ३९.

---

## प्रकरण ८.

# दिव्य दूत.

प्र० १. दिव्य दूत आहेत हें कशावरून समजतें?

उ० (१) सृष्टिजन्य ज्ञानावरून त्यांच्या अस्तित्वाविषयीं अनुमान होतें. उत्पत्तीच्या कामाचा विचार केला असतां, अति सूक्ष्म जे परमाणू त्यांपासून ह्या पृथ्वीचा प्रभु जो मनुष्य त्यापर्यंत उत्पन्न पदार्थांमध्यें अनेक पायऱ्या दिसून येतात. त्या पायऱ्या एकावर एक कशा चढत आल्या आहेत, याचा आणि मनुष्याच्या प्रकृतीचा विचार पाहिल्यास, अनुमान होतें कीं, पायऱ्यांचें हें चढणें मनुष्याजवळच खुंटलें नसावें. पण मनुष्याहून श्रेष्ठ अशा पायरीचे अणखी कांहीं प्राणी ईश्वराच्या उत्पत्तीमध्यें असावे. मनुष्य प्राणी हा आपल्या शरिराकडून नाश पावणाऱ्या पशूंसीं संबंधी आहे. परंतु तो आपल्या आत्म्याकडून आत्मीक व अमर अशा भिन्न पदवीच्या प्राण्यांसीं संबंधी आहे असें दिसतें. यावरून तर्क होतो कीं, असले दुसरे प्राणी असावे. आणि उत्पत्तीचीं जीं कांहीं कामें आमच्या समजण्यांत आलीं आहेत, त्यांतील उत्पन्न प्राण्यांमध्यें सर्वांहून लाहान प्राण्यांपासून मनुष्यापर्यंत एकावर एक चढणाऱ्या ज्या पायऱ्या दिसतात त्यांवरून अनुमान होतें कीं, मनुष्यांवरहि प्राण्यांच्या कांहीं पायऱ्या असाव्या. (२) अणखी मनुष्याहून श्रेष्ठ अशा प्रकृतीचे आत्मे ह्मणजे आत्मीक व्यक्ति आहेत, असा समज सर्वकाळच्या सर्व देशांतील बहुतकरून सर्व लोकानी धरिला. हा समज प्रथम मनुष्यानी आपल्याच्च तर्कानें काढिला किंवा त्यांस तो प्रथम ईश्वरी प्रगटविण्याकडून माहीत होऊन, परंपरागत दंतकथांच्या योगानें पुढें सर्व मनुष्यांस कळला, हें सांगवत नाहीं, तरी असा समज सर्वत्र आहे, ह्मणून हा खरा असेल असें अनुमान होतें. (३) परंतु ईश्वरी शास्त्रावरून मात्र याविषयींचें

निभ्रांत ज्ञान होतें. कारण असे आत्मे आहेत, हें शास्त्रांतील बहुत वाक्यांत अगदीं निःसंशय रीतीने सांगितलें आहे.

प्र० २. दिव्य दुतांस ईश्वराने कोणत्या प्रकृतीचें केलें आहे ?

उ० त्याने त्यांस आत्मीक, अमर, पवित्र आणि ज्ञान शक्ति व चापल्य यांविषयीं मनुष्यांहून श्रेष्ठ असें आणि सर्व सबुद्ध प्राण्यांहून उंच व थोर पदवीचे असें केलें आहे. गीत १०४:४. लुका २०:३६. मात्थी २५:३१. २ शमु० १४:२०. गीत १०३:२०. इब्री १:१४.

प्र० ३. ईश्वराने दुतांच्या वस्तीसाठीं कोणतें स्थान नेमून दिल्हें आहे ?

उ० सर्वांहून उच्छ्रीत आकाश; ह्मणजे आकाशावरलें आकाश हें त्याचें वस्तिस्थान आहे. प्रग० ७:११.

प्र० ४. तें ईश्वराच्या मानसिक अधिकाराखालीं आहे कीं काय ? ह्मणजे त्यांस ईश्वराने कायदे लावून दिल्हे आहेत काय ?

उ० होय, ते ईश्वराच्या कायद्यांखालीं आहेत आणि ईश्वर त्यांच्या कामांचा हिशेब घेतो. दुतांच्या वर्त्तणुकीविषयीं जे कायदे ईश्वराने त्यांस लावून दिल्हे ते मनुष्य निष्पाप अवस्थेत असतां त्यांस लावून दिल्हेल्या कायद्याच्या अभिप्रायाचेच होते याविषयीं कांहीं संशय नाहीं. मात्थी २२:३७–४ गीत १०३:१९. मात्थी ६:१०.

प्र० ५. दुतांस उत्पन्न केल्यावर ईश्वराने लागलेंच त्यांस परीक्षेच्या अवस्थेंत घातलें होतें कीं काय ?

उ० होय, त्यांची परीक्षा पटण्याचा अमुक नियमित काळ ईश्वराने त्यांस नेमून दिल्हा होता. या काळामध्यें

त्यांस आपल्या खुशीप्रमाणें ईश्वराच्या आज्ञा पाळावयास किंवा मोडावयास स्वतंत्रता होती आणि त्यांच्या आज्ञाधारणाप्रमाणें त्यांस प्रतिफळ मिळावयाचें होतें. १ तीम. ५:२१. २ पेत्र. २:४.

प्र० ६. त्यांस परीक्षेच्या अवस्थेंत घालण्याचा परिणाम काय झाला ?

उ० त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांतून कित्येकांनी आपल्या परीक्षेच्या काळामध्यें ईश्वराच्या सर्व आज्ञा पाळून नीतिमत्व राखिलें आणि आतां ते पवित्रपण व सुख यांमध्यें स्थिरावले आहेत. परंतु दुसऱ्यांनी अभिमान धरून ईश्वराची अवज्ञा करून बंड केलें, त्यावरून ते दोषी व दंडी ठरून सर्वकाळिक नाशाचे वतनदार झाले आहेत. १ तिम. ५:२१. २ पेत्र. २:४.

प्र० ७. पवित्र दुतांच्या संख्येविषयीं शास्त्रांत काय सांगितलें आहे ?

उ० त्यांची संख्या फार मोठी आहे, व ते असंख्य आहेत असेंहि ह्मटलें आहे. इब्री १२: २२. गीत ६८: १७. दानी. ७: १०. मात्थी २६: ५३. लुका २: १३.

प्र० ८. शास्त्रामध्यें दुतांला कोणकोणतीं नांवें ठेविलीं आहेत?

उ० त्यांस आत्मे, दूत, खरूबीम, सेराफीम, पाहरेकरी, पाहाटतारे, देवपुत्र, सिंहासनें, राज्यें, अधिकार आणि सत्ता; असीं अनेक नांवें ठेविलीं आहेत. इब्री १:१४,६. यहेज० १०:१९. यशा० ६:२. दानी० ४:१७. इयो० ३८:७. कल० १:१६.

प्र० ९. दुतांस अशा वेगळाल्या संज्ञा कां लाविल्या आहेत ?

उ० ते निराकार आणि अदृश्य आहेत ह्मणून त्यांस आत्मे ह्मटलें आहे; ते परमेश्वराचे कामगार ह्मणजे जासूद आहेत ह्मणून त्यांस दूत ह्मटलें आहे; त्यांचें ज्ञान मोठें आहे ह्मणून त्यांस खरूबीम ह्मटलें आहे; त्यांचा पवित्र आवेश व प्रीति यांवरून त्यांस सेराफीम ह्मटलें आहे; त्यांची सावधगिरी व दक्षता यांवरून त्यांस पाहेरकरी ह्मटलें आहे; ते प्रकृतीने तेजःपुंज आहेत, आणि उत्पत्तीमध्यें पहिल्याने उत्पन्न झालेले आहेत, ह्मणून त्यांस पाहाटतारे ह्मटलें आहे; त्यांच्या ठायीं देवाची प्रतिमा आहे ह्मणून त्यांस देवपुत्र ह्मटलें आहे; त्यांच्या प्रकृतीचें श्रेष्ठत्व, व गुणस्वभावाची उच्चता आणि कामाचें महत्व यांवरून त्यांस सिंव्हासनें, राज्यें, अधिकार व सत्ता, अशा संज्ञा लाविल्या आहेत.

प्र० १०. पवित्र दुतांचें काम काय आहे ?

उ० ईश्वराने त्यांस जगाच्या कारभाराच्या कामांत आणि विशेषेंकरून तारणवतनाचे भागीदार जे होणार आहेत, त्यांच्या सेवेच्या कामांत ठेविलें आहे. आणि मोठ्या न्यायाच्या दिवसीं न्याय होण्याच्या कामांत ते प्रभु येशू ख्रीस्ताचे हस्तक होतील. पूर्ण झालेल्या नीतिमान मनुष्यांच्या आत्म्यांसंगतीं ते आतां ईश्वराचें भजन करीत असतात आणि पुढें सर्वकाळ करितील. तरी तारण पावलेले मनुष्य, मोशे आणि कोंकरा यांचें जें नवें गायन आकाशांत गातील, तसेंच सर्व प्रकारें त्याना गातां येणार नाहीं, कारण कीं त्यानी आपण स्वतां पाप आणि दोषीपणा

यांच्या नांगीच्या डंशाचा अनुभव कधीं घेतला नाहीं. आणि अर्थातच क्षमा करणारी व उद्धरणारी जी ईश्वरी कृपा तिची गोडी चाखिली नाहीं. गीत ३४: ७. इब्री १: १४. मात्थी २४: ३१. प्रग. ७: ११.

प्र० ११. आह्मी पवित्र दुतांस कसें मानावें?

उ० आह्मी त्यांच्या मानसिक उत्कृष्टतेमुळें त्यांजवर प्रीति करावी; आह्मासाठीं जीं परोपकारीक कामें ते करितात, त्यांमुळें आह्मी त्यांचे उपकार मानावे, त्यांची मोठी योग्यता व महत्व यांवरून त्यांचा आदर करावा, आणि आमच्याने करवेल तितकें त्यांचें अनुसरण करावें.

प्र० १२. पतित ह्मणजे भ्रष्ट दुतांसाठीं कांहीं तारणोपाय ईश्वराने केला आहे काय?

उ० त्यांसाठीं कांहींच तारणोपाय केला नाहीं व करावयाचा नाहीं. यास्तव ते आपल्या पापाचा योग्य दंड जो सर्वकाळचा नाश त्यांत जातील. सांप्रत ते त्या मोठ्या दिवसांतील न्यायासाठीं निबिड काळोखांत व मोठ्या बंधनांत राखून ठेवलेले असतां, मोठ्या निराशेने व खेदाने व्याकुळ होत आहेत. यहु० ६. मात्थी २५: ४१. २ पेत्र. २:१४.

प्र० १३. शास्त्रामध्यें पतित दुतांस कोणतीं नांवें ठेविलीं आहेत?

उ० त्याना सामान्यतः भुतें ह्मटलें आहे. परंतु त्यांतील एक जो पूर्वीं श्रेष्ठ पदवीचा दिव्य दूत होता आणि जो पहिल्यानेच ईश्वरापासून फितून त्याची अवज्ञा करिता झाला, आणि आतां सर्व पतित दुतांमध्यें अग्रगण्य आहे, असें दर्शविलें आहे त्याला मात्र सैतान, अजगर, जुना साप, अथांग डोहाचा दूत, आबादोन, अपल्योन, भावांचा दोषा-

रोप करणारा, ल्युसीफर, बेलजबुब, भुतांचा अधिपति, अंतरिक्षांतील सत्तेचा अधिकारी आणि ह्या जगाचा देव, असीं दुसरीं विशेष नांवें ठेविलीं आहेत. याको० २: १९. इयो० १: १२. प्रग० १२: ९,१०. ९: ११. यशा० १४:१२. मात्थी १२: २४. एफे० २: २. २ करिं० ४:४.

**प्र**० १४. पतित दूतहि ह्या जगांत कांहीं काम करीत असतात कीं काय?

उ० होय, जरी ते अदृश्य आहेत, तरी ते ह्या जगांत चोहोंकडे हिंडून मनुष्यांस पापांत पाडण्याची प्रेरणा करण्याने मोठा अनर्थ करीत आहेत असें शास्त्रांत वर्णिलें आहे. सैतानाने हावेला भुलवून पापांत पाडिलें त्याने ख्रीस्तासहि पापांत पाडण्यास यत्न केले; आणि आपल्या प्रभूला परस्वाधीन करावें असी प्रेरणा त्याने यहूदाला दिल्ही. इत्यादि बहुत प्रकारें त्याच्या ह्या जगांतील कामांविषयीं सांगितलें आहे. ईश्वर जो बाप, पुत्र जो ख्रीस्त, आणि पवित्र आत्मा, ह्यांखेरीज ह्मटल्यास, सैतानाच्या करण्यांविषयीं जितके लेख पवित्र शास्त्रामध्यें अढळतात, तितके दुसऱ्या कोणत्याहि एकल्या कर्त्याविषयीं अढळत नाहींत. आणि जें कांहीं तो करितो तें केवळ वाईट व पापिष्ट आहे असें वर्णिलें आहे. उत्प० ३: १३. मात्थी ४: १. योहा० १३: २. १ पेत्र. ५: ८. लू० २२: ३१.

**प्र**० १५. पतित दुतांची संख्या किती आहे?

उ० त्यांची संख्या अतिशय मोठी आहे, असें दर्शविलें आहे. मार्क ५: ९.

**प्र**० १६. भुतांविषयीं शास्त्रांत जें वर्णन आहे त्याविषयीं कांहीं संशय धरण्याचें कांहीं कारण आहे कीं काय?

उ० अगदी नाहीं. (१) त्याविषयीं जें वर्णन शास्त्रामध्यें आहे त्यांत कांहीं असंभाव्य दिसत नाहीं. जसें दिव्य दूत अथवा दुसरे कोणतेहि अदृश्य प्राणी यांविषयीं तसें भुतें ह्मणून ज्या आत्मीक व्यक्ति आहेत, त्यांविषयीं आह्मास समज होणें कठीण नाहीं. आणि दिव्य दूत आहेत, असा विश्वास ज्या आधारावरून धरितों तोच आधार भुतांच्या अस्तित्वा-सहि लागू आहे. (२) अणखी भुतांविषयीं शास्त्रांत जें सांगितलें आहे तें सर्व जरी आह्मास समजत नसलें, तरी त्यावरून आह्मी त्याच्या अस्तित्वाविषयीं संशय धरणें योग्य नाहीं. कारण भुतांविषयीं शास्त्रांत जें कांहीं सांगितलें आहे तें दुसऱ्या शास्त्रलेखाप्रमाणें सर्वज्ञानी ईश्वराचें सांगणें आहे, ह्मणून त्याविषयीं संशय धरणें योग्य नाहीं.

प्र० १७. पतित दुतांविषयींचा सिद्धांत नाकबूल कर-ण्याचा कोणता परिणाम होईल ?

उ० त्यावरून पाखांडीपणा व नास्तीकपणाहि होईल ; ह्मणजे मनुष्यांचें पतन, ख्रीस्ताकडील तारणोपाय, न्यायाचा दिवस, आणि शेवटील प्रतिफळ असल्या भारी आणि मुख्य गोष्टी शास्त्रांत सांगितल्या आहेत त्यांचाहि नाकार होईल. आणि हा सिद्धांत नाकारण्यासाठीं शास्त्रवाक्यांचा अर्थ का-ढण्याचा जो नेम धरावा लागेल त्याच नेमाने शास्त्रांतील सर्व वाक्यांचा अर्थ काढल्यास, पवित्र दूत नाहींत, परलो-कवासी झालेले आत्मे नाहींत; पेत्रस पौलस योहान्न, प्रभु येशू ख्रीस्त आणि परमेश्वर हेहि नाहींत असें समजणें योग्य ठरेल. असा वाईट परिणाम ह्या सिद्धांताच्या नाकारावरून होईल.

प्र० १८. तर आह्मी पतित दुतांस कसें मानावें ?

उ० आह्मी त्यांच्या गुणस्वभावाचा द्वेष करावा, त्यांचें सर्व करणें दूषणीय आहे असें जाणावें, त्यांच्या सर्व दुष्ट योजनांचें भय धरावें, त्यांचे सर्व पापमोह वर्जावे व टाकावे, आणि त्यांच्या अपवित्र उदाहरणाप्रमाणें कांहींच न करण्याविषयीं जपावें.

---

## प्रकरण ९.

# मनुष्याची उत्पत्ति आणि मूळस्थिति.

प्र० १. ईश्वराने मनुष्यास केव्हां उत्पन्न केलें?

उ० ख्रिस्ती शकापूर्वीं ४००४ वर्षें या काळीं, पृथ्वीच्या उत्पत्तीस आरंभ झाल्यापासून साहाव्या दिवशीं ह्मणजे या जगामध्यें जें कांहीं ईश्वराने उत्पन्न केलें, त्याच्या शेवटीं मनुष्यास उत्पन्न केलें. उत्प. १:२७,३१.

प्र० २. ईश्वराने मनुष्यांस कोणत्या अवस्थेंत निर्माण केलें?

उ० त्याने त्यांस पुरुष व स्त्री असें उत्पन्न केलें; अणखी त्याने त्यांस आपल्या प्रतिमेचें केलें; ह्मणजे त्यांस सुबुद्ध व पवित्र असें करण्याने त्यांमध्यें आपल्या अवश्यक आणि मानसीक गुणांचा कांहीं सारखेपणा केला. आणि त्याने त्यास एकदम परिपक्व व पूर्ण अशा अवस्थेंत उत्पन्न केलें; ह्मणजे त्यांचें शरीर पुरतें वाढलेलें व शक्तीने पूर्ण झालेलें असें, आणि त्यांचें मन प्रौढ व सर्व मानसीक शक्तींनी पूर्ण झालेलें असें केलें. अणखी त्याने त्यांस पूर्ण सुखी असेंहि केलें. याप्रकारें ईश्वराने त्यांस प्रकृतीने आणि पदवीने दुतांपेक्षां मात्र थोडें कनिष्ठ पदवीचे, परंतु पृथ्वींतील दुसरे

सर्व प्राणी व वस्तु यांहून श्रेष्ठ असें करून त्यांस या जगाचा प्रभु होण्यासाठीं आणि ज्ञान पवित्रता व सुख यांमध्यें निरंतर वाढत जाण्यासाठीं योग्य असें केलें. उत्प. १: २७. उप. ७:२९. एफे. ४:२४. उत्प.१:२८. गीत ८:५.

प्र० ३. मनुष्य हा मिश्रित व्यक्ति आहे, किंवा अमिश्रित व्यक्ति आहे?

उ० तो शरीर आणि आत्मा ह्या दोन भिन्न प्रकारानीं बनलेला असतां मिश्रित व्यक्ति आहे; ह्मणजे ज्यामध्यें श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा, आणि घ्राण हीं पांच इंद्रियें आहेत, असा परिपूर्ण आणि यथासांग देह, जो भूमींतील मातीचा घडलेला आहे तो, आणि ज्यामध्यें बुद्धि, भावना, वासना, आणि इच्छा आहेत, असा विवेकयुक्त आत्मा, जो शुद्ध व अमिश्रित अशा आत्मीक प्रकृतीचा केलेला आहे तो, असे दोन प्रकार त्याच्या ठायीं आहेत. उत्प. २:७. उप. १२: ७.

प्र० ४. मनुष्याच्या अस्तित्वाचा काळ किती आहे?

उ० त्याचा देह मर्त्य आणि अल्पकाळिक आहे, परंतु त्याचा आत्मा अमर आणि सर्वकाळिक आहे. गीत ९०:१०. मात्थी १०: २८. उप. १२:७. लुका २०:३६.

प्र० ५. ह्या पृथ्वीसीं मनुष्याचा कसा संबंध आहे?

उ० तो ह्या पृथ्वीचा प्रभु असा स्थापिलेला आहे. उत्प. १: २८. गीत ८: ६.

प्र० ६. पहिल्या स्त्रीपुरूषांची अवस्था कसी होती आणि त्यांच्या राहण्याचें स्थान कोणतें होतें?

उ० एदेन बाग ज्यास ऐहिक सौख्यलोक असें ह्मटलें

आहे त्यांत ते पहिल्याने राहत असतां, परिपूर्ण ऐहिक सुखें भोगीत होते. उत्प. २: ८,९.

प्र० ७. मनुष्यें मूळस्थितीमध्यें असतां त्यांचें मुख्य सुख काय होतें?

उ० आपला उत्पन्न कर्त्ता, संभाळणारा आणि हित कर्त्ता जो परमेश्वर, त्याला जाणणें, त्याजवर प्रीति करणें, त्याची सेवा करणें आणि त्याची प्रसन्नता भोगणें, हेंच त्यांचें मुख्य सुख होतें.

प्र० ८. आमचे मूळपूर्वज उत्पन्न होतांच आपल्या मानसिक आचरणाविषयींच्या परीक्षेच्या अवस्थेंत घातले होते कीं काय?

उ० होय, ते उत्पन्न होतांच परीक्षेच्या अवस्थेंत घातले होते. उत्प. २: १५-१७.

प्र० ९. आदाम जो आमचा मूळ बाप त्याचा, आपल्या संतानासीं कसा संबंध होता?

उ० ईश्वरानें लाविलेल्या सृष्टिक्रमाप्रमाणें तो सर्व मनुष्यजातीचा मूळबाप असतां तो सर्व मनुष्यांच्या प्रकृतीचा व मानसिक स्थितीचा पुढारी ह्मणजे प्रतिनिधी, असा स्थापिलेला होता. रोम. ५: १८,१९.

---

## प्रकरण १०.

## मनुष्य मूळस्थितीमध्यें असतां त्याच्या वर्त्तणुकीविषयींचा नियम.

प्र० १. आमचे मूळ आईबाप उत्पन्न झालेल्या स्थितींत

असतां ईश्वराने त्यांच्या वर्त्तणुकीविषयीं त्यांस कोणता नियम लावून दिल्हा?

उ० जो नियम विवेकयुक्त प्राण्यांचा स्वभाव आणि अवस्था यांस उपयुक्त आहे, आणि ईश्वराचा स्वभाव आणि मनुष्यजातीचा ईश्वरासीं व परस्परांसीं जो संबंध आहे त्यावरून निष्पन्न होतो, तो नीतिसंबधीं नियम ईश्वराने त्यांस लावून दिल्हा.

प्र० २. तो नियम कसा आहे ?

उ० तो आत्मिक आणि पूर्ण असा असतां मनुष्याचे विचार, भावना, वासना, हेतु, शब्द आणि कृत्यें या सर्वांस लागतो. तो कधीं कमी व्हावयाचा नाहीं, किंवा बदलावयाचा नाहीं, किंवा रद्द व्हावयाचा नाहीं. असा तो अपालट आहे आणि जोंवर ईश्वर व मनुष्यें आहेत, तोंवर चालावयाचा आहे. गीत ११९:९६. रोम. ७:१२. मात्थी ५.१७.

प्र० ३. हा नियम पहिल्याने मनुष्यांस कसा निवेदिला गेला ?

उ० पहिल्याने तो त्यांच्या अंतःकरणांत लिहिलेला होता; ह्मणजे तो त्यांच्या विवेकामध्यें असा ठसविला होता कीं त्यानी आपल्या बुद्धीचा आणि मानसिक शक्तीचा योग्य उपयोग केला असतां, त्यांस आपल्या सर्व कर्त्तव्य कर्मांचें यथार्थ ज्ञान व्हावें. आणि त्याशिवाय त्यांच्या निर्माण कर्त्यांने आपण स्वतांहि त्यांस त्याविषयीं उपदेशिलें असावें. रोम. २: १४,१५.

प्र० ४. ह्या नेमाचें पाळण मनुष्यानी कसें करावें ?

उ० मनुष्यानी ह्या नेमाचें पाळण सार्वत्रिक परिपूर्ण

आणि निरंतर असें करावें; असें ईश्वराने आज्ञापिलें आहे. गाला. ३: १०. यहेज. १८:४.

प्र० ५. हा नेम पाळण्यास कोणतें उत्तेजन दिल्हें आहे?

उ० जे ह्या आज्ञा पाळतील त्यांस सर्वकाळीक सुख आणि जे मोडतील त्यांस सर्वकाळीक दुःख लागेल, असा जो ईश्वरी नेम आहे, तो हा नेम पाळण्यास उत्तेजक आहे. सर्व नेमशास्त्राचा अभिप्राय हाच आहे कीं, ह्या आज्ञा पाळा ह्मणजे जगाल आणि मोडा ह्मणजे मराल. आणि तो नेम सफळ आणि प्रबळ व्हावा ह्मणून असें उत्तेजन देणें अवश्य होतें. रोम. ६:२३. मात्थी २५:४६. लेवी १८:५.

प्र० ६. या नियमाचें किंचितहि अतिक्रमण झाल्यास पाप लागतें आणि त्यावरून मनुष्य दंडपात्र होतो कीं काय?

उ० होय, कल्पना शब्द आणि कृत्यें यांतील कोणत्यानेंहि या नेमाचें जें कांहीं अतिक्रमण होतें तें पाप आहे आणि त्यावरून मनुष्य दंडपात्र होतो. १ योहा. ३:४. यहेज. १८:४. याको. १:१५.

प्र० ७. पाप हें केवळ बाह्य कृत्यांत आहे किंवा जेथून तें कृत्य मुळीं उपस्थित होतें, त्या अंतःकरणाच्या भावनांत आहे?

उ० सर्व पापें अंतःकरणांतून निघतात. प्रत्येक मनुष्य आपल्या अंतःकरणाच्या भावनांप्रमाणें चांगला किंवा वाईट ठरतो. दुष्ट मनुष्यें आणि भुतें यांचीं सर्व कृत्यें पापिष्ट असण्याचें कारण हेंच कीं, तीं पापिष्ट अंतःकरणांतून निघतात. १ शमु. १६: ७. मात्थी १५:१९.

प्र० ८. सर्व अपराध एकसारिखेच पापिष्ट आहेत कीं काय?

उ० अपराधांचा प्रकार, आणि अपराध करणाऱ्यांची व ज्याचा अपराध झाला त्याची योग्यता, आणि तो अपराध करण्याचे प्रसंग, हेतु आणि कारणें, यांप्रमाणें प्रत्येक अपराध लहान किंवा मोठा ठरतो.

प्र० ९. नीतिसंबंधी नेमाचा सारांश कशामध्यें आहे?

उ० ज्या दाहा आज्ञा ईश्वराने स्वतां आपण दगडी दोन पाट्यांवर लिहून मोठें तेज वैभव आणि गांभीर्य यांमध्यें सिना डोंगरावर मोश्याजवळ दिल्ह्या, त्यांत सर्व नियमशास्त्राचा सारांश आहे. निर्ग. १९:१८,१९. ३१:१८. २०:३–१७.

प्र० १०. ह्या आज्ञांच्या ज्या दोन पाट्या होत्या त्यांमध्यें काय भेद आहे?

उ० आह्मी ईश्वराचीं जीं कर्त्तव्य कर्मे लागतों तीं ज्यांकडून दर्शविलीं त्या पहिल्या चार आज्ञा पहिल्या पाटीवर लिहिल्या होत्या. आणि आह्मी आपलीं आणि आपल्या सभोंवतील प्राण्यांचीं जीं कर्त्तव्य कर्मे लागतों तीं ज्यांकडून दर्शविलीं, अशा साहा आज्ञा दुसऱ्या पाटीवर लिहिल्या होत्या. हाच त्या दोहों पाट्यांचा ह्मणजे त्या दाहा आज्ञांचा भेद आहे.

प्र० ११. त्या दाहा आज्ञांचा सारांश काय आहे?

उ० सर्वांहून श्रेष्ठ प्रीति ईश्वरावर करणें आणि जसी आपणांवर तसी प्रत्येक मनुष्यावर प्रीति करणें, हाच त्यांचा सारांश आहे. शुद्ध, यथापरिमाणाची व निस्पृही प्रीति करणें यांकडून सर्व नेमशास्त्र पूर्ण होतें. ह्मणून

या प्रकारें प्रीति करण्यांत सर्व नियमशास्त्राचा सारांश आहे, हें उघड आहे. मात्थी २२:३७–४०. रोम. १३:१०.

**प्र०** १२. ईश्वराने आमच्या मूळ आईबापांस ह्या नीतिसंबंधी नेमावांचून दुसरा कांहीं नियम त्यांच्या आज्ञांकितपणाच्या परीक्षेसाठीं लाविला होता कीं काय ?

उ० होय, बागाच्या मध्यभागीं जें बरें वाईट जाणण्याचें झाड होतें त्यावरचें फळ न खाण्याविषयींची आज्ञा जिला नियोगसिद्ध किंवा विधीची आज्ञा असें ह्मटलें आहे ती लावून दिल्ही होती. उत्प. २:१६,१७. (सूचना. जे नीतिसंबंधी नियम किंवा जीं कर्त्तव्य कर्मे प्राण्याची प्रकृति व परस्पर संबंध यांस उपयुक्त असतां, सृष्टिजन्य ज्ञानावरून समजूं शकतात, त्यांस नीतिसंबंधी किंवा मानसिक नियम ह्मटलें आहे. आणि जे नियम किंवा जीं कर्त्तव्य कर्मे प्राण्यांची स्थिति आणि परस्पर संबंध यांस उपयुक्त असतांहि केवळ ईश्वरी प्रगटविण्याने मात्र समजूं शकतात, त्यांस नियोगसिद्ध किंवा विधीसंबंधी नियम किंवा कर्त्तव्य कर्मे ह्मटलें आहे; हा नीतिसंबंधी व विधीसंबंधी आज्ञांचा भेद सर्वांनी लक्षांत ठेवावा.)

**प्र०** १३. सदरीं सांगितलेल्या नियोगसिद्ध आज्ञेचा कोणता हेतु होता?

उ० आमच्या पूर्वजांच्या ज्या वर्त्तणुकीवर त्यांची सर्वकाळीक स्थिति अवलंबून राहत होती तिजविषयीं त्यांची परीक्षा पाहण्याच्या हेतूस्तव ती आज्ञा त्यांस लाविली होती. उत्प. २:१७. रोम. ६:२३. यहेज. १८:४.

---

## प्रकरण ११.

# मनुष्याचा स्वधर्मत्याग आणि भ्रष्टपणा ह्मणजे पतितावस्था.

प्र० १. आमच्या मूळ पूर्वजांचा स्वधर्मत्याग ह्मणजे काय?

उ० त्यांच्या ठायीं जी मानसिक सरलता ह्मणजे शुद्धता मुळीं होती ती त्यानी सोडिली; ह्मणजे ईश्वराने त्यांस लावून दिल्हेला धर्म त्यानी सोडिला, हाच त्यांचा स्वधर्मत्याग होय. उप. ७: २९.

प्र० २. कोणतें विशेष कर्म करण्याने आमच्या मूळ पूर्वजानी आपल्या धर्माचा त्याग केला?

उ० निषिद्ध फळ खाण्याविषयीं जी मनाई ईश्वराने केली होती, ती मोडल्याने त्यानी स्वधर्मत्याग केला. उत्प. ३:६.

प्र० ३. निषिद्ध फळ खाण्याने त्यानी फार मोठें पाप केलें कीं काय?

उ० होय, कारण तें फळ खाण्याने त्यानी स्पष्ट आणि व्यक्त ह्मणजे उघड सांगितलेली ईश्वरी आज्ञा मोडिली; ईश्वराने त्यांस दुसरीं जीं बहुत आणि पुरतीं फळें खाण्यासाठीं दिल्हीं होतीं त्यांविषयीं ते अनुपकारी आणि अतृप्त झाले; आणि ईश्वरापेक्षां सैतानाच्या बोलण्यावर अधिक भरवसा ठेविला; आणि आपणांवर अत्यंत मोठा नाश आणिला. ह्मणून तें फळ खाण्याचें पाप फार मोठें आहे.

प्र० ४. ज्या अवस्थेंत आमचे मूळ आईबाप उत्पन्न झाले तींत ते किती काळपर्यंत राहिले?

उ० त्या अवस्थेंत ते किती काळपर्यंत राहिले, हें नि-

श्चितपणें सांगवत नाहीं, परंतु बहुधा केवळ थोडाच काळ राहिले असतील असें वाटतें.

प्र० ५. आदामाच्या स्वधर्मत्यागावरून त्याच्या संतानास काय झालें, किंवा आदाम आणि त्याचें संतान यांमध्यें कसा संबंध होता?

उ० ईश्वरी नेमाप्रमाणें आदाम हा आपल्या संतानाचा सांकेतिक पुढारी ह्मणजे प्रतिनिधी होता; ह्मणजे त्याविषयीं ईश्वरी नेम असा होता कीं, जर आदामाने पूर्ण आज्ञाधारण केलें, तर त्याची संतति सरळ ह्मणजे पवित्र स्वभावाची व्हावी; आणि जर त्याने आज्ञा मोडल्या तर त्याची सर्व संतति पापिष्ट आणि भ्रष्ट स्वभावाची व्हावी. त्या नेमाप्रमाणें आदामाच्या स्वधर्मत्यागावरून सर्व मानवी जात जन्मस्वभावाने पापिष्ट व भ्रष्ट झाली आहे. रोम. ५:१२,१९.

प्र० ६. आदामाने निषिद्ध फळ खाण्याने जें विशेष पाप केलें, त्याचा दोष त्याच्या संतानास लागतो कीं काय?

उ० अगदीं नाहीं. नीतीसंबंधी कर्में आणि दोषीपणा अथवा निर्दोषीपणा, हीं ज्यांचीं त्यांसच लागतात. आणि एकाचीं दुसऱ्यास लागत नाहींत. आदामाच्या इच्छा आणि योजना ह्या जशा त्याच्या संतानांतील प्रत्येकाच्या इच्छा व योजना यांहून निखालस, ह्मणजे पृथक् आहेत, तसेंच त्याचीं नीतिसंबंधी कर्मेंहि त्याच्या संतानाच्या नीतीसंबंधी कर्मांहून अगदीं निखालस आणि पृथक् आहेत, ह्मणून निषिद्ध फळ खाण्याने अथवा दुसरी कोणतीहि आज्ञा मोडण्याने जें कोणतेंहि पाप आदामाने केलें त्याचा दोष त्याच्या संतानास कदापि लागावयाचा नाहीं.

प्र० ७. आपल्या आणि सर्व मनुष्यजातीच्या पापांचा दोष जे आदामाकडे लावितात, ते कसे मनुष्य आहेत?

उ० ते दुष्टबुद्धीचे आहेत. कारण त्यांचीं पापें त्यांसच लागतात आणि आदामास किंवा दुसऱ्या कोणास लागूं शकत नाहींत. असें असतां ते आपला दोष दुसऱ्यावर घालून आपणांस निर्दोषी मानावयास पाहतात आणि आपल्या अपराधाचा दंड दुसऱ्यावर घालण्यास इच्छितात. यहेज. १८: २,३,२०. अनु. २४: १६. होशे १३: ९.

प्र० ८. सर्व मनुष्यें जन्मस्वभावाने पापिष्ट आहेत, ह्मणजे त्यांस नीतीसंबंधी कर्तृत्व येतांच ते पाप करूं लागतात, असें पवित्र शास्त्रांत दर्शविलें आहे कीं काय?

उ० होय असेंच शास्त्रांत सांगितलें आहे, हें खालील गोष्टींवरून उघड दिसतें. (१) शास्त्रांतील बहुत वाक्यांत सांगितलें आहे कीं, सर्वच मनुष्यें पापी आहेत आणि जो पाप करीत नाहीं असा एकहि नाहीं. यावरून ठरतें कीं, मनुष्य जन्मस्वभावाने पापिष्ट असावे; कारण जर असें नसतें तर सर्वच पाप करितात आणि कोणी नीतिमान ह्मणजे पवित्र असा राहत नाहीं असें कां व्हावें? जर मनुष्य जन्मस्वभावाने भ्रष्ट नसते तर कोणी पापी व्हावे व कोणी निष्पापीहि व्हावे; पण असे न होतां सर्वच पापी होतात यावरून ठरतें कीं ते मुळींच पापिष्ट स्वभावाचे आहेत. रोम. ५: १२. ३: १०–१२. उप. ७: २०. (२) अणखी शास्त्रांत असें दर्शविलें आहे कीं बाळकांसहि तारणारा अगत्य आहे. मनुष्यजातींतील जे कोणी आकाशांत जातात ते प्रौढ असोत किंवा लेंकरें असोत, तरी ते सर्व आपल्या तारणाविषयींची स्तुति ख्रीस्त येशूस समर्पितात असें सांगितलें आहे. परंतु

ज्यांचें तारण ख्रीस्ताकडून झालें नाहीं त्यांच्या तारणाची स्तुति ख्रीस्त कधीं घेणार नाहीं. यास्तव जर बाळकांचें तारण ख्रीस्ताकडून होतें तर बाळकेंहि पापिष्ट आहेत; आणि जर सर्व बाळकें पापिष्ट आहेत तर सर्व मनुष्यजातहि पापिष्ट आहे असें ठरतें. कारण सर्व प्रौढ माणसेंहि एक वेळ बाळकें होतीं. मात्थी ९:१२. लुका १९:१०. प्रग. १:५,६. ५:९. (३) अणखी आकाशांत जाण्यास योग्य होण्यासाठीं सर्व मनुष्यांचा ह्मणजे जसा प्रौढांचा तसाच बाळकांचाहि पुनर्जन्म झाला पाहिजे; ह्मणजे पवित्र आत्म्याच्या योगें त्यांच्या मनाचा पालट झाला पाहिजे असें शास्त्रांत सांगितलें आहे. यावरूनहि उघड ठरतें कीं सर्व मनुष्यें जन्मस्वभावानें पापिष्ट आहेत. योहा. ३:५,६. (४) अणखी शास्त्रावरून ठरतें कीं, जीं सर्व दुःखें व मरण मनुष्यांस ह्या आयुष्यांत लागतात, तीं मनुष्यांच्या पापाचीं फळें आहेत. आणि हीं दुःखें तर जसीं प्रौढांस तसीं बाळकांसहि लागतात. यावरूनहि ठरतें कीं सर्व मनुष्यें जन्मस्वभावानें पापिष्ट आहेत. उत्प. ३:१६,१७. रोम. ५:१२. अणखी (५) शास्त्रांतील बहुत वाक्यांत स्पष्टपणें सांगितलें आहे कीं मनुष्यें जन्मस्वभावानें पापिष्ट आहेत. गीत ५१:५. इयो. १४: ४.१५:१४. योहा. ३:६. गीत ५८:३. नीति २२:१५. यशा. ४८:८: उत्प. ८:२१. रोम. ८:७.

प्र० ९. मनुष्यें जन्मस्वभावानें पापिष्ट आहेत यावरून ते स्वतंत्र कर्त्ते नाहींत असें ठरतें कीं काय?

उ० असें अगदीं नाहीं. कारण जरी मनुष्यें जन्मस्वभावानें भ्रष्ट आहेत ही गोष्ट खरी आहे; तरी आदाम पापांत पडल्यापूर्वीं ज्या मानसिक शक्ति त्यास होत्या,

त्याच प्रत्येक मनुष्यास आतांहि आहेत, ही गोष्ट निर्विवाद आहे. ह्मणून मनुष्यें जरी जन्मस्वभावाने भ्रष्ट आहेत, तरी त्यांची मानसिक स्वतंत्रता गेली नाहीं. यास्तव जसा आदाम तसा प्रत्येक मनुष्यहि आपल्या सर्व अंतःकरणाने ईश्वरावर, आणि जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति करण्यास बांधला आहे.

प्र० १०. मनुष्याचें मानसिक भ्रष्टपण किती आहे?

उ० तो सर्वस्वें ह्मणजे अगदीं भ्रष्ट आहे. १. परंतु याचा अर्थ, (१) मनुष्यें जितकीं दुष्ट होण्याजोगीं आहेत तितकीं दुष्ट झालीं आहेत, असें समजूं नये. कारण तीं फार आवरलेलीं आहेत. (२) आणि सर्व दुष्ट मनुष्यें एकसारिखींच दुष्ट आहेत, असेंहि समजूं नये. कारण कित्येक दुसऱ्यांहून फार दुष्ट असतात. अणखी (३) मनुष्यांस आवडती व उपयोगी असी कोणतीहि गोष्ट त्यांमध्यें नाहीं, असेंहि समजूं नये. कारण सर्व मनुष्यांच्या ठायीं थोडे बहुत तरी प्रियकर आणि उपयोगी असे गुण असतात. (४) अणखी त्यांच्या शारीरिक आणि मानसिक शक्ति सर्व नष्ट झाल्या असेंहि समजूं नये, कारण त्या सर्व कायम राहतात. आणि (५) त्यांस कृतज्ञता, कळवळा, समसुखदुःखीपणा, दया इ० स्वाभाविक भावना नाहींत असेंहि नाहीं, कारण सर्व पवित्र व अपवित्र मनुष्यांमध्यें ह्या भावना आहेत. २. तर त्यावरून जो अर्थ समजावा तो हाच आहे कीं, मनुष्यें स्वभावानें अपवित्र आहेत, ह्मणजे त्यांच्या अंतःकरणांत कांहीं मानसिक पवित्रता अथवा चांगलेपणा नाहीं. आणि नीतिपरत्वें पाहिल्यास त्यांच्या सर्व भावना आणि कर्मं नेहमीं केवळ पापिष्ट असतात. जर ह्या सिद्धांताचा अर्थ

असा नसला तर मग धार्मीकपणा आणि अधार्मीकपणा यांचा कांहीं भेद दाखवितां येणार नाहीं. कारण कीं जरी कोणामध्यें अगदीं थोडें खरें पवित्रपण असलें तरी तो धार्मीक आहे असें ठरतें.

प्र० ११. याप्रमाणें सर्वच मनुष्यें भ्रष्ट आहेत हें कशावरून समजतें?

उ० प्रत्येक मनुष्याचा स्वानुभव, दुसऱ्याच्या ठायीं जें दिसतें तें पाहणें, व इतिहास आणि ईश्वरी शास्त्र यांवरून समजतें. (१) आह्मी आपल्या अंतःकरणाची परीक्षा निःपक्षपाताने केल्यास आमच्या अनुभवावरून आह्मास समजतें कीं, आमचीं अंतःकरणें स्वभावेंकरून विपरीत आहेत; ह्मणजे देवासीं आणि सर्व जें कांहीं चांगलें आहे त्यासीं विरुद्ध आहेत. (२) जे मनुष्य पुनर्जन्म पावले नाहींत; ह्मणजे ज्यांच्या मनाचा पालट पवित्र आत्म्याकडून झाला नाहीं, त्यांचीं सर्व कामें केवळ पापिष्ट आहेत असें चांगला शोध केल्यास समजतें. (३) मनुष्यजातीचा इतिहास पाहिल्यास त्यांमध्यें दुसऱ्या गोष्टींपेक्षां मनुष्यजातीचीं पापें आणि अपराध यांचा फार मोठा भरणा अढळतो. (४) मनुष्यें अगदीं सर्वस्वें भ्रष्ट आहेत असें शास्त्रांतील वहुत वाक्यांत उघड सांगितलें आहे. उत्प. ६:५. रोम. ८:७, ८. योहा. ५:४२. रोम. ७:१८. १ करी. २:१४.

प्र० १२. मनुष्यजातीच्या भ्रष्टपणावरून कोणते परिणाम झाले?

उ० (१) मनुष्यांवरून ईश्वराची प्रसन्नता गेली आणि ईश्वरासीं मनुष्याने प्रेमाने भाषण करणें बंद झालें. (२) ह्या आयुष्यांतहि रोग दुःख कष्ट हे मनुष्यांस नेहमी लागूं ला-

गले. (३) मनुष्यें मर्त्य झालीं; ह्मणजे त्यांस दैहिक मरण लागूं लागलें. (४) सर्व मनुष्यें नरकांतील सर्वकाळच्या यातना भोगण्यास पात्र झालीं, आणि (५) जे पश्चात्ताप न करितां व ख्रीस्तावर विश्वास न ठेवितां मरतात ते सर्वकाळच्या नरकदंडांत घातले जातात, हे परिणाम झाले. उत्प. ३:२४, १६,१७,१९. २:१७. गाला. ३:१०. २ थेस. १:९. मात्थी २५:४१.

प्र० १३. मनुष्यांचा स्वधर्मत्याग आणि भ्रष्टपणा यांविषयींचा सिद्धांत विशेष अगत्याचा आहे कीं काय?

उ० होय फार अगत्याचा आहे. कारण कीं ख्रिस्ती शास्त्रांतील बहुत अगत्याच्या सिद्धांतांचें मूळ या सिद्धांतांत आहे, ह्मणजे ख्रिस्ती धर्मांतील तारणोपाय आणि त्यासंबंधीचे दुसरे सिद्धांत यांची अवश्यकता त्याच सिद्धांतावरून निघती, ह्मणून हा सिद्धांत सर्वांनीं योग्य प्रकारें समजावा व अंगीकारावा याचें अगत्य आहे.

---

## प्रकरण १३.

## प्रायश्चित्त.

प्र० १. प्रायश्चित्त ह्मणजे काय?

उ० येशू ख्रीस्ताने सोसलेलीं दुःखें व मरण यांकडून पापी माणसांच्या तारणाचा जो उपाय सिद्ध झाला त्याला प्रायश्चित्त ह्मटलें आहे.

प्र० २. ह्या प्रायश्चित्ताकडून काय झालें?

उ० (१) मनुष्यें आपल्या पापामुळें जें ऋण ह्मणजे देणें ईश्वराचें लागत होतें, तें ह्या प्रायश्चित्ताकडून भरलें

गेलें. पण एथें ऋण या शब्दाचा सामान्य अर्थ न धरितां विशेष ह्मणजे लाक्षणिक अर्थ मात्र धरिला पाहिजे. कारण कीं वास्तविक पाहिल्यास पाप हें जसें द्रव्यादीचें ऋण असतें तसें ऋण नव्हे, परंतु अपराध असें आहे. अणखी जर पाप यास सामान्य अर्थाप्रमाणें ऋण असें मानिलें, आणि ख्रीस्ताने केलेल्या प्रायश्चित्ताकडून तें ऋण फिटलें असें समजलें, तर मग असें ठरेल कीं, पापी मनुष्याचें अंतःकरण देवाला मान्य असो किंवा नसो, तरी त्याला इहलोकीं व परलोकींहि पापामुळें होणारें कांहींच दुःख लागूं नये. आणि पापाचा यत्किंचित दंड त्यांस लागणें अन्याय आहे, कारण ऋण एकदां फेडल्यावर त्याची फेड दुसऱ्याने घेणें अन्याय आहे. ह्मणून ऋण या शब्दाचा सामान्य अर्थ एथें धरणें योग्य नाहीं. (२) अणखी या प्रायश्चित्ताकडून ख्रीस्ताने आमच्या अन्यायांचा भार आपणावर घेऊन आह्मास न्यायोक्त केलें. परंतु असें करण्याने आमचीं पापें ख्रीस्ताचीं झालीं किंवा ख्रीस्ताचें नीतिमत्व आमचें झालें, असें समजावयाचें नाहीं. कारण कीं जर मनुष्यांचीं पापें ख्रीस्तावर गेलीं आणि ख्रीस्ताचें नीतिमत्व मनुष्यांवर आलें असा अर्थ धरिला, तर मग ख्रीस्त पापी आहे आणि मनुष्य निष्पापी आहेत, व ख्रीस्त पवित्रपणाविरहित आहे आणि मनुष्यें पवित्र आहेत असें ठरेल. परंतु वास्तविक पाहिल्यास पापीपणा किंवा पवित्रपणा आणि पाप किंवा नीतिमत्व हीं केवळ व्यक्तिवाचक आहेत; ह्मणजे ज्याचीं त्यासच लागतात, आणि एकाचीं दुसऱ्यास कदापि लागत नाहींत. ऋण एकाचें दुसऱ्यावर येऊं शकेल परंतु पाप किंवा नीतिमत्व हें एकाचें दुसऱ्यावर कदापि यावयाचें नाहीं. यास्तव ख्रीस्ताने मनु-

ल्यांचीं पापें आपणावर घेतलीं किंवा त्यांच्या पापांचा भार वाहिला, असें ह्मणण्याचा अर्थ; मनुष्यांचीं पापें ख्रीस्ताचीं असें किंवा ख्रीस्ताचें नीतिमत्व मनुष्याचें झालें नाहीं. जे कोणी ख्रीस्ताकडून न्यायीकृत होतात ते ख्रीस्ताने कधीं प्रायश्चित्त केलें नसतें, तर जसें आपल्या पापाविषयीं दोषी आणि दंडास योग्य असते तसेच आतां ख्रीस्ताने प्रायश्चित्त केल्यावरहि ते राहतात. (३) तर ख्रीस्ताने आह्मासाठीं जें प्रायश्चित्त केलें त्याचा अर्थ हाच आहे कीं, ख्रीस्ताने मनुष्यांसाठीं जें कांहीं सोसिलें तें असें होतें कीं तेणेंकडून पापाचा योग्य दंड भरला गेला; ह्मणजे त्या सोसण्याकडून पापाविषयीं देवाचा न्याय असा पूर्ण झाला कीं, त्याजवर विश्वास ठेवणाऱ्याच्या पापाची क्षमा करून त्यास जीवन देण्याने ईश्वरास कांहीं अन्याय लागत नाहीं. रोम. ३:२५, २६. यशा. ५३:५, १०,११. रोम. ५:१०. फिली. २:८. इब्री २:१०, १४.

प्र० ३. जर पाप्यानी आपण आपला दंड भोगला असतां तर त्यांस ज्या प्रकारचा व जितका दंड लागला असतां, त्याच प्रकारचा व तितकाच दंड येशू ख्रीस्ताने सोसिला कीं काय?

उ० नाहीं, कारण कीं ईश्वराविषयींच्या शत्रुत्वाच्या ज्या भावनांमुळें पापी तळमळतात, त्या ख्रीस्ताच्या ठायीं नव्हत्या. आणि आपल्या दोषाच्या भारामुळें जसे पापी व्याकूळ होत असतात तसा ख्रीस्त कधीं व्याकूळ झाला नाहीं. अणखी जीवन प्राप्त होण्याविषयींची पूर्ण निराशा झाल्याने जें दुःख पाप्यांस होत असतें तेंहि ख्रीस्तास कधीं झालें नाहीं. तथापि त्याच्या ठायीं ईश्वरी व मानवी प्रकृति यांचा जो संयोग

होता त्यावरून त्याला जी अत्यंत मोठी योग्यता व महत्व आलें होतें, त्याप्रमाणें पाहिल्यास, मनुष्यें आपल्या पापांत मरून आपल्या पापांचा योग्य दंड भोगीत असतां ज्या प्रकारचीं व जितकीं दुःखें त्यांस लागणें योग्य होतें, त्या प्रकारचीं व तितकीं दुःखें ख्रीस्ताला लागणें अगत्य नव्हतें. कारण जीं दुःखें ख्रीस्ताने सोसिलीं तीं असीं होतीं कीं, पाप्यांना सर्वकाळच्या नरकयातना लाविल्याने जे परिणाम साधिले जावयाचे होते, ते ख्रीस्ताने सोसिलेल्या दुःखांवरूनहि साधले गेले; ह्मणजे पाप्यांस नरकयातनेंत घालण्याने पापाचें दुष्टपण व पापाचा आपणास केवढा त्रास आहे, हें जसें ईश्वराने दाखविलें असतें, तसेंच ख्रीस्ताने सोसलेल्या दुःखांवरूनहि उत्तम प्रकारें दाखविलें गेलें. यास्तव ख्रीस्ताने केलेल्या प्रायश्चित्ताकडून ईश्वराच्या नेमशास्त्राचें महत्व व मान राखला गेला, ईश्वराचा न्याय पूर्ण झाला, आणि त्यामुळें पापी आणि दंडपात्र मनुष्यांवर कृपा होण्याचा योग्य मार्ग सिद्ध झाला, असें तें प्रायश्चित्त आहे.

**प्र०** ४. वर सांगितलेलीं ख्रीस्ताचीं दुःखें केवळ शारीरिक होतीं किंवा मानसिकहि होतीं?

उ० शारीरिक व मानसिक असीं दोन्ही प्रकारचीं होतीं, पण त्यांत मानसिक फार विशेष होतीं. ह्मणून पापाचें प्रायश्चित्त विशेषेंकरून त्याच्या मानसिक दुःखांकडूनच झालें. १ पेत्र. ३:१८. यशा. ५३:१०. लूका २२:४४. मात्थी २६:३८. २७:४६.

**प्र०** ५. हीं दुःखें ख्रीस्ताने आपल्या मानवी प्रकृतीने सोसिलीं किंवा ईश्वरी प्रकृतीने सोसिलीं?

उ० हीं दुःखें त्याने केवळ मानवी प्रकृतीने ह्मणजे

मानवी देह व मानवी आत्मा यांकडून सोसिलीं पण ईश्वरी प्रकृति जी त्याच्या मानवी प्रकृतीसीं संयुक्त होती तिच्या योगाने त्याच्या मानवी प्रकृतीस तीं दुःखें सोसतां आलीं, असें केवळ नाहीं पण तिच्या योगाने त्याने सोसिलेल्या दुःखांस अपार मोठी योग्यता व महत्व आलें. कारण कीं त्याच्या ठायीं ईश्वरी प्रकृति असल्यावरून तो जितक्या मोठ्या योग्यतेचा व श्रेष्ठ गणला जाण्यास योग्य होता, तितक्या प्रकारें त्याने सोसलेल्या दुःखांचें मोलहि मोठें गणलें पाहिजे.

प्र० ६. ख्रीस्ताने सोसलेलीं दुःखें अतिशय मोठीं व क्लेशदायक होतीं कीं काय?

उ० त्याचीं शारीरिक दुःखें फार दुःसह होतीं. परंतु त्याचीं मानसिक दुःखें इतकीं अपार क्लेशदायक होतीं कीं, तीं आमच्या कल्पनेंत देखील येऊं शकत नाहींत.

प्र० ७. जीं दुःखें ख्रीस्ताने सोसिलीं तीं त्याच्या खासगत शासनार्थ त्याला लागलीं कीं काय?

उ० असें ह्मणणें अगदीं अयोग्य आहे. कारण कीं जो निर्दोष आहे त्यास दुःखें लागतात असें ह्मणण्यास कांहीं असंगत नाहीं, परंतु जो निर्दोष आहे त्यास दंड किंवा शासन लागतें असें ह्मणणें अगदीं असंगत आहे. कारण अपराधावांचून शासन नाहीं. यास्तव ज्यांस शासन लाविलें तो अपराधी आहे असा सिद्धांत होतो. परंतु ख्रीस्ताने तर कधीं कांहीं पाप केलें नाहीं. ह्मणून जीं दुःखें त्याने सोसिलीं तीं त्याच्या खासगत शासनार्थ नव्हत, परंतु ज्यांचा जामीन तो झाला त्यांच्या पापाचा दंड असीं आहेत.

**प्र०** ८. मनुष्यांच्या पापासाठीं ख्रीस्ताने हें प्रायश्चित्त करण्याचें काय अगत्य होतें?

उ० ईश्वराला दयाळू करण्यासाठीं हें प्रायश्चित्त ख्रीस्ताने केलें किंवा पूर्वीं ईश्वर कठोर होता आणि ह्या प्रायश्चित्ताकडून त्याच्या मनांत दया उत्पन्न झाली असें नाहीं. कारण कीं ज्यांस सुख दुःख भोगण्याची योग्यता आहे, त्यांजवर तो अनेक उपकार पहिल्यापासून करीत आला आणि पुढेंहि करील. यावरून उघड आहे कीं ईश्वराच्या मनांत दया उत्पन्न करण्यासाठीं हें प्रायश्चित्त ख्रीस्ताने करावें याचें अगत्य नव्हतें. आणि पाप्यांला त्यांच्या पापांचा योग्य दंड लाविल्याने ईश्वर निर्दय ठरतो असेंहि नाहीं. परंतु आपणास पापाचा अगदीं वीट आहे आणि पवित्रपणाची अत्यंत आवड आहे, हें ईश्वराने पाप्यांस दंड न लावितां दाखवावें, आणि पाप्यांची क्षमा करून त्यांस जीवन देत असतांहि, त्याचा अधिकार, न्यायीपणा, आणि पवित्रता, यांस कांहीं बाध येऊं नये ह्मणून हें प्रायश्चित्त ख्रीस्ताने करावें याचें अगत्य होतें. कारण कीं जर योग्य प्रायश्चित्त झाल्यावांचून ईश्वराने मनुष्यांच्या पापांची क्षमा केली असती, तर त्याला पापाचा त्रास आहे आणि पवित्रपणाची आवड आहे हें कशावरून दिसलें असतें? त्याच्या ह्या वर्तनावरून तर असें अगदीं दिसलें नसतें. तसेंच जर तो योग्य प्रायश्चित्तावांचून पाप्यांस तारिता तर त्याच्या स्वभावाचें महत्व, व त्याच्या नेमशास्त्राचा मान, आणि त्याच्या अधिकाराची मान्यता कोठें राहिली असती? हें योग्य प्रायश्चित्तावांचून झालें नसतें. ह्मणूनच हें प्रायश्चित्त करण्याचें अगत्य होतें. रोम. ३:२५, २६. (२) अणखी जरी कोणाच्या अविचारी-

पणावरून त्यास असें वाटत असेल कीं ईश्वराने असल्या प्रायश्चित्तावांचून आह्मास तारावें यांत कांहीं अडचण नाहीं, तरी त्याने असा विचार करावा कीं, ईश्वराला मजपेक्षां अधिक ज्ञान आहे, आणि जर पाप्यांच्या तारणासाठीं हें प्रायश्चित्त अवश्य आहे, असें ईश्वराने दाखविलें आहे,तर आह्मी त्याचें अगत्य नाहीं असें कसें ह्मणावें? पाहा, जर पाप्यांच्या तारणासाठीं ह्या प्रायश्चित्ताचें अगत्य नसतें, तर ईश्वराचा पुत्र विनाकारण अवतार घेऊन आपणावर एवढीं दुःखें उगाच घेता कीं काय? आणि ईश्वर जो बाप तो तरी आपल्या पुत्रास हीं दुःखें व्यर्थ सोसण्यास लावता काय? असें अगदीं संभवत नाहीं. परंतु ईश्वराने आपल्या पुत्रास पाप्यांच्या तारणासाठीं जगांत पाठविलें; आणि पुत्राने एवढीं मोठीं दुःखें सोसून पाप्यांसाठीं तारणोपाय केला आहे,यावरून हें प्रायश्चित्त पाप्यांच्या तारणासाठीं अवश्य आहे असें ईश्वराने दाखविलें आहे. योहा. ३:१६. मात्थी २६:३९. इब्री २:१०. (३) आणि शास्त्रांतील बहुत वाक्यांतहि असेंच स्पष्ट सांगितलें आहे. लेवी १७:११. इब्री ९:२२. प्रग० ७:१४. एफ. १:७. प्रग० ५:९.

प्र० ९. पापी मनुष्यानी आपल्या पापांचा खरा पश्चात्ताप करून तेव्हांपासून नेहमी ईश्वराच्या सर्व आज्ञा पाळिल्या, तरं एवढ्यावरूनच ते आपल्या पापांची क्षमा पावण्यास योग्य होतील कीं काय?

उ० अगदीं नाहीं. कारण योग्य प्रायश्चित्तावांचून पापाची क्षमा होऊं शकत नाहीं हें वर दाखविलें आहे. आणि पश्चात्ताप करणें व पुढें आज्ञा पाळणें यांकडून पाप नाहींसें होतें, किंवा तें कमी दंडास पात्र होतें, किंवा त्या-

कडून झालेल्या अपकारांचें निवारण होतें, असें नाहीं. ह्मणून पश्चात्ताप करणें व पुढें आज्ञा पाळणें येणेंकडून पापाचें योग्य प्रायश्चित्त होऊं शकत नाहीं. आणि हल्लीं आज्ञा पाळण्याने मागील आज्ञोल्लंघन व त्यावरून झालेला नाश, हीं नाहींसीं होतात असें नाहीं. सांप्रतचें आज्ञाधारण जर पूर्ण असलें तर तें सांप्रतच्या काळासाठीं मात्र पुरें आहे. परंतु तें मागील किंवा पुढील काळांतलेंहि आज्ञोल्लंघन दूर करण्यास चालत नाहीं. यास्तव पश्चात्ताप करणें व तेव्हांपासून आज्ञा पाळणें, एवढ्यावरूनच कोणी तारण पावण्यास योग्य होणार नाहीं.

प्र० १०. हें प्रायश्चित्त कसें व कोणासाठीं आहे?

उ० हें परिपूर्ण व सार्वत्रीक; ह्मणजे सर्व मनुष्यांस लागण्याजोगें व पुरण्याजोगें आहे. याचें (१) लें प्रमाण हें आहे कीं, प्रायश्चित्त करणारा जो प्रभु येशू ख्रीस्त तो अपार महत्वाचा व अपार मोठ्या योग्यतेचा आहे. यास्तव त्याने सोसलेलीं दुःखें व मरण हीं अपार मोठीं व अपार योग्यतेचीं असतां त्या दुःखांकडून झालेलें प्रायश्चित्त सर्व माणसांस पुरेल एवढें मोठें आहे, व हें प्रायश्चित्त सर्व माणसांस पुरण्याजोगें नाहीं, असें ह्मणण्याने तारणाऱ्याचा गौरवी व श्रेष्ठ पदवीचा मान कमी होतो. (२) रें, त्या प्रायश्चित्ताच्या प्रकारावरून उघड दिसतें कीं, तें जसें मनुष्यजातींतील एकाला तसें सर्व मनुष्यांसहि लागण्याजोगें आहे. कारण तें प्रायश्चित्त असें आहे कीं, ईश्वर त्यामुळें अपराध्यांवर न्यायाने कृपा करूं शकतो; ह्मणजे ह्या प्रायश्चित्तावर विश्वासणाऱ्यांस न्यायीकृत करण्याने त्याला अन्याय लागत नाहीं, असें हें प्रायश्चित्त आहे. यास्तव हें प्रत्येक मनुष्यास लागण्या-

जोगें व पुरण्याजोगें आहे. (३) अणखी शास्त्रामध्यें पापी माणसांस हें तारण घेण्यासाठीं ज्या आज्ञा व जीं आमंत्रणें व जीं वचनें दिल्हीं आहेत त्यांवरूनहि असेंच सिद्ध होतें. कारण ईश्वर आपल्या शास्त्रामध्यें,सर्व पापी माणसांस तारण घेण्याची आज्ञा करितो व वचनें देतो आणि तारण घेण्यास बोलावितो. परंतु जर हें प्रायश्चित्त सर्व पापी माणसांस लागण्याजोगें व पुरण्याजोगें नसतें, तर असीं वचनें व आज्ञा ईश्वराने दिल्ह्या नसत्या. मार्क १६:१५,१६. प्रे० १७:३०. यशा. ४५: २२. ५५: १. प्रग. २२: १७. (४) अणखी सर्व माणसांच्या तारणासाठीं प्रार्थना करावी असी आज्ञा ईश्वराने आपल्या शास्त्रांत दिल्ही आहे. परंतु हें प्रायश्चित्त सर्व मनुष्यांस लागण्याजोगें व पुरण्याजोगें नसतें, तर ईश्वर असी आज्ञा कसी करिता? १ तीम. २:१. (५) अणखी शास्त्रांतल्या बहुत वाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, हें तारण सर्व माणसांस लागण्याजोगें व पुरण्याजोगें आहे. १ यो० २:२. इब्री २:९. १ तिम. २:६. २ करिं० ५: १४,१५. योहा. १:२९.

प्र० ११. ईश्वराच्या पुत्रावांचून दुसरा कोणी हें प्रायश्चित्त करण्यास योग्य होता कीं काय?

उ० नाहीं. ईश्वर जो पुत्र त्यावांचून दुसरा कोणी हें प्रायश्चित्त करण्यास योग्य न्हता, असें दिसतें. कोणी उत्पन्न झालेल्याच्याने तर हें प्रायश्चित्त करवत नाहीं. कारण कीं जें कांहीं चांगलें त्याच्याने करवतें तें सर्व करण्यास तो बांधलाच आहे. ह्मणजे तें सर्व करणें हें त्याचें कर्त्तव्यच आहे. ह्मणून उत्पन्न झालेल्यांतून जो सर्वांह्न पवित्र व निर्दोष

आहे त्याच्याने देखील पापी माणसांच्या तारणासाठीं कांहीं करवत नाहीं. कारण कीं तो जें कांहीं करूं शकतो तें त्याजसाठींच पुरें इतकेंच आहे. आणि ईश्वरपणामध्यें ज्या तीन व्यक्ति आहेत त्यांमध्यें ह्मटलें तर दुसरा जो पुत्र त्यास मात्र हें प्रायश्चित्त करितां येण्याजोगें आहे,असें दिसतें, कारण त्याने मात्र मानवी प्रकृति धारण केली आहे. आणि त्याच्याच ठायीं मानवी व ईश्वरी ह्या दोन्ही प्रकृति असल्यावरून तो मात्र पाप्यांच्या प्रायश्चित्तासाठीं जें करावयाचें आहे तें सर्व करण्यास योग्य व शक्तिमान आहे. योहा० १०: १७,१८.

प्र० १२. ईश्वर जो पुत्र त्याला अवतार घेतल्यावांचून हें प्रायश्चित्त करितां आलें नसतें कीं काय?

उ० पापाचें प्रायश्चित्त करण्यासाठीं दुःख व मरण सोसतां यावें आणि तेंहि ज्या प्रकृतीने मनुष्याने पाप केलें आहे, त्याच मानवी प्रकृतीने सोसतां यावें ह्मणून त्याला मानवी अवतार घेण्याचें अगत्य होतें. इब्री २:१४. ९:१४,१५.

प्र० १३. जर ख्रीस्ताने केलेलें प्रायश्चित्त सर्व माणसांस पुरण्याजोगें आहे, तर सर्वच माणसांचें तारण कां होत नाहीं?

उ० मनुष्यजातींतील कित्येकांचें तारण होत नाहीं याचें कारण हेंच कीं, ज्या रितीने त्यांस तारण मिळण्याजोगें आहे, ह्मणजे ज्या रितीने तारण घेण्यास ईश्वर सांगतो त्या रितीने ते घेत नाहींत. सारांश, हा तारणोपाय सर्वांस पुरण्याजोगा नाहीं ह्मणून असें नव्हे, परंतु आपलें विपरीतपण, अपश्चात्तापीपण आणि अविश्वासी दुष्ट अंतःकरण

त्यांमुळें ते मनुष्य तारण पावत नाहींत. यास्तव जे आपल्या पापांत मरून नाश पावतात, त्यांचा दोष केवळ त्यांच्याच माथां आहे; ह्मणजे त्यांला कांहीं निमित्त देखील सांगण्याची जागा राहत नाहीं. रोम ३: १९. लूका १३: ३. मार्क १६: १६. योहा. ५: ४०. ३: १९.

प्र० १४. प्रायश्चित्त आणि उद्धार या शब्दांच्या अर्थामध्यें कांहीं भेद आहे कीं काय?

उ० होय, त्यांमध्यें भेद आहे, तो असा कीं प्रायश्चित्त हें पापाकरितां, आणि उद्धार हा पापापासून आणि पापाच्या दंडापासून सुटका होणें असा आहे. उद्धार होणें ह्मणजे प्रायश्चित्त लागू होणें असें आहे. यास्तव उद्धार आणि प्रायश्चित्त हीं एक नव्हत. येशू ख्रीस्ताने सर्व मनुष्यांसाठीं प्रायश्चित्त केलें आहे, तरी सर्व मनुष्यें उद्धार पावतात असें नाहीं. जे प्रायश्चित्त अंगीकारितात तेच उद्धार पावतात. अणखी कोणाचा उद्धार व्हावा असी प्रार्थना करणें योग्य आहे, परंतु कोणासाठीं प्रायश्चित्त व्हावें असी प्रार्थना करणें योग्य नाहीं. कारण कीं प्रायश्चित्त सर्वांसाठीं एकदांच सिद्ध झालें आहे. परंतु तें जेव्हां व ज्यास लागू होईल तेव्हां व तोच मात्र उद्धार पावेल. असा त्या दोन शब्दांच्या अर्थाचा भेद आहे. जरी शास्त्रामध्यें कधीं कधीं उद्धार हा शब्द पापाचें प्रायश्चित्त व तें प्रायश्चित्त लागू होऊन उद्धार होणें, या दोन्ही अर्थीं योजला आहे, तरी या दोन शब्दांच्या विशेष ह्मणजे मूळ अर्थाचा भेद आहे, तो वर दाखविला आहे. तो समजणें फार अगत्य आहे. हा भेद न समजल्यावरूनच कित्येक लोकांनीं असें अयोग्य मत धरिलें कीं, ज्यापेक्षां सर्व जगासाठीं प्रायश्चित्त झालें आहे,

त्यापेक्षां सर्वच मनुष्यें तरतील; मग ते हें प्रायश्चित्त अंगीकारोत किंवा न अंगीकारोत. परंतु शास्त्राचा अभिप्राय ध्यानांत आणिल्यास हें मत अगदीं खोटें आहे असें दिसतें. शास्त्रांतील बहुत वाक्यांत स्पष्ट दाखविलें आहे कीं, कोणी पाप्याचा उद्धार होणें, ह्मणजे हें प्रायश्चित्त त्यास लागू होणें असें आहे. आणि हा अर्थ चांगला समजल्यावर सर्वच मनुष्यांचा उद्धार होईल असें मत धरण्याची कांहीं जागा राहत नाहीं. कारण स्वयंपाक तयार होणें आणि जेवणें यांमध्यें जसा भेद आहे तसाच प्रायश्चित्त व उद्धार यांमध्यें भेद आहे. जरी सिद्ध केलेलें अन्न सर्वांस पुरण्याजोगें असलें तरी जे कोणी तें अन्न खातील त्यांचेंच मात्र पोट भरेल. तसेंच जरी हें प्रायश्चित्त सर्वांसाठीं सिद्ध आहे, तरी जे कोणी हें अंगीकारितील आणि पवित्र आत्म्याच्या सहायाने आपणास लागू करून घेतील तेच मात्र उद्धार पावतील.

प्र० १५. प्रायश्चित्ताविषयींचा सिद्धांत शुभवर्त्तमानांतील मुख्य आणि मोठा सिद्धांत असा आहे कीं काय?

उ० होय. ख्रीस्त येशू जो नेमशास्त्रांतील शापापासून आह्मास खंडून घेण्यासाठीं आमचा बदला, ह्मणजे जामीन होऊन आमच्या प्रायश्चित्तार्थ अर्पण झाला, त्याजवर विश्वास ठेवल्यावांचून कोणाचें तारण होणार नाहीं, असें शास्त्रामध्यें फार बजावून सांगितलें आहे. आणि वधस्तंभावर ख्रीस्त येशू मारलाजाणें, ही गोष्ट सर्व शुभवर्त्तमानाचा मुख्य अभिप्राय व गौरव असी आहे. योहा. १४: ६. प्रे० ४: १२. १ करिं. १: २३,२४. २: २. गाल. ६: १४.

प्र० १६. प्रायश्चित्ताविषयींचा सिद्धांत केवळ ईश्वरी

शास्त्रावरून मात्र समजतो किंवा सृष्टिजन्य ज्ञानावरूनहि समजतो ?

उ० आपल्या विवेकावरून किंवा सृष्टिजन्य ज्ञानावरून या सिद्धांताविषयीं कांहींच समजावयाचें नाहीं. या सिद्धांताचें ज्ञान केवळ ईश्वरी शास्त्राकडून प्राप्त होतें. आणि याच सिद्धांताच्या ज्ञानावरून ख्रिस्ती धर्म हा निश्शास्त्रवादी धर्म, महमदी धर्म, आणि मूर्त्तीपुजकांचे धर्म यांपासून अगदीं वेगळा आहे. यास्तव जे कोणी या सिद्धांताचा नाकार करितात ते ख्रिस्ती धर्मावर विश्वास ठेवणारे आहेत असें समजावयाचें नाहीं.

---

## प्रकरण १४.

## पुनर्जन्म.

प्र० १. आत्म्याचा पुनर्जन्म होणें ह्मणजे काय ?

उ० पाण्याचा बाप्तिस्मा मिळणें; अथवा पंथांतर होणें, ह्मणजे एक पंथ किंवा सांप्रदाय सोडून दुसरा धरणें, अथवा बाह्य आचरण ह्मणजे चालीरीति सुधरणें; अथवा आत्म्याला कांहीं नव्या मानसिक शक्ति मिळणें; अथवा आपल्या आत्मिक स्थितीविषयीं कांहीं विशेष भय किंवा समाधान वाटणें; अथवा तारण होण्याविषयींची ईश्वरी योजना सुचणें अथवा प्रगट होणें; अथवा धर्मसंबंधी कांहीं मतांचा पालट होणें, अथवा आपल्या पापांविषयीं नुसती खातरी होणें; हा आत्म्याचा पुनर्जन्म नव्हे. परंतु अंतःकरणाच्या स्वाभाविक अशुद्ध भावना व वासना पालटून शुद्ध होणें, ह्मणजे आत्म्याच्या ठायीं पवित्रतेचा आरंभ होणें हाच आ-

त्म्याचा पुनर्जन्म आहे. १ योहा० ४:७. २ करी. ५:१७. एफे० ४:२२–२४.

प्र० २. सदरहु पुनर्जन्म होतांच आत्मा पूर्ण पवित्र होतो कीं काय?

उ० असें नाहीं, कारण कीं आत्म्याचा पुनर्जन्म होण्याने आत्म्याचा स्वभाव व मुख्य धोरण हीं बदलून जरी पवित्र होतात, तरी तो पुनर्जन्म पावतांच पूर्ण पवित्र ह्मणजे अगदीं निष्पापी होतो असें नाहीं. कारण आत्म्याचा पुनर्जन्म होण्याने त्याच्या ठायीं पवित्रपणाचा प्रारंभ मात्र होतो. आणि पवित्रीकरणाचे उपाय व साधनें जीं ईश्वराने नेमून ठेविलीं आहेत, त्यांच्या योगाने अधिकाधिक पवित्र होत जाऊन मरणाच्या वेळेस तो पूर्ण पवित्र होतो. शास्त्रांतील बहुत वाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, कोणी मनुष्य या आयुष्यांत असतां, पूर्ण पवित्र ह्मणजे अगदीं निष्पापी होत नाहीं. उप० ७:२०. इयो० ९:२०. रोम० ७:२४. १ योहा० १:८,१०.

प्र० ३. आत्म्याचा पुनर्जन्म एकदम ह्मणजे एकाएकीं होतो, किंवा अंशअंशेंकरून होत जाऊन कालांतराने पूर्ण होतो?

उ० तो एकदम ह्मणजे एकाएकींच होतो. कारण कीं कोणी माणसाने एकाच काळीं आत्मीक अर्थाने मेलेला असावें, व जिवंतहि असावें; किंवा भक्त असावें आणि अभक्तहि असावें; किंवा ख्रीस्ताच्या पक्षीं असावें आणि प्रतिपक्षींहि असावें हें अगदीं असंभाव्य आहे. यास्तव आत्म्याचा पुनर्जन्म ह्मणजे आत्म्याच्या ठायीं पवित्रतेचा आरंभ जो होतो, तो क्षणमात्रांत एकाएकीं होतो असें समजलें पाहिजे.

आत्म्याचा पुनर्जन्म होणें याविषयीं ज्या उपमा शास्त्रांत लिहिल्या आहेत, त्यांवरूनहि असाच सिद्धांत होतो. पुनर्जन्म होणें ह्मणजे मरणापासून जीवनाकडे पार जाणें, अथवा मेलेल्यांतून पुन्हा उठणें, अथवा नवा जन्म होणें, अथवा नवीन उत्पन्न होणें, आहे; असें शास्त्रांत वर्णिलें आहे. परंतु जिवंत होणें, जन्मणें, अथवा उत्पन्न होणें, हें अंश अंशेंकरून होत नसतें. पण एकदम ह्मणजे एकाएकीं होत असतें. यास्तव ह्या उपमांकडून वर्णिलेला आत्म्याचा पुनर्जन्महि एकदम ह्मणजे एकाएकीं होतो असें सिद्ध होतें. तथापि हा पुनर्जन्म होण्याच्या पूर्वींची तयारी जी मनुष्याच्या आत्म्याच्या ठायीं पवित्र आत्म्याच्या योगाने होत असती, ती अंशअंशाने होती असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आणि ईश्वरी इच्छेप्रमाणें ही तयारी कोणी कोणाची थोड्या काळांत आणि कोणी कोणाची बहुत काळाने होत असती, हें अनुभवावरून समजतें. याप्रमाणें आत्म्याचा पुनर्जन्म तर एकदम ह्मणजे एकाएकीं होतो, परंतु आत्मा निष्पाप होणें हें अंशअंशेंकरून वर्धमानगतीने होत असतें.

प्र० ४. आपल्या आत्म्याचा पुनर्जन्म, कोणत्या वेळेस झाला, हें सर्व ईश्वरभक्तांस बरोबरच समजत असतें कीं काय?

उ० आपल्या आत्म्याच्या पुनर्जन्माची निश्चित वेळ कोणी कोणास कळती व कोणी कोणास अगदीं कळत नाहीं असें बहुत ख्रिस्ती झालेल्यांच्या अनुभवावरून समजून आलें आहे. प्रे० २:४१.

प्र० ५. मनुष्यांचें तारण होण्यासाठीं त्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म होणें अवश्य आहे कीं काय?

उ० होय, अवश्य आहे. कारण, (१) आकाशलोकांत सर्वत्र पवित्रताच आहे आणि अपवित्र व अशुद्ध असें कांहींच तेथें नाहीं. तेथील सर्व उद्योग आणि उपभोग केवळ पवित्रपणाचे आहेत. असें असतां ज्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म झाला नाहीं, ह्मणजे ज्यांचा स्वभाव भावना आणि वासना हीं केवळ पापिष्टच आहेत, त्यांस तेथील उद्योग व उपभोग अगदीं गोड लागावयाचे नाहींत. यास्तव ज्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म झाला आहे त्यांवांचून दुसरे कोणी आकाशांत जाऊन सुखी होणार नाहींत. (२) अणखी जे सर्व आकाशांत राहतात, त्यांकडे पाहून ईश्वरास नेहमी संतोष वाटतो; ह्मणजे ते सर्व ईश्वरास आवडते आहेत, असें शास्त्रांत दाखविलें आहे. त्यावरून समजतें कीं ज्यांकडे पाहण्यास ईश्वरास संतोष वाटणार नाहीं असे कोणी आकाशांत जाऊं शकणार नाहींत. आणि जे अपवित्र व पापिष्ट आहेत त्यांविषयीं तर ईश्वरास कधींच संतोष वाटत नाहीं. यास्तव ज्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म झाला नाहीं त्यांस ईश्वर आकाशलोकीं येऊं देणार नाहीं हें उघड आहे, आणि ज्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म झाला नाहीं ते आकाशांत जाणार नाहींत असें शास्त्रांतील अनेक वाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे. योहा० ३:३,७. इब्री १२:१४. गाला० ६:१५. रोम० ८:७,८. १ करिं० २:१४.

प्र० ६. कोणी मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म मरणानंतर होतो कीं काय?

उ० कदापि नाहीं. कारण ईश्वरी नेमाप्रमाणें हें आयुष्य मात्र मनुष्याच्या परीक्षेच्या अवस्थेचा व ईश्वरी प्रसन्नता मिळविण्याचा समय आहे. आणि मरणानंतर सर्वकाळपर्यंत

प्रत्येक मनुष्यास आपल्या कर्मांचें प्रतिफळ भोगावयाचें आहे, यास्तव मरणानंतर कोणा मनुष्याच्या मनाचा पुनर्जन्म व्हावयाचा नाहीं. प्र० २२:११. उप० ९:१०.

प्र० ७. मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म करणारा कोण आहे ?

उ० देवपणांतील तिसरा जो पवित्र आत्मा तोच आत्म्याचा पुनर्जन्म करणारा आहे. यहेज० ३६:२६. योहा० १:१३. तित० ३:५.

प्र० ८. ईश्वर सर्वच मनुष्यांच्या आत्म्यांचा पुनर्जन्म करितो कीं काय ?

उ० नाहीं. तो ज्यांस इच्छितो त्यांस मात्र आपणाकडे फिरवितो आणि दुसऱ्यांस त्यांच्या पापांमध्यें मरूं देतो. परंतु कोणाच्याहि आत्म्याचा पुनर्जन्म करण्यास ईश्वर बांधला नाहीं. ह्मणून त्याचें सर्वज्ञान आणि दयाळूपणा यांप्रमाणें ज्यांस आपणाकडे फिरवून तारावें ह्मणून त्यास योग्य दिसतें त्यांजवर कृपा करून त्यांच्याच मनाचा पालट करणें आणि इतरांस त्याच्या पापांत मरूं देणें येणेंकडून त्याला कांहीं दोष लागत नाहीं. रोम० ९:१६. १करिं० ३:६,७. याको० १:१८.

प्र० ९. मनुष्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म होतांना त्यांची मानसिक स्वतंत्रता नष्ट होती, किंवा कमी तरी होती कीं काय ?

उ० ती नष्ट होत नाहीं व कमीहि होत नाहीं. कारण कीं मनुष्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म करण्यासाठीं जी प्रेरणा ईश्वर करितो, ती तो त्यांजवर बळात्कार करून करीत नाहीं. पण त्यांस राजी व मान्य करून त्यांच्या इच्छेच्या अनुमो-

दनानें करितो. ती प्रेरणा प्रथम त्यांचें मन असें सुप्रकाशित करिती कीं, ईश्वरी आज्ञेप्रमाणें चालणें, हें चांगलें व हितावह आहे, असें त्यांस समजूं लागतें. मग ती ईश्वरी आत्म्याची प्रेरणा त्याच्या मनोवृत्ति आणि अभिरुचि यांला असें प्रेरिती कीं, त्याला पाप कंटाळवाणें व पवित्रपण आवडतें असें वाटूं लागतें. तेव्हां अर्थातच त्याचा समज आणि अभिरुचि यांच्या अनुरोधेंकरून मनुष्याचा आत्मा चांगलीं व पवित्र कामें करण्याची इच्छा धरण्यास प्रेरला जातो. आतां हें करण्यासाठीं जी प्रेरणा पवित्र आत्मा मनुष्याच्या आत्म्याच्या ठायीं करितो, ती आह्मास कसी व कोणत्या प्रकारें लागती, हें समजणें जरी आमच्या बुद्धीच्या शक्तिपलिकडे आहे, तरी असी प्रेरणा प्राप्त झाल्यावर ती आपणास प्राप्त झाली आहे, हें समजणें कांहीं कठीण नाहीं. आणि ज्यांस ही प्रेरणा झाली त्या सर्वांचा हाच अनुभव आहे कीं, ईश्वरी आत्म्याची प्रेरणा आह्मास होत असतां, आह्मी स्वतंत्रतेनें व स्वेच्छेनें ईश्वराकडे फिरलों.

प्र० १०. पवित्र आत्म्याच्या ज्या प्रेरणेनें मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म होतो, ती विशेष किंवा साधारण प्रेरणा आहे?

उ० पवित्र आत्म्याची दोन प्रकारची प्रेरणा मनुष्याच्या आत्म्यास होत असती. त्यांतील ज्या प्रेरणेनें मनुष्याचें मन पालटतें, ती विशेष प्रेरणा, आणि ज्या प्रेरणेनें मनुष्यास चांगल्या सूचना होतात, तरी तो पालटत नाहीं, ती सामान्य प्रेरणा; असें ह्मटलें आहे. पवित्र आत्म्याची प्रेरणा असी दोन प्रकारची आहे, हें यावरून समजतें कीं, ज्यांस पवित्र आत्म्याची प्रेरणा होती, त्यांतील अमुकच मनुष्याचीं

मनें ईश्वराकडे फिरतात, आणि दुसरे तसेच पापांत राहतात यावरून उघड दिसतें कीं जे पालटले जाऊन ईश्वराकडे फिरतात, त्यांस पवित्र आत्म्याची विशेष प्रेरणा मिळती, व जे पवित्र आत्म्याची प्रेरणा झाल्यावरहि अपश्चात्तापी राहतात, त्यांस पवित्र आत्म्याची सामान्य प्रेरणा मिळती, असें समजणें अवश्य आहे. पवित्र आत्म्याच्या ज्या प्रेरणेस विशेष प्रेरणा ह्मटलें आहे, तिलाच कधीं कधीं अविरोध्य प्रेरणाहि ह्मणतात. त्यावरून त्या प्रेरणेचा विरोध अथवा अव्हेर कधीं कोणी करीत नाहीं, असा अर्थ धरावयाचा नाहीं. परंतु ती प्रेरणा असी प्रबळ आहे कीं, मनुष्याचा सर्व विरोध आणि अव्हेर यांस जिंकून ह्मणजे निवारून त्या मनुष्याला ईश्वरी इच्छेस वश्य केल्यावांचून राहत नाहीं. ह्मणजे ज्यांस पालटून पवित्र करावें व तारावें असी ईश्वराची इच्छा आहे, त्यांस तो ती विशेष ह्मणजे अविरोध्य प्रेरणा लावितो, आणि तिच्या योगाने ते पालटले जाऊन तारले जाण्यास योग्य होतात. गीत ११०:३.

प्र० ११. मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म होण्यासाठीं पवित्र आत्म्याची प्रेरणा कां अवश्य आहे ?

उ० त्याला पवित्रता धरण्याची शक्ति नाहीं ह्मणजे त्याच्या कांहीं मानसिक शक्ति कमी झाल्या आहेत ह्मणून नव्हे. कारण कीं ज्या मानसिक शक्ति कोणत्याहि पवित्र प्राण्यास आहेत त्याच पापिष्ट मनुष्यासहि आहेत; परंतु तो पवित्रता धरण्यास खुशी नाहीं, आणि ईश्वराच्या आज्ञा पाळणें त्यास आवडत नाहीं. ह्मणून पवित्रता धरण्याची ईच्छा आणि ईश्वरी आज्ञा पाळण्याची आवड त्याच्या ठायीं उत्पन्न करण्यासाठीं मात्र पुनर्जन्मांत पवित्र आत्म्याची प्रेरणा

अवश्य आहे. यावरून एक अनुमान असें निघतें कीं पवित्र आत्म्याने प्रेरल्यावांचून कोणी पापी मनुष्य ईश्वराकडे फिरणार नाहीं, ही गोष्ट जरी खरी आहे, तरी यावरून कोणी पाप्यास आपल्या पापांत राहण्याविषयीं कांहीं निमित्त सांगण्याची जागा होत नाहीं, कारण कीं तो ईश्वराकडे फिरत नाहीं हें त्यास असें करण्याची शक्ति नाहीं ह्मणून नव्हे, परंतु तो असें करण्यास खुशी नाहीं ह्मणून तो अपश्चात्तापी राहतो. योहा० ५:४०.

प्र० १२. मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म होण्यांत मनुष्य हा कर्त्ता असतो किंवा अकर्त्ता असतो?

उ० तो एका अर्थीं कर्त्ता असतो आणि दुसऱ्या अर्थीं अकर्त्ता असतो; ह्मणजे त्याचा पुनर्जन्म करण्यासाठीं पवित्र आत्म्याची प्रेरणा त्याला लागत असतां, तो मान्य होऊन आपल्या स्वसंतोषाने वळतो व पवित्रता धरितो. ज्या काळीं पवित्र आत्मा त्याला पालटविण्यासाठीं प्रेरितो, त्याच काळीं मनुष्य आपणहि आपलें मन पालटण्यास आपल्या परीं झटतो; असें कीं त्या उभयतांच्या क्रिया सहवर्त्तमान व सुमेळाने चालून त्यांकडून मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म होणें हें कार्य घडतें. मी तुह्मामध्यें नवें अंतःकरण उत्पन्न करीन असें ज्यांस ईश्वर सांगतो, त्यांसच तो आज्ञा करितो कीं, तुह्मी आपलें अंतःकरण पालटून नवें करा. यावरून सदरीं सांगितलेलाच अर्थ सिद्ध होतो. यहेज. १८: ३१. ३६: २६. फिली. २: १२,१३.

प्र० १३. अमुक मनुष्याचा पुनर्जन्म झाला आहे हें कशावरून समजतें?

उ० (१) पवित्र शास्त्रांतील सिद्धांत व बोध खरे आणि

उत्तम आहेत असें मनापासून मानणें; (२) सद्भक्तांसीं सहवास आणि भाषण करण्याची आवड धरणें; (३) ईश्वराचें भजन मंडळींत, कुटुंबांत, आणि एकांतीं करण्याची आवड धरणें; (४) पवित्र शास्त्र आणि दुसरीं धर्मसंबंधी पुस्तकें वाचण्याची आणि धर्मसिद्धांतांविषयीं मनन करण्याची उत्कंठा असणें; (५) मंडळीच्या वृद्धीवरून हर्षीत होणें आणि ख्रीस्ताच्या राज्याचा प्रसार करण्यास इच्छिणें; (६) सर्व प्रसंगीं सर्वांसीं योग्य नम्रता व लीनता धरणें; (७) सर्व मनुष्यांच्या कल्याणाची इच्छा बाळगणें आणि ख्रिस्ती भावांची आवड धरणें; (८) पापाचा तिरस्कार व पवित्रतेची आवड धरून पवित्र होण्यास मोठ्या उत्कंठेने व तत्परतेने निरंतर झटणें; (९) आणि ईश्वराच्या सर्व आज्ञा नेहमीं पाळण्यास झटणें;— हीं लक्षणें ज्यांच्या ठायीं दिसतात त्यांच्या आत्म्याचा पुनर्जन्म झाला आहे असें समजावें. योहा० ३:८. रोम. ८:१४,१६. मला. ३:१६. गीत ८४:२. ११९:९७. १०२:१४. मात्थी ११:२९. मार्क. १२:३१. रोम. ७:२४. १ योहा. ३:१४,१०. २:३.

प्र० १४. ज्यांच्या मनाचा पुनर्जन्म झाला आहे त्यांस आपल्या पुनर्जन्माविषयीं कधीं कांहीं संशय वाटत असतो कीं काय?

उ० होय, कधीं कधीं त्यांस आपल्या पुनर्जन्माविषयीं संशय वाटतो त्याचीं कारणें हीं आहेत. (१) आत्म्याचा पुनर्जन्म होणें ह्मणजे काय हें त्यांस पुरतेपणीं समजत नसतें. (२) अथवा त्यांच्या अंतःकरणांत पापिष्टपणाचा मोठा अवशेष राहिला असतो. (३) अथवा त्यांच्या ख्रिस्ती सद्गुणांमध्यें उणेपणा असतो. (४) अथवा त्यांस आपल्या

धर्मसंबंधी मनोवृत्तींविषयीं गैरसमजूत असती. (५) अथवा कोणी कोणाची प्रकृति स्वभावाने विशेष ग्लान व उदास असती. कोणास यांतील एक किंवा अधिक कारणांवरून व कोणास या सर्व कारणांवरुन आपला पुनर्जन्म झाला नसेल असा संशय येतो. परंतु जेव्हां असले संशय ख्रिस्ती मनुष्यांच्या मनांत येतात, तेव्हां त्यांनीं पुनर्जन्माचीं जीं लक्षणें १३ व्या प्रश्नांत वर्णिलीं आहेत, तीं आपणास लावून पाहून आपली परीक्षा करावी. आणि याविषयीं आपली परीक्षा आपणास करितां येई इतकें आत्मिक ज्ञान मिळावें, आणि आपलें धार्मीकपण वाढावें, आणि ईश्वराच्या सर्व आज्ञा आपणांकडून पाळल्या जाव्या, ह्मणून ईश्वराजवळ साह्य मागावें हें त्यांस योग्य आहे.

प्र० १५. कोणत्या वयांत बहुतांचा पुनर्जन्म होतो?

उ० तरूणपणांत आणि प्रौढपणांत बहुतेकांचा पुनर्जन्म होतो. तरी कोणी कोणाचा लेंकुरपणांत आणि कोणाचा म्हातारपणांतहि होतो.

---

## प्रकरण १४.

## प्रीति.

प्र० १. प्रीति किती प्रकारची आहे?

उ० परोपकारी आणि प्रसन्नतेची असी दोन मुख्य प्रकारची आहे.

प्र० २. परोपकारी प्रीति ह्मणजे काय?

उ० सचेतन ह्मणजे सुख दुःख भोगण्यास योग्य अशा

प्राण्यांस सुखी करण्याची जी इच्छा, तिला परोपकारी प्रीति ह्मटलें आहे.

प्र० ३. ही परोपकारी प्रीति कोणावर व किती करावी?

उ० ईश्वर जो सनातन व परिपूर्ण आहे आणि कधीं गरजवंत होत नाहीं, त्याजवर ह्या प्रकारची प्रीति करणें असंभाव्य आहे. तर निर्मित प्राण्यांतील जे गरजवंत आहेत त्यांजवर मात्र ही प्रीति करितां येती. निर्मित प्राण्यांवर ही प्रीति किती करावी याविषयीं सांगतांना प्रभु येशू ख्रीस्त ह्मणाला, "जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर." याचा अर्थ, आह्मी आपलें हित साधण्यासाठीं जितकें झटतों, तितकेंच जगांतील प्रत्येक मनुष्याचें हित साधण्यास आह्मी झटावें, असा नाहीं. कारण असें करणें कोणासहि साध्य नाहीं. तर याच विषयावर प्रभु येशू दुसरें एक वाक्य बोलला आहे, त्यावरून याचा अर्थ अधिक स्पष्ट समजेल. तें असें आहे, "माणसानी ज्या ज्या रीतीने तुह्मासीं वर्त्तावें ह्मणून तुमची इच्छा आहे, त्याच रीतीने तुह्मीहि त्यांसीं वर्त्ता." ह्मणजे जसे दुसऱ्यानी आमचें अनहित न करितां आह्मास सुखी करण्यास आह्मावर उपकार करावे ह्मणून आह्मी इच्छितों, तसेंच आह्मी दुसऱ्याचें अनहित न करितां, त्याची गरज करण्याने त्यास सुखी करण्यासाठीं आपल्याकडून जितकें होऊं शकेल तितकें करावें. आणि हा उपकारहि ज्याजवर करणें आहे, त्याची योग्यता व पात्रपण पाहून त्याप्रमाणें अधिक उणा करावा, हें योग्य आहे. तसेंच जे आमचे विशेष संबंधी आहेत, व जे आमच्या विशेष संघटनांत व विशेष पाहण्यांत आहेत, त्यांवर ही प्रीति

दुसऱ्यांपेक्षां विशेष प्रकारें करावी हेंहि योग्य आहे. मार्क १२:३०,३१.

प्र० ४. शुद्ध ह्मणजे वास्तविक परोपकारी प्रीति कसी असती?

उ० वास्तविक परोपकारी प्रीति निस्पृही आणि अस्वार्थिक असती; ह्मणजे ज्याजवर उपकार करणें आहे, त्याजकडून आपला कांहीं स्वार्थ साधण्याच्या हेतूनें नव्हे, परंतु तो गरजवंत आहे असें पाहून त्याची गरज करण्यानें त्यास सुखी करण्याच्या हेतूनें त्याजवर उपकार करणें, हीच शुद्ध व वास्तविक परोपकारी प्रीति आहे. ही प्रीति सर्वांस पसंत आणि स्तुत्य वाटती. तरी जे ही प्रीति खरोखर करितात असे फार थोडे मनुष्य अढळतात.

प्र० ५. प्रसन्नतेची प्रीति ह्मणजे काय?

उ० प्राण्यांचें चांगुलपण व पवित्रपण यांवरून त्यांची जी आवड आपल्या ठायीं उत्पन्न होती, तिला प्रसन्नतेची प्रीति ह्मणावें. परोपकारी प्रीति ही बरे आणि वाईट अशा सर्वांवर करावयाची आहे. परंतु प्रसन्नतेची प्रीति केवळ चांगल्या व पवित्र प्राण्यांवर मात्र करावयाची आहे. ईश्वर सर्व प्राण्यांवर उपकार करितो. परंतु त्यांतील जे पवित्र व चांगले आहेत त्यांचीच आवड धरितो. तसेंच आह्मीहि सर्वांवर परोपकारी प्रीति करावी, परंतु त्यांतील जे चांगले व पवित्र आहेत त्यांजवर मात्र प्रसन्नतेची प्रीति करावी; ह्मणजे त्यांची आवड धरावी.

प्र० ६. प्रसन्नतेची प्रीति व परोपकारी प्रीति यांमध्यें जो भेद आहे, तो कशावरून आहे?

उ० त्या उभय प्रकारच्या प्रीतीचे जे भिन्न आशय, ह्म-

णजे विषय आहेत, त्यांवरून तो भेद आहे. परोपकारी प्रीतीचा आशय दुसऱ्याचें हित हाच आहे, परंतु प्रसन्नतेच्या प्रीतीचा आशय दुसऱ्याचें चांगुलपण हा आहे. यास्तव जे सचेतन प्राणी गरजवंत आहेत, ते सर्व परोपकारी प्रीतीचीं पात्रें आहेत. परंतु जे पवित्र व शुद्ध आहेत, ते मात्र प्रसन्नतेच्या प्रीतीचीं पात्रें आहेत. याप्रमाणें पाहिल्यास आह्मी ईश्वरावर जी प्रीति करावी, ती प्रसन्नतेची प्रीति होय; ह्मणजे आह्मी ईश्वराचें पूर्ण पवित्रपण व चांगुलपण यांमुळें त्याची अत्यंत आवड धरावी. आणि ईश्वराचे भक्त परस्परांवर जी प्रीति करितात, ती दोन्ही प्रकारची असावी; ह्मणजे ते गरजवंत असतात ह्मणून परोपकारी प्रीति त्यांजवर करणें योग्य आहे, आणि ते पवित्र व चांगले असतात, यामुळें त्यांची आवड धरणें योग्य आहे.

प्र० ७. सदरीं सांगितलेल्या प्रीतीच्या दोन प्रकारांतून ज्या प्रकारच्या प्रीतीस जो योग्य असेल त्यावर त्या प्रकारची प्रीति करावी हें सर्व मनुष्यांचें कर्त्तव्य कर्म आहे कीं काय?

उ० होय; जर नीतीसंबंधी आज्ञांचें पालन करणें आणि ईश्वराचें अनुसरण करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्त्तव्य आहे, तर सदरीं सांगितल्याप्रमाणें प्रीति करणें हेंहि प्रत्येक मनुष्याचें कर्त्तव्य कर्म आहे. हें जसें शास्त्रावरून तसें विवेकावरूनहि सिद्ध होतें. रोम. १३: १०. योहा ४:८. मात्थी ५:४३–४५. २२:३७–३९. गीत ११:७. यशा. ४३:४. योहा. १३:३४–३५. १ पेत्र. २:१७. रोम. १२: १०. फिलि. २:३,४.

प्र० ८. सर्व बुद्धियुक्त प्राण्यांस ही प्रीति कसी वाटावी?

उ० ही सर्वोत्तम आणि अति प्रियकर असी वाटावी. आणि समजावें कीं सर्व विवेकवान प्राण्यांचें आणि स्वतां परमेश्वराचेंहि प्रीति हें मोठें भूषण आणि वैभव असें आहे.

---

## प्रकरण १५.

## पश्चात्ताप.

प्र० १. खरा पश्चात्ताप कसा असतो?

उ० पाप सोडून पवित्रपण धरणें; ह्मणजे वर्त्तणुकीविषयीं जे नियम ईश्वराने आह्मास लावून दिल्हे आहेत ते ईश्वरासारिखेच पवित्र व उत्तम असतां ते मोडण्याने आपण पापी व दोषी झालों आहों अशा खात्रीने, आणि प्रभु येशू ख्रीस्ताच्या मध्यस्तीकरितां ईश्वर कृपा करून आमच्या पापाची क्षमा करील अशा आशेने पाप सोडणें व पवित्रपण धरणें आणि ईश्वराची व त्याच्या शास्त्राची आवड धरून त्याच्या आज्ञा पाळूं लागणें, हाच खरा पश्चात्ताप आहे. योए० २:१२,१३. यहेज० १४:६. ३६:३१. यशा० ५५:७.

प्र० २. अयोग्य ह्मणजे निरूपयोगी पश्चात्ताप कसा असतो?

उ० ईश्वराची व त्याच्या शास्त्राची आवड मनांत नसतां, आणि पापाचा तिरस्कार व पवित्रतेची आवड वाटत नसतां, आणि सर्व पाप सोडून ईश्वराच्या आज्ञा पाळण्याची इच्छा मनांत नसतां, केवळ आपल्या पापामुळें

आपणांस दंड लागेल ह्या भितीवरूनच मुख्यत्वें उत्पन्न झालेला जो पापाचा खेद व त्याग होत असतो, तो अ-योग्य पश्चात्ताप आहे. जो ह्या प्रकारचा पश्चात्ताप करितो त्याला आपल्या पापाच्या दंडाचें कितीहि भय वाटत असो, आणि कृतज्ञता, दया, कळवळा, पापामुळें मन खाणें, इ० त्याच्या स्वाभाविक भावना कितीहि तीव्र झालेल्या असोत, तरी जोंवर त्याच्या ठायीं ईश्वराची व त्याच्या शास्त्राची आवड व पवित्रतेची गोडी व पापाचा तिरस्कार हीं उत्पन्न होत नाहींत, तोंवर त्याचा पश्चात्ताप पोकळ व निरुपयोगी आहे. यहूदा ईस्कारयोते याचा पश्चात्ताप ह्याच प्रकारचा होता. जरी त्याला झालेला खेद खरोखर होता, आणि जरी तो खेद इतका मोठा व क्लेशदायक होता कीं त्याच्या दुःसह व्याकूळतेमुळें त्याने आपला जीव घेतला, आणि जरी आपण महापातकी आहें असी त्याची पक्की खातरी झाली होती, आणि जरी त्याने आपलें पाप मोकळेपणाने कबूल केलें, आणि जरी तो बाह्यात्कारीं कांहींसा सुधरला होता, तरी त्याचा पश्चा-त्ताप ईश्वराच्या दिसण्यांत निरुपयोगी होता, कारण तो पश्चात्ताप ईश्वराच्या व पवित्रतेच्या आवडीने उत्पन्न झाला नव्हता, परंतु अपस्वार्थ आणि दंडभय यांकडून उत्पन्न झाला होता. चोर खुनी इ० अपराध्यांस सरकारासमोर आगिल्यावर जो पश्चात्ताप होत असतो तो बहुधा याच प्रकारचा असतो. तसेंच सर्व आयुष्य पापांत घालवून मरावयास टेंकल्यावर कोणकोणास जो पश्चात्ताप होत असतो, तोहि बहुधा याच प्रकारचा असतो. असला पश्चात्ताप करणारे पापाचा पश्चात्ताप करीत नाहींत, पण

पापाच्या फळाचा मात्र करितात. आणि दंडभय गेल्यास ते पुन्हा तेंच आणि त्याहून अधिक मोठीं आणि बहुत पापें करण्यास चुकणार नाहींत. यास्तव असला पश्चात्ताप व्यर्थ व निरूपयोगी आहे. मात्थी २७:३–५.

प्र० ३. मनुष्यांनीं आपल्या पापाचा पश्चात्ताप कां करावा?

उ० त्याचें एक कारण असें आहे कीं, असें करणें त्यांस उचित आहे. कारण(१) ते पापाकडून हलके नीच आणि अधम होतात. (२) पापाकडून ईश्वराच्या पवित्र आणि उत्तम आज्ञा मोडल्या जाऊन आपला आणि दुसऱ्यांचाहि नाश होतो. (३) पापाकडून ईश्वराचा अपमान होतो, आणि हें इतकें दुष्ट आहे कीं जर ईश्वराने ह्यास आवरलें नाहीं तर हें ईश्वरास सृष्टीच्या राजपदावरून काढून त्याने आमच्या सुखाविषयीं केलेल्या सर्व योजना व्यर्थ करील. ह्मणजे पाप हें केवळ सर्वांची बिघाडणूक आणि नाश करणारें आहे. ह्मणून हें सोडून द्यावें हें मनुष्यांस शोभतें. २. आपणास तारण प्राप्त होण्यासाठीं पश्चात्ताप करणें अवश्य आहे, कारण जे पापाचा पश्चात्ताप करितील त्यांसच तारण देईन आणि जे अपश्चात्तापी राहतील त्यांस दंडांतच घालीन, असें ईश्वराने आपल्या शास्त्रांत सांगितलें आहे, ह्मणून जर आह्मास तारण प्राप्त करणें आहे तर आह्मी पश्चात्ताप केला पाहिजे. प्रेषि० ३:१९. यशा० ५५:७. लूका १३:३. ३. मनुष्यांनीं आपल्या पापांचा पश्चात्ताप करावा अशा बहुत आणि आग्रही आज्ञा ईश्वराने आपल्या शास्त्रांत दिल्ह्या आहेत. मात्थी ४:१७. प्रे० २६:२०. लुका २४:४७.

मार्क ६:१२. प्रे० २०:२१. यास्तव सर्व ठिकाणच्या व सर्व अवस्थांतल्या सर्व मनुष्यांनीं आपल्या सर्व पापिष्ठपणाचा व आपल्या प्रत्येक पापाचा पश्चात्ताप करावा. आणि जे ख्रिस्ती आहेत त्यांनीं रोज रोज पश्चात्ताप करावा, कारण कीं त्यांकडूनहि रोज रोज पाप घडतें.

प्र० ४. पश्चात्ताप करणें हें मनुष्याचें तात्कालिक कर्त्तव्य आहे कीं काय?

उ० होय. आपल्या पापाचा पश्चात्ताप करणें हें प्रत्येक मनुष्याचें तात्कालिक कर्त्तव्य कर्म आहे. जर कोणी कल्पील कीं एक दोन दिवसांचा अवकाश केला तर काय चिंता? तर त्याला हें विचारणें आहे कीं, ज्या आधारावरून एक दिवस अपश्चात्तापी राहण्यास चिंता नाहीं असें ह्मणाल, त्याच आधारावरून एक महिना, एक वर्ष आणि सर्व आयुष्यभरहि, अपश्चात्तापी राहण्यास चिंता नाहीं असें ठरेल. परंतु ज्याकडून आपला व इतरांचा नाश होतो आणि ईश्वराचा अपमान होतो, तें सोडल्यावांचून एक क्षणभर देखील राहणें योग्य नाहीं, हें उघड आहे. यास्तव आपल्या पापाविषयीं समज होतांच त्याविषयीं पश्चात्ताप करावा हें अवश्य आहे. प्रे० १७:३०. गीत ११९:५९,६०. इब्री ३:७,८.

प्र० ५. मरणानंतर आपल्या पापाचा पश्चात्ताप कोणास करितां येईल कीं काय?

उ० नाहीं. कारण कीं हें आयुष्य मात्र आमची परीक्षा पटण्याचा आणि कर्मे करण्याचा समय आहे. मरणाच्या वेळेस जसा कोणी असेल तसाच तो मरणानंतर सर्वकाळपर्यंत राहील, असें ईश्वरी शास्त्रांत सांगितलें आहे.

यास्तव मरणानंतर कधीं कोणास आपल्या पापाचा पश्चात्ताप करितां येणार नाहीं. उप० ९:१०. प्रग० २२:११.

प्र० ६. सर्वांचा पश्चात्ताप एकसारिखाच असतो कीं काय?

उ० नाहीं. मनुष्यांच्या प्रकृतीच्या वेगळाल्या मानावरून आणि त्यांच्या पापिष्ठपणाविषयींच्या वेगळाल्या समजुतीवरून आणि पवित्र आत्म्याच्या वेगळाल्या कृपादानांवरून पश्चात्ताप, ह्मणजे पापाविषयींचा खेद वेगळाल्या मानाने, कोणाचा कमी कोणाचा अधिक असा असतो.

प्र० ७. मनुष्याना आपल्या पापांचा पश्चात्ताप करण्यासाठीं पवित्र आत्म्याचें साहाय मिळणें अवश्य आहे कीं काय?

उ० होय. कारण कीं मनुष्याची बुद्धि जन्मस्वभावाने भ्रष्ट आणि पापिष्ठ असतां जसें त्याच्याने पवित्र आत्म्याच्या प्रेरणेवांचून आपल्या आत्म्याचा पुनर्जन्म करवत नाहीं, तसेंच आपल्या पापाचा पश्चात्तापहि पवित्र आत्म्याच्या साहायावांचून करवत नाहीं. वास्तविक पाहिल्यास पश्चात्ताप करणें हें आत्म्याच्या पुनर्जन्माचेंच एक विशेष फळ आहे. तथापि जसें मनुष्याच्या आत्म्याचा पुनर्जन्म होण्यांत मनुष्य अकर्त्ता नसतो, तसेंच पापाचा पश्चात्ताप करण्यांतहि मनुष्य अकर्त्ता नसतो. २ तिम० २:२५. प्रे० ५:३१.

प्र० ८. कोणत्या उपायानीं मनुष्याच्या ठायीं पापाचा पश्चात्ताप उत्पन्न होतो?

उ० (१) ईश्वराचें पवित्रपण, श्रेष्ठपण, आणि वैभव यांविषयीं ध्यान करणें; (२) ईश्वराच्या शास्त्राच्या अभिप्रायासीं आपलीं कर्में लावून पाहणें; (३) ईश्वराची दया, कृपा, आणि न्यायीपणा हे गुण जसे प्रभु येशू ख्रीस्तानें केलेल्या तारणोपायाकडून दिसून येतात त्या प्रकारें त्यांचें मनन करणें; (४) जे अपश्चात्तापी मरतात त्यांस सर्वकाळचा दंड लागेल हा विचार मनांत आणणें; (५) आपलें पापिष्ठपण आपल्या मनांत ठसवून घेऊन त्याविषयीं शोक करणें; (६) अधर्मी लोकांवर ईश्वराचा जो क्षोभ प्रगट होणार आहे तो आपणावर येईल असी भीति मनांत बाळगणें; (७) आणि पवित्र आत्म्याचें साहाय मिळण्यासाठीं ईश्वरापासीं प्रार्थना करणें; हें पापाचा पश्चात्ताप होण्याचे मुख्य उपाय आहेत.

प्र० ९. आपल्या ठायीं पापाचा खरा पश्चात्ताप उत्पन्न झाला हें कशावरून समजावें?

उ० आपल्या भावना वासना इच्छा आणि कर्में, यांचा पवित्र पालट होणें; ह्मणजे ईश्वरानें ख्रिस्ती मनुष्यांस जीं कर्त्तव्य कर्में लावून दिल्हीं आहेत, तीं आवडीनें व मनोभावानें करूं लागणें, हें आपल्या ठायीं खरा पश्चात्ताप झाल्याचें मुख्य प्रमाण आहे. खऱ्या पश्चात्तापाचीं आणि आत्म्याच्या पुनर्जन्माचीं लक्षणें बहुधा सारिखींच आहेत, ह्मणून एथें त्यांचा विस्तार करणें अगत्य नाहीं. २करिं. ७: ११. मात्थी ३: ८.

प्र० १०. पृथ्वीवरील पाप्यांस पश्चात्ताप झाल्यानें आकाशवासी पवित्र जनांस काय वाटतें?

उ० त्यांना त्यावरून पवित्र आनंद होतो, ह्मणजे पापी

मनुष्यांस पश्चात्तापी होऊन देवाच्या राज्यांत येतां पाहून त्याना मोठा हर्ष होतो. लूका १५:७.

---

## प्रकरण १६.

## विश्वास.

प्र० १. खरा विश्वास कसा आहे?

उ० ईश्वराच्या सांगण्यावर पूर्ण भरवसा ठेवणें हाच खरा विश्वास आहे; ह्मणजे ईश्वराने आपल्या शास्त्रामध्यें जें सांगितलें आहे, तें सर्व पूर्णपणें खरें आहे, आणि त्यांतील बोधाप्रमाणें चालणें हें आपणांस फार अगत्य आहे, असी खात्री धरणें; आणि विशेषेंकरून येशू ख्रीस्ताविषयीं ईश्वराने आपल्या शास्त्रांत जें सांगितलें आहे, तें सर्व विश्वासणें; ह्मणजे ख्रीस्त येशू हा एकच खरा व योग्य तारणारा आहे, आणि जे कोणी त्याला शरण जातील त्या सर्वांस तारण देण्यास तो सिद्ध आहे; अशा भरवशाने त्याला आपला तारणारा व जामीन असा मनोभावाने स्वीकारून घेणें, हाच खरा ह्मणजे तारण मिळण्याजोगा विश्वास आहे. १ योहा० ५:१०. यशा० २६:४. इब्री ११:१. रोमें० १०:१०. गाला० ५:६.

प्र० २. ह्या विश्वासाच्या अर्थी शास्त्रामध्यें कोणकोणते शब्द व वाक्यें लिहिलीं आहेत?

उ० खरेपण जाणणें, खरेपणाचें ज्ञान पावणें, ख्रीस्ताला अंगीकारणें, ख्रीस्तावर भरवसा ठेवणें, ख्रीस्ताकडे पाहणें, आणि ख्रीस्तावर विश्वास ठेवणें; असीं अनेक वेगळालीं

वाक्यें ह्याच विश्वासाच्या अर्थी योजिलीं आहेत, त्यांचा अभिप्राय सदरील व्याख्यानाप्रमाणेंच आहे.

प्र० ३. खोटा विश्वास कसा आहे?

उ० अन्यायानें सत्याचें धारण करणें; ह्मणजे शास्त्रांतील गोष्टींची सत्यता जाणणें व कबूल करणें, तरी त्यांतील बोधाप्रमाणें भावना न धरणें व वर्त्तणूक न करणें, हाच खोटा विश्वास आहे. रोमे० १:१८. याको० २:१९. प्रे० ८:१३,२०,२१.

प्र० ४. इतिहाससंबंधी विश्वास ह्मणजे काय?

उ० शास्त्रांतील इतिहास ह्मणजे घडलेल्या गोष्टींचें वर्णन यथार्थ व खरें आहे असें समजणें मात्र, यास इतिहाससंबंधी विश्वास ह्मटलें आहे. याको. २: १७.

प्र० ५. चमत्कारसंबंधी विश्वास ह्मणजे काय?

उ० ईश्वराकडून मिळालेल्या शक्तीनें आपण दुसऱ्यासाठीं, किंवा दुसरा आपणासाठीं, चमत्कार करण्यास शक्तिमान आहे, असा जो दृढ भरवसा कोणीएकाच्या ठायीं पवित्र आत्म्याकडून उत्पन्न होतो, त्याला चमत्कारसंबंधी विश्वास ह्मटलें आहे. मात्थी १८: २०. प्रे० १४: ९,१०. १करिं० १३: २.

प्र० ६. चमत्कारसंबंधी विश्वास धरणारे कोण होते?

उ० भविष्यवादी, प्रेषित, आणि कित्येक प्राचीन ख्रिस्ती लोक हे होते.

प्र० ७. चमत्कारसंबंधी विश्वास किती काळपर्यंत चालला?

उ० ईश्वरानें आपल्या सेवकांकडून जे चमत्कार करविले, त्यांचा मुख्य हेतु आपल्या शास्त्राचें प्रमाण पटविणें

हाच होता. यास्तव शास्त्र लिहिणें समाप्त झाल्यावर थोडका काळपर्यंत, ह्मणजे ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकापर्यंत चमत्कारसंबंधीं विश्वास चालला.

प्र० ८. येशू ख्रीस्तावर खरा विश्वास ठेवणें हें सर्वांस अगत्य आहे कीं काय?

उ० असा विश्वास प्रत्येक मनुष्यानें धरावा हें अगत्य आहे, कारण असा विश्वास धरल्यावांचून कोणाचेंहि तारण होणार नाहीं. प्रे० १६:३०,३१. १०:४३. मार्क. १६:१६. योहा० २०:३१.

प्र० ९. असा विश्वास धरल्यावांचून कोणाचेंहि तारण होऊं नये हा जो नेम ईश्वरानें केला आहे, तो उत्तम व योग्य आहे कीं काय?

उ० होय, कारण कीं असा विश्वास धरल्यानेच पतित मनुष्य ईश्वराकडे फिरून त्याचा सन्मान करितात. प्रारंभीं जेव्हां आमचे मूळपूर्वज पापांत पडले, तेव्हां ईश्वराविषयीं अविश्वासी होण्यानें, ह्मणजे ईश्वराच्या सांगण्यावर भरवसा न ठेवण्यामुळेंच ईश्वराची अवज्ञा करून ते पापांत पडले. यास्तव आतां मनुष्यानें ईश्वरावर भरवसा ठेवण्यानेच आपल्या पतित अवस्थेंतून निघावें आणि ईश्वराचा सन्मान करावा हें योग्य आहे. येणेंकडूनच मनुष्य आपल्या मूळ स्थितींत येतो, ह्मणून मनुष्यानें विश्वास धरण्यानें तरावें हा ईश्वरी नेम फार योग्य आहे.

प्र० १०. विश्वास धरण्यानें तारण मिळेंत असें ह्मटल्यावरून, पापी मनुष्य आपलें तारण कमावितात, असें समजावें कीं काय?

उ० नाहीं, असें अगदीं नाहीं. कारण विश्वास धरणें

ह्या कृत्याकडून त्यांस कांहीं पुण्य लागतें किंवा तेणेंकडून त्यांच्या पापाचें कांहीं प्रायश्चित्त होतें असें नाहीं. परंतु विश्वास धरल्याने ते ख्रीस्तासीं संयुक्त होऊन ख्रीस्ताच्या प्रायश्चित्ताच्या फळाचें ग्रहण मात्र करितात, असें समजावें. एफे० २:८. मार्क. १६:१६.

प्र० ११. मनुष्यें हा विश्वास स्वतंत्रतेने धरितात कीं काय?

उ० होय, जरी असा विश्वास धरणें हें मनुष्याच्याने ईश्वराच्या साह्यावांचून करवत नाहीं, तरी तें साह्य मिळाल्यावर, मनुष्यें आपल्या स्वेच्छेने आणि पूर्ण स्वतंत्रतेने असा विश्वास धरितात. एफे० २:८. इब्री १२:२.

प्र० १२. हा विश्वास मनुष्याच्या मनांत उत्पन्न होऊन वाढण्याचीं आणि टिकण्याचीं साधनें कोणतीं?

उ० शास्त्राचा उपदेश ऐकणें, मंडळींतले संस्कार घेणें, आणि प्रार्थना करणें, हीं याविषयींचीं मुख्य साधनें आहेत. आणि धार्मिक मनुष्यांचा सहवास करणें, ईश्वराची भक्ति एकांतीं, कुटुंबांत, आणि लौकिकांत करणें, आणि शास्त्र व दुसरीं धर्मसंबंधी पुस्तकें वाचणें व मनन करणें, हीं सामान्य साधनें आहेत. रोम. १०:१४,१७.

प्र० १३. हा खरा विश्वास कोणामध्यें आहे किंवा नाहीं हें कशावरून समजावें?

उ० ज्याच्या ठायीं हा विश्वास आहे, तो ईश्वराच्या आज्ञा पाळण्यास, आणि मनुष्याचें हित करण्यास झटेल; हेंच खऱ्या विश्वासाचें मुख्य प्रमाण आहे. जसें झरा असल्यास त्यांतून पाणी निघतेंच, तसें ज्याच्या ठायीं हा ख-

रा विश्वास आहे तोहि सत्कर्में करीलच असें आहे. याको० २:२१–२४.

प्र० १४. ज्या विश्वासाकडून असीं सत्कर्में घडत नाहींत तो विश्वास कांहीं कामाचा आहे कीं काय?

उ० नाहीं, असला विश्वास कांहीं कामाचा नाहीं; तेणेंकरून मनुष्याचें कांहीं हित न होतां, त्याच्या मनांत भ्रम मात्र होतो. ह्मणून यास व्यर्थ व निर्जीव विश्वास असें ह्मटलें आहे. याको० २:१७.

प्र० १५. माझ्या पापाची क्षमा झाली आहे आणि ख्रीस्त प्रभु मजसाठीं मरण पावला आहे, आणि मी तरला जाईन असें माझ्या कल्पनेंत येतें; असा समज कोणीएकाच्या ठायीं असल्यावरून त्याच्या ठायीं तारण मिळण्याजोगा विश्वास आहे असें प्रमाण पटतें कीं काय?

उ० अगदीं नाहीं. कारण अशा कल्पना मनुष्यें उगेच व आधारावांचूनाहि करीत असतात; आणि योग्य व पुरता आधार नसतां आपल्या पापांची क्षमा झाली आहे असें कल्पणें, हें केवळ भ्रममूलक आहे. ह्मणून ईश्वरावर प्रीति करून त्याच्या आज्ञा पाळणें, आणि मनुष्यांचें हित करावयास झटणें, हें जें खऱ्या विश्वासाचें अवश्य फळ आहे, तें आपल्या ठायीं दिसून आल्यावांचून आपला विश्वास तारण मिळण्याजोगा आहे, असें कोणी समजूं नये.

प्र० १६. ज्या विश्वासाने आतां ख्रिस्ती लोक तरतात तो, जुन्या व्यवस्थेंतील ईश्वरभक्त ज्या विश्वासाने तरले, त्यासारिखाच आहे कीं काय?

उ० होय, नव्या व्यवस्थेंतील आणि जुन्या व्यवस्थेंतील ईश्वरभक्तांच्या विश्वासाचा मुख्य अभिप्राय एकसारि-

त्याच आहे. तरी त्यांच्या विश्वासामध्यें कांहीं गोष्टींचा भेद आहे. तो हाच कीं, जुन्या व्यवस्थेंतील भक्त पुढें होणाऱ्या ख्रीस्तावर विश्वासले, परंतु नव्या व्यवस्थेंतले भक्त आलेल्या ख्रीस्तावर विश्वासतात. हल्लींच्या लोकांस अधिक शास्त्रग्रंथ व शास्त्रसंबंधीं अधिक स्पष्ट ज्ञान प्राप्त झालें असल्यावरून, जुन्या व्यवस्थेंतल्या लोकांस ज्या बहुत गोष्टी भविष्यें अशा होत्या, त्या हल्लींच्यांस भूत गोष्टी अशा झाल्या आहेत; आणि पूर्वीच्यांस ज्या बहुत गोष्टी केवळ दृष्टांतांनीं मात्र कळल्या होत्या, त्या हल्लींच्या भक्तांस दार्ष्टांतांनीं कळल्या आहेत. यास्तव हल्लींच्या ईश्वरभक्तांचा विश्वास अधिक गोष्टींविषयीं व अधिक स्पष्ट प्रकारचा आहे, हाच काय तो भेद. तरी मुख्य अभिप्रायाविषयीं पाहिल्यास, जसे नव्या व्यवस्थेंतले भक्त तसे जुन्या व्यवस्थेंतलेहि भक्त तारणारा जो ख्रीस्त मशीहा त्याच्याच मध्यस्थीकरून ईश्वराच्या कृपेनें तारण पावण्याची आशा धरीत होते.

---

## प्रकरण १७.

## न्यायीकरण.

प्र० १. विश्वासानें न्यायीकृत होणें ह्मणजे काय?

उ० पापी मनुष्यानें तारणाऱ्यावर विश्वास ठेवल्यामुळें ईश्वरानें त्यास अंगीकारून घ्यावें; ह्मणजे ईश्वरानें त्यास निर्दोष्यासारिखें मानावें, हेंच विश्वासानें न्यायीकृत होणें आहे. जो पापी या रीतीनें न्यायीकृत होतो, तो ईश्वराच्या दिसण्यांत खरोखर ह्मणजे जसा पवित्र व निर्दोषी

होतो असें नाहीं. परंतु मध्यस्थाने केलेल्या प्रायश्चित्तावरून, ईश्वर त्यास केवळ न्यायदृष्टीने मात्र पवित्र व निर्दोषी असा लेखितो, आणि ज्याने कधीं पाप केलें नाहीं त्यास जसें प्रतिफळ द्यावें, तसेंच न्यायीकृत झालेल्या पाप्यास परलोकीं प्रतिफळ देतो; असा न्यायीकृत होण्याचा अर्थ आहे. एफे० १:६,७. रोमे० ५:९. प्रे० १३:३८,३९.

प्र० २. स्वकर्मानी न्यायीकृत होणें ह्मणजे काय? आणि स्वकर्मानी न्यायीकृत होणें, व विश्वासाने न्यायीकृत होणें, यांमध्यें कोणता भेद आहे?

उ० वर्त्तणुकीविषयीं ईश्वराने लावून दिल्हेले सर्व नियम सर्वदां परिपूर्णपणें पाळण्याने निर्दोषी व नीतिमान ठरणें हेंच स्वकर्मानी न्यायीकृत होणें आहे. पवित्र दूत याच नेमाने न्यायीकृत झाले आहेत. आणि जर मनुष्यानी कधीं पाप केलें नसतें तर तेहि ह्याच नेमाने न्यायीकृत झाले असते. परंतु सर्व मनुष्यजात जन्मस्वभावाने पापिष्ट व भ्रष्ट आहे, ह्मणून ईश्वराच्या सर्व आज्ञा सर्वदां पूर्णपणें पाळणें हें त्यांकडून कधींच घडत नाहीं. यास्तव मनुष्यानी स्वकर्मानी न्यायीकृत व्हावें हें अशक्य आहे. असें असतां स्वकर्मानी न्यायीकृत होण्यास पाहणें व्यर्थ आहे, असें केवळ नाहीं, पण तेणेंकडून ईश्वराच्या कृपेचा आणि तारणारा जो ख्रीस्त प्रभु त्याचा अपमान होऊन, मनुष्याची व्यर्थ बढाई होती; आणि शुभवर्त्तमानांतील तारणोपायाचा धिक्कार होतो. परंतु जे विश्वासाने न्यायीकृत होतात, ते आपल्या नीतिमत्वाने नव्हे पण ख्रीस्ताने भरून दिल्हेल्या खंडणीकडून, त्यांचा दंड

सुटण्याने, आणि ख्रीस्ताचें नीतिमत्व त्यांचें असें मोजलें जाण्याने ते न्यायीकृत होतात. याप्रकारें जे न्यायीकृत होतात ते स्वतां आपण दोषी व दंडपात्र असे असतांहि केवळ ईश्वराच्या कृपेने तारणाऱ्याच्या पुण्याकडून न्यायीकृत होतात. रोमे० ४:३–७. ३:२०,२८.

प्र० ३. तर न्यायीकृत होण्यासाठीं पाप्याना कांहींच करावें लागत नाहीं कीं काय?

उ० न्यायीकृत होण्यासाठीं पाप्याना जें करायाचें तें हेंच आहे कीं, त्यानीं आपल्या पापांचा पश्चात्ताप करून तारणारा जो प्रभु येशू ख्रीस्त त्याजवर विश्वास ठेवावा. परंतु हें करण्याने त्यांस कांहीं पुण्य लागतें आणि त्या पुण्याकडूनच ते सर्वस्वें किंवा अंशमात्रेंकरून तरी न्यायीकृत होतात असें अगदीं नाहीं. जसा याचक दात्याकडे जाऊन, दाता दान देतो तें हात पसरून घेतो, त्याच प्रमाणें पापी मनुष्य, पश्चात्ताप करण्याने ईश्वराकडे जातो, आणि येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवण्याने, न्यायीकृत होण्याचें जें कृपादान ईश्वर देतो, तें स्वीकारितो. पण जसें दात्याकडे जाण्याने व हात पसरून तें दान घेण्याने, याचेकाने तें दान कमाविलें असें होत नाहीं, तसेंच पापी मनुष्य हा पश्चात्ताप करून विश्वास ठेवण्याने, न्यायीकृत होण्याचें ईश्वरी कृपादान कमावितो, असें होत नाहीं. अणखी जसा दाता दान देण्यास बांधलेला नसतो, तसेंच पाप्यांस न्यायीकृत करण्यास ईश्वरहि बांधला नाहीं. असें असतां ईश्वराने पाप्यांस न्यायीकृत करण्याचा जो उपाय सिद्ध केला आहे, तो त्याने केवळ आपल्या कृपेनेच केला आहे. आणि जे पश्चात्ताप करून विश्वास ठेवण्याने हा

तारणोपाय स्वीकारितात, त्यांस तो केवळ कृपेनेच न्यायीकृत करितो. कारण जो पश्चात्ताप ते करितात व जो विश्वास ते ठेवितात तोहि ईश्वराचेंच कृपादान आहे. ह्मणून पापी मनुष्य न्यायीकृत होणें, हें सर्वस्वें ईश्वराच्या कृपेचें काम आहे. गाला. २:१६, २१. ३:११. रोमे. ३:२२, २४. ५:१. फिली. ३:९.

प्र० ४. कोणीएक पापी मनुष्य केव्हां न्यायीकृत होतो?

उ० जेव्हां तो तारणाऱ्यावर खरा विश्वास ठेवितो तेव्हांच तो न्यायीकृत होतो. ह्मणजे जेव्हां तो खरा विश्वास ठेवितो तेव्हांच त्याचीं मागील सर्व पापें क्षमा होतात. आणि ख्रीस्तावर खरा विश्वास ठेवण्याने तो ईश्वराच्या कृपेच्या कराराचा असा भागीदार होतो कीं, पुढें जीं पापें त्याजकडून घडतात त्यांविषयीं तो पश्चात्ताप करून ख्रीस्ताच्या प्रायश्चित्ताच्या योगाने ईश्वरास शरण गेल्यावांचून राहणार नाहीं, असा निश्चय आहे. ह्मणून जेव्हां तो आपल्या पुढें घडलेल्या पापांची क्षमा येशू ख्रीस्ताच्या नावाने मागतो तेव्हांच तो त्या पापांचीहि क्षमा पावतो, असें आहे.

प्र० ५. न्यायीकृत झालेला मनुष्य जीं सत्कर्में करितो, तीं कशीं लेखावीं?

उ० तो जीं सत्कर्में करितो तीं त्याच्या विश्वासाचें खरेपण दाखवितात आणि तो न्यायीकृत झाल्याचें प्रमाण पटवितात, असें समजावें. परंतु त्या सत्कर्मांवरून तो ईश्वराची कृपा मिळवितो किंवा न्यायीकृत ठरतो असें अगदीं समजूं नये. कारण ईश्वराने त्यास आपल्या कृपेने अंगीकारून घेतल्यापूर्वीं वास्तविक सत्कर्म असें एकहि

करावयास तो शक्तिमान नसतो. आणि ईश्वराने त्यास आपल्या कृपेंत घेऊन पवित्र आत्म्याचें साह्य दिल्ह्यावरहि जीं सत्कर्में तो करितो, त्यांमध्यें अगदीं निर्दोष सत्कर्म असें एकहि नसतें. ह्मणून त्याच्या सत्कर्मावरून तो सर्वस्वें, किंवा अंशमात्रेंहि न्यायीकृत होत नाहीं. तीं सर्व सत्कर्में करीत असतांहि तो केवळ ईश्वराच्या कृपेनेच न्यायीकृत होतो, असें समजावें. रोम३:२०,२८.

प्र० ६. न्यायीकरणाच्या सिद्धांताविषयीं पौलस व याकोब या दोन प्रेषितांच्या लिहिण्यामध्यें कांहीं वैपरीत्य आहे कीं काय?

उ० नाहीं. त्यांच्या लिहिण्याचा अभिप्राय पाहिला असतां त्यांमध्यें कांहींच वैपरीत्य दिसत नाहीं. कारण आपल्या कर्मांनी नव्हे पण केवळ येशू ख्रीस्तावरील विश्वासाने मनुष्यें तरतात असें सिद्ध करणें, हाच पौलसाच्या लिहिण्याचा अभिप्राय होता. आणि तारणाऱ्यावरील ज्या विश्वासाने तारण होतें तो निर्जीव, ह्मणजे पोकळ नसतो; ह्मणजे जीं सत्कर्में खऱ्या विश्वासाचीं अवश्य फळें आहेत तीं ज्या विश्वासावरून घडत नाहींत, तसा विश्वास नसतो; हें सिद्ध करावें, हाच याकोबाच्या लिहिण्याचा अभिप्राय होता. विश्वासाने न्यायीकृत होत नाहींत पण केवळ नेमशास्त्रांतील कर्मांनी, ह्मणजे स्वकर्मांनी मनुष्यें न्यायीकृत होतात; असें जें अयोग्य मत त्याचें खंडण करण्याच्या उद्देशाने पौलसाने लिहिलें कीं, “मनुष्य नेमशास्त्रांतील कर्मांवांचून विश्वासाने न्यायी ठरतो.” तरी त्याच विश्वासाविषयीं तो लागलेंच ह्मणतो कीं, त्या विश्वासाकडून नेमशास्त्र व्यर्थ होतें असें नाहीं, पण स्थापिलें जातें; ह्मणजे

मानिलें जातें. आणि तसेंच तो त्याच विश्वासाविषयीं दुसऱ्या ठिकाणीं लिहितो कीं, ज्या विश्वासाकडून आह्मी तरतों तो प्रीतीकडून प्रेरणारा विश्वास आहे. ह्मणजे जो विश्वास धरल्याने आह्मी ईश्वरावर आणि माणसांवर प्रीति करण्यास प्रेरले जातों, त्याच विश्वासाने आह्मी न्यायीकृत होतों, असा त्याचा अभिप्राय स्पष्ट आहे.

आतां याकोब प्रेषिताने जें लिहिलें, तें दुसऱ्या अयोग्य मताचें खंडण करण्यासाठीं लिहिलें; ह्मणजे खऱ्या विश्वासावरून ज्या भावना व जीं सत्कर्में अवश्य होतात, त्या भावना न धरितां व तीं सत्कर्में न करितां केवळ ख्रीस्त आमचा तारणारा आहे, असा पोकळ विश्वास धरल्यानेच आह्मी तरूं; असें अयोग्य मत जे धरीत होते त्यांची चूक दाखविण्यासाठीं याकोबाने लिहिलें कीं, "केवळ विश्वासाकडून नव्हे परंतु करण्यांकडून माणूस तारला जातो." ह्मणजे खऱ्या विश्वासाचीं योग्य फळें जीं सत्कर्में आहेत तीं करण्याची प्रेरणा ज्या विश्वासाकडून होत नाहीं, अशा पोकळ ह्मणजे खोट्या विश्वासाने तारण मिळणार नाहीं. पण ज्या विश्वासाकडून सत्कर्में करण्याची प्रेरणा होती त्या जिवंत ह्मणजे खऱ्या विश्वासाने तारण मिळतें. याप्रमाणें त्या दोन्ही प्रेषितांच्या लिहिण्यामध्यें पूर्ण मेळ आहे. रोम० ३:२६, २७,३०,३१.गाला०५:६.याको०२:२०-२४.

प्र० ७. तारणाऱ्यावरील विश्वासाने आह्मी न्यायीकृत होतों, असें मत धरिल्याने नेमशास्त्र तुच्छ होतें आणि पाप करण्याची मोकळीक व उत्तेजन होतें, असें आहे कीं काय?

उ० असें अगदीं नाहीं. परंतु उलट्या प्रकारें अशा

मतावरून मनुष्यें नेमशास्त्राचा मोठा मान करण्याचें अगत्य बाळगितात, आणि ईश्वराच्या आज्ञा पाळण्याचें मोठें उत्तेजन पावतात, आणि सर्व अशुद्ध व पापिष्ट भावना व कर्मे यांचा तिरस्कार करितात. कारण हा विश्वास पवित्र गुणाचा आहे, आणि जे हा विश्वास धरितात ते धार्मिक होतात आणि याच विश्वासाकडून नावाजणूक व अभिमान नाहींसा होऊन ईश्वरी कृपा उंचावली जाते. परंतु स्वकर्मांनी न्यायीकृत होण्याच्या मताने पोकळ वढाई आणि गर्व होऊन ईश्वरीकृपा तुच्छ केली जाते. रोम. ३: ३१.

प्र० ८. न्यायीकृत करणारा कोण आहे?

उ० ईश्वर न्यायीकृत करणारा आहे. ह्मणजे ईश्वर जो बाप तो पाप्याना न्यायी करण्याच्या उपायाची योजना करितो, आणि तो सिद्धीस नेणें आपल्या पुत्राकडे सोंपितो. त्याप्रमाणें पुत्र आह्मावरील नेमशास्त्राचा शाप आपल्या अंगीं सोसण्याने नेमशास्त्र पूर्ण करितो, आणि आह्मासाठीं तारणोपाय सिद्ध करितो. पवित्र आत्मा हा तारणोपाय पाप्यांस कळवितो आणि हा अंगीकारून घेण्याची प्रेरणा करितो, तेव्हां ईश्वर जो बाप तो विश्वासणाऱ्या पाप्यांच्या दंडाची क्षमा करून त्यांस न्यायीकृत करितो. ह्मणजे ज्याने कधीं कांहीं पाप केलें नाहीं त्यासीं जसें वागावें, तसें ह्या न्यायीकृत झालेल्या पाप्यांसीं वागतो.

प्र० ९. जे ह्या रीतीने न्यायीकृत होतात त्यांस त्यावरून काय फळ प्राप्त होतें.

उ० ते ईश्वराला आवडत्या प्रकारें त्याचें भजन व सेवा करूं लागतात. त्यावरून त्यांच्या अंतःकरणांत मोठी शांति व आनंद होऊन सर्वकाळिक जीवनाची दृढ आशा त्यांच्या

ठायीं उत्पन्न होती. कारण ह्या सुफळांचा अनुभव त्याच्या ठायीं असण्याने त्यांस आपण न्यायीकृत झालों आहों, असा भरवसा धरण्यास चांगला आधार होतो.

प्र० १०. न्यायीकृत होण्याविषयींचा सिद्धांत फार अगत्याचा आहे कीं काय?

उ० होय, हा सिद्धांत फार अगत्याचा आहे. प्राचीन काळचे ख्रिस्ती लोक हा सिद्धांत स्पष्टपणें शिकवीत व दृढतरें विश्वासत. आणि "जो धर्म पूर्वीं पवित्रांस सोपून दिल्हेला होता" त्याचा जिव्हाळा हा सिद्धांत आहे, असें ख्रिस्ती मंडळीचे सुधारणारे मानीत असत. आणि ख्रिस्ती लोक हा सिद्धांत जसा अधिक योग्य प्रकारें समजतील आणि मानितील तसा दुसऱ्या सिद्धांतांविषयींचा त्यांचा समज, अनुभव, आणि वर्त्तणूक हीं अधिक बरीं होतील, यांत कांहीं संशय नाहीं. पौलस प्रेषीत गालातीकर ख्रिस्ती लोकांस लिहितो कीं, जे कोणी हा सिद्धांत अव्हे-रितात ते दुसरें शुभवर्त्तमान शिकवितात; ह्मणून ते शापित आहेत, असें समजावें. गाला० २:१६,८.

---

## प्रकरण १८.

## सद्भक्तांचा टिकाव.

प्र० १. सद्भक्तांचा टिकाव ह्मणजे काय?

उ० सद्भक्त शेवटपर्यंत, ह्मणजे मरणापर्यंत सन्मार्गीं टिकून राहणें, यास सद्भक्तांचा टिकाव ह्मटलें आहे. १, परंतु सद्भक्त शेवटपर्यंत सन्मार्गीं टिकतील, असें ह्मणण्याचा

कोणता अर्थ धरूं नये तें प्रथम सांगतों. (१) सद्भक्त शेवटपर्यंत टिकतील यावरून, जे ईश्वरी धर्माचा अंगीकार करितात, त्यांतील कोणीच सन्मार्ग सोडून नाश पावत नाहीं, असा अर्थ धरावयाचा नाहीं. कारण कित्येक मनुष्यें सद्भावेंकरून नव्हे पण ढोंगानें सन्मार्गाचा अंगीकार करितात. ते जर पुढें पवित्र आत्म्याच्या प्रेरणेनें पालटून सद्भाव धरीत नाहींत, तर अलेक्षांद्रस, हुमेनायस, फिलेतस आणि यहूदा यांप्रमाणें सन्मार्ग सोडून नाश पावतील, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. (२) अणखी सद्भक्त शेवटपर्यंत टिकतील यावरून, ते कधीं कांहींच पाप करणार नाहींत असाहि अर्थ धरावयाचा नाहीं. कारण त्यांकडून रोज रोज पाप घडतें, आणि कधीं कधीं ते दावीद, शलमोन, आणि पेत्रस यांसारिखे मोठें अघोर पापहि करितात, आणि त्यावरून ईश्वराचा रागहि त्यांजवर होत असतो. (३) अणखी ते शेवटपर्यंत टिकतील, असें ह्मणण्यावरून ते आपल्याच शक्तीनें सन्मार्गांत टिकून राहतील, असाहि अर्थ धरूं नये. कारण कीं जे सर्वांहून मोठे भावीक भक्त आहेत, त्यांस ईश्वरी साह्य न मिळालें, तर तेहि सन्मार्ग सोडून नाशास जाण्याजोगे आहेत. यास्तव सद्भक्तांचा टिकाव ईश्वराच्या सहायावांचून होईल, असें समजूं नये. (४) अणखी जे सद्भक्त आहेत, ते सर्व एकसारिखेच पवित्रतेंत व सद्गुणांत वाढतात आणि एकसारिखींच आत्मीक समाधानें व आनंद भोगितात, असें समजूं नये. कारण कीं ते कधीं कधीं कांहींच न वाढतां, जसेचे तसेच राहतात असें दिसतें; कधीं कधीं ते मागें हटतात, आणि कधीं कधीं धर्मसंबंधी सर्व शांतवन त्यांच्या मनांतून जाऊन, ते मोठ्या

निराशेमध्यें पडतात. (५) अणखी जे एकदां सद्धर्माचा अंगीकार करून न्यायीकृत होतात, ते पवित्रतेंत टिकोत अथवा न टिकोत, तरी ते तारण पावतीलच असा अर्थ नाहीं. कारण जे सन्मार्गांत शेवटपर्यंत टिकतील, तेच तारण पावतील असें ईश्वराने सांगितलें आहे. (६) अणखी आपण स्वतां यत्न केल्यावांचून ते सन्मार्गीं टिकतील असाहि अर्थ नाहीं. कारण कीं त्यांचा टिकाव सन्मार्गीं होण्यासाठीं जरी ईश्वराने त्यांस सहाय केलें, तरी तें केवळ साह्यच आहे आणि टिकणें नव्हे. तर तें सहाय घेऊन सन्मार्गीं टिकणें हें सद्भक्तानी स्वतां आपण केलें पाहिजे. यास्तव स्वतां आपण यत्न केल्यावांचून सद्भक्त सन्मार्गांत टिकतील असेंहि समजूं नये. तर २, – सद्भक्त सन्मार्गांत शेवटपर्यंत टिकून राहतील, यावरून जो अर्थ धरावा तो आतां सांगतों; सद्भक्त ह्मणजे ईश्वराच्या पवित्र आत्म्याच्या प्रेरणेने ज्या मनुष्यांच्या मनाचा पुनर्जन्म ह्मणजे पवित्र पालट खरोखर झाला आहे, ते सन्मार्गाचा त्याग सर्वस्वें असा कधीं करणार नाहींत; ह्मणजे जरी ते वारंवार पापांत पडतील, आणि कधीं कधीं मोठीं पापेंहि करितील, तरी ते पुन्हा पश्चात्तापी होऊन सन्मार्गावर येतील, आणि आकाशांतील गौरवी स्थितीस पोहंचतील, तोंवर ते सद्गुणांत वाढत जाऊन शेवटीं ते पूर्ण पवित्र होऊन तारण पावतील. जो एकदां खरा विश्वास धरून ईश्वराची कृपा पावला, तो पुढें नाश पावे असा सन्मार्गभ्रष्ट कधीं व्हावयाचा नाहीं; ह्मणजे खरा विश्वास आणि तारण यांचा असा निकट संबंध आहे कीं, जो एकदां खरा विश्वासणारा झाला तो तारणहि पावेलच पावेल, असा पूर्ण निश्चय आहे.

प्र० २. जे सद्भक्त आहेत, ते याप्रमाणें सन्मार्गांत टिकून राहतील, हें कशावरून समजावें ?

उ० ते याप्रमाणें सन्मार्गांत टिकून राहतील, असें ईश्वरी शास्त्रावरून समजतें. जे कोणी ईश्वराचे खरे भक्त होतात, ते पुढें कधीं सन्मार्गाचा त्याग सर्वस्वें करितील व नाशास जातील, असें शास्त्रामध्यें कोठेंहि सांगितलें नाहीं. आणि खऱ्या भक्तांतील कोणी कधीं नाशास गेला असा एकहि लेख सर्व शास्त्रांतअढळत नाहीं, पण उलट्या प्रकारें बहुत ठिकाणीं असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, जे एकदां ईश्वराचे खरे भक्त होतात, ते शेवटपर्यंत सन्मार्गीं टिकून तारण पावतील. ज्यांस ईश्वराने तारण पावण्यासाठीं निवडिलें त्यांस तो तारीलच तारील. कारण कीं त्याचें बोलावणें व निवडणें हीं पश्चात्तापाविरहित आहेत. आणि ज्यांला ईश्वराने आत्म्याकडून पुन्हा जन्मविलें, ह्मणजे ज्यांच्या मनाचा पवित्र पालट केला आहे, त्यांस त्याने आपल्या कृपेंत घेतलें आहे, असें ठरतें. आणि ज्यांस त्याने आपल्या कृपेंत घेतलें त्यांचें तो पूर्ण कल्याण केल्यावांचून राहणार नाहीं. कारण कीं ईश्वराची कृपा, मनुष्याच्या कृपेसारिखी अपूर्ण व चंचळ नाहीं; परंतु पूर्ण व स्थिर असी आहे. या सर्व विचारांवरून प्रमाण पटतें कीं जे ईश्वराचे भक्त होतात ते शेवटपर्यंत सन्मार्गीं टिकून तारण पावतील. आणि ख्रिस्ती शास्त्रांतील दुसऱ्या सर्व सिद्धांतांवरूनहि हेंच प्रमाण ठरतें कीं, सद्भक्त शेवटपर्यंत टिकतील. १ योहा० २: १९. मात्थी ७: २२,२३. इब्री ७: २५. रोम. ८: ३८,३९. योहा. १४:. १६,१७. १ योहा. ३: ९. योहा. ५: २४.१७:१२.

६: ६४,७०,७१,३७,३९. १०:२७–२९. एफे. ४:३०. इर्मे. ३२: ४०. ३१: ३. २तिम. २: १९. फिली. १: ६. २थेस. ३: ३. गीत ३७: २३, २४. १पेत्र. १: ४,५. इयो. १७: ९.

प्र० ३. आपला टिकाव सन्मार्गामध्यें होण्यासाठीं सद्भक्तानी काय केलें पाहिजे?

उ० त्यांचा टिकाव होण्याविषयींचे जे उपाय ईश्वराने नेमून ठेविले आहेत, ते सर्व सद्भक्तानी आपण स्वतां केले पाहिजेत. कारण जरी सद्भक्तांचा सन्मार्गांत टिकाव होणें, हें ईश्वरी सहायावांचून होऊं शकत नाहीं, हें खरें आहे, तरी जर ते स्वतां ईश्वराने नेमून दिल्हेले उपाय करणार नाहींत, तर ईश्वर आपलें साह्य त्यांस देणार नाहीं हेंहि खरें आहे. कारण जसें अचेतन अनात्मिक यंत्र केवळ चालकाच्या प्रेरणेने चालतें, तसा मनुष्य नाहीं. तो तर सचेतन, बुद्धियुक्त आणि स्वतंत्र असा कर्त्ता आहे. ह्मणून तो जें कांहीं करितो, तें हेतु व कारणें मनांत आणून जसी इच्छा त्याच्या ठायीं उत्पन्न होती, तसें तो आपलें प्रत्येक कर्म आपल्या स्वतंत्रतेने करीत असतो. यास्तव त्यांस ईश्वरी सहाय मिळत असतांहि त्यांचें सन्मार्गीं टिकणें होण्याचे जे उपाय ईश्वराने नेमून ठेविले आहेत, ते त्यानी स्वतां केले पाहिजेत.

प्र० ४. आपल्या मनाचा पालट झाला आहे असें जे मानितात, ते जर सन्मार्गांत टिकून राहत नाहींत तर त्यांस आपल्या पालटाविषयीं कसें वाटावें?

उ० जर ते सन्मार्गांत टिकून राहत नाहींत तर आपला खरोखर पालट अद्याप झाला नसेल आणि पालट झाला ह्मणून जें आपणांस वाटतें, तें केवळ भ्रम आहे, असें त्यांस

वाटावें. कारण कीं जो ख्रिस्ती वर्त्तणूक करीत नाहीं त्याला आपण ख्रिस्ती आहें, असें समजण्याचा काय आधार?

प्र० ९. सन्मार्गीं टिकून राहण्यास यत्न करावें असे बोध आणि आज्ञा शास्त्रांत आहेत, त्यांवरून जे खरे भक्त आहेत ते कधीं तरी सन्मार्गाचा त्याग सर्वस्वेंकरून नाशास जातील, असा अर्थ निघतो कीं काय?

उ० नाहीं. सन्मार्गांत टिकण्यासाठीं यत्न करण्याविषयीं आणि सन्मार्गांतून न बहकण्यासाठीं जपण्याविषयीं, जे बोध आणि ज्या आज्ञा शास्त्रांत आहेत, त्यांवरून कोणी खरा ईश्वरभक्त खचीत अधर्मी होऊन नाश पावेलच, असा अर्थ ठरत नाहीं. पण जर त्यास ईश्वरी साह्य न मिळालें व जर त्यानीं योग्य यत्न केले नाहींत, तर ते अधर्मी होऊन नाश पावण्याजोगे आहेत असें मात्र दाखविलें जातें. परंतु जे एकदां खरोखर ईश्वरभक्त झाले, त्यांस आपल्या मार्गीं शेवटपर्यंत टिकवावें असा ईश्वराचा मनोदय आहे. आणि तो आपला मनोदय सिद्धीस नेण्यावांचून राहणार नाहीं असा निश्चय आहे. यावरून सद्भक्तांचा टिकाव सन्मार्गीं होण्याचा निश्चय होतो. तथापि ईश्वर आपले बेत योग्य उपायांच्या योगानें सिद्धीस नेत असतो. त्याप्रमाणें सन्मार्गांत टिकण्यास यत्न करण्याविषयीं, आणि सन्मार्गांतून बहकून न जाण्यास जपण्याविषयीं जो बोध व ज्या आज्ञा शास्त्रांत आहेत; त्या सद्भक्तांस सन्मार्गीं टिकविण्याचा एक उपायच आहे असें समजावें. आणि जे खरे भक्त आहेत, ते ईश्वराच्या सहायानें ह्या बोधाकडून सावध होऊन यत्न करितील व सन्मार्गीं टिकतील असा पूर्ण निश्चय आहे.

प्र० ६. सद्भक्तांच्या टिकावाविषयींचा हा सिद्धांत जाणण्याने सद्भक्तांस कसी प्रेरणा होण्याजोगी आहे?

उ० स्वपरीक्षा करणें, अशक्त भक्तांचें समाधान करणें, आणि उद्धार प्राप्त करून घेण्याचे उपाय योग्य रीतीने केले असतां तारण होईल असी आशा धरून भयाने व कांपण्याने आपलें तारण साधणें, व दुसऱ्यांस असें करण्याचा बोध करणें; हीं कर्त्तव्य कर्मे करण्याचीच प्रेरणा व उत्तेजन हा सिद्धांत जाणण्याने व विश्वासण्याने सद्भक्तांस होण्याजोगी आहे. कारण कीं कार्य सिद्धीस जाण्याच्या निश्चयावरून त्या कार्याचे उपाय व साधनें जीं आहेत तीं करण्याची अवश्यकता कमी होती किंवा नाहींसी होती असें नाहीं. परंतु कार्यसिद्धि होण्याचा निश्चय असल्यावरून त्याविषयीं उपाय करण्याचें उत्तेजन मात्र विशेष होतें असें आहे. यास्तव हा सिद्धांत विश्वासल्याने कोणाला पापांत राहण्याचें, किंवा आपलें तारण साधून घेण्याचे उपाय न करण्याचे उत्तेजन होतें असें अगदी नाहीं. परंतु पाप सोडून उद्धार प्राप्त करून घेण्याचे उपाय करण्याची अवश्यकता वाढून ते करण्याची प्रेरणा होती असें आहे. असाच सर्व ईश्वरी भक्तांचा अनुभव आहे.

---

## प्रकरण १९.

## मरण.

प्र० १. मरण ह्मणजे काय?

उ० शरीर व आत्मा यांचा एकमेकांपासून वियोग होणें, यास प्राण जाणें, किंवा मरण होणें, असें ह्मटलें आहे. जेव्हां मरण होतें तेव्हां चलनवलनादिक क्रिया बंद हो-

ऊन, शरीर निर्जीव ह्मणजे अचेतन पडतें. आणि आत्मा हा आपल्या मातीच्या घरापासून वियुक्त होऊन ह्मणजे विदेही होत्सातां, आपल्या सर्वकाळिक वस्तींत शिरतो.

प्र० २. सर्व मनुष्यांस मरण लागत असतें कीं काय?

उ० होय, जगाच्या प्रारंभापासून आजपर्यंत जीं मनुष्यें उत्पन्न झालीं, तीं हनोख व एलिया हे दोन खेरीज करून सर्व मरण पावलीं आहेत, व जीं आतां पृथ्वीवर आहेत, व जीं पुढें या पृथ्वीवर होतील, त्यांतील जीं ख्रीस्ताच्या पुन्हा येण्याच्या वेळेस ह्या पृथ्वीवर जिवंत राहतील, तीं खेरीज करून, सर्व मरण पावतील. जीं ख्रीस्ताच्या पुन्हा जगांत येण्याच्या वेळेस जिवंत असतील, तीं मरण न पावतां त्यांच्या शरिराचें रूपांतर होण्याचा परिणाम कांहीं प्रकारें मरणासारिखाच होईल. आणि हनोख व एलिया हे जे मरण न पावतां परलोकीं गेले तेहि या प्रकारें शरिराचें रूपांतर पावल्यावांचून गेले नाहींत असें शास्त्रांतील दुसऱ्या वाक्यांवरून उघड दिसतें. उत्प. ३:१९. उप. १२: ७. इब्री ९: २७. ११: ५. २ राज. २: ११. १ करिं. १५: ५१,५२.

प्र० ३. कोणी मनुष्याच्याने आपलें मरण टाळवेल कीं काय?

उ० कोणी मनुष्याला कधीं कोणत्या उपायानें आपलें मरण चुकवितां येत नाहीं. बाळपण, प्रौढपण, ह्मातारपण, आणि आरोग्यता, सशक्तता, सौंदर्य, व चांगुलपण, यांतील कोणत्याहि अवस्थेमध्यें, प्रत्येक मनुष्यास मरण येण्याजोगें आहे. यास्तव आपल्या आयुष्यांतील अमुक वेळेस व अमुक अवस्थेमध्यें आपणांस मरण येणार नाहीं असें समजण्यास कोणास कांहीं आधार नाहीं. आणि

अमुकच वेळेस व अमुकच अवस्थेंत व अमुकच रीतीनें आपणास मरण येईल असेंहि कोणाच्यानें सांगवत नाहीं. उप. ८: ८. इयो. १४: ५. ३०: २३. याको. ४: १४.

**प्र०** ४. जर कोणी मनुष्यानें कधीं पाप केलें नसतें, तर मनुष्यजात मर्त्य झाली असती कीं काय?

उ० नाहीं. मग कोणी मनुष्य मर्त्य झालें नसतें. परंतु जसे हनोख व एलीया हे मरण न पावतां आकाशलोकीं गेले, तसेंच सर्व मनुष्यें आपल्या परीक्षेचा काळ संपल्यावर आकाशलोकीं गेलीं असतीं असें वाटतें.

**प्र०** ५. कोणत्या मनुष्यास केव्हां व कसें मरण लावावें हें कोणाच्या हातीं आहे?

उ० याचा अधिकार ईश्वराच्या हातीं आहे. तोच आपल्या इच्छेप्रमाणें ज्यास पाहिजे त्यास जेव्हां पाहिजे तेव्हां व ज्या रितीनें पाहिजे त्या रीतीनें मरण लावितो. अनु. ३२: ३९. इयो. १४: ५. ३०: २३.

**प्र०** ६. कशासाठीं ईश्वर मनुष्यांस मरण लावितो?

उ० मनुष्य पापी असतां त्यांस मरण लागणें योग्य आहे, आणि त्यांस परलोकीं जाण्यास तयार करण्यासाठीं मरणासारिखा कांहीं तरी पालट त्यांस लागणें अवश्य आहे, म्हणून ईश्वर त्यांस मरण लावितो.

**प्र०** ७. मरणाकडून मनुष्यांची अवस्था कसी होती?

उ० मरणाकडून त्यांचे सर्व ऐहिक संबंध, मालमत्ता, मान, प्रतिष्ठा, पदवी, अधिकार, आनंद, व खेद आणि सर्व दुसरे ऐहिक उपभोग यांचा आणि त्यांच्या परीक्षेच्या काळाचा शेवट होतो. आणि गरीब व श्रीमंत, उंच व नीच, मोकळे व स्वतंत्र, यांमधील सर्व भेद नाहींसे होऊन, ते

सर्वकाळच्या वस्तींत प्रवेश करितात. उप. ९: १०. प्रग. २२: ११.

प्र० ८. मरण सर्व मनुष्यांस एकसारिखेंच वाटतें कीं काय?

उ० नाहीं. जे अधर्मी आहेत, त्यांस मरण अत्यंत भयंकर वाटतें, कारण कीं मरणाकडून त्यांच्या सर्व सुखाचा शेवट आणि आशेचा भंग होऊन ते सर्वकाळच्या दुःसह पिडा व यातना यांमध्यें जाऊन राहतात. परंतु जे धार्मिक आहेत, त्यांस मरण हें सुखाचें द्वार असें वाटतें, कारण कीं मरणाकडून त्यांचीं सर्व दुःखें समाप्त होऊन ते सर्व पाप व अशुद्धता यांपासून पूर्णपणें मुक्त होतात, आणि आकाशांतील परिपूर्ण व अवाच्य अशा सर्वकाळिक सुखामध्यें जाऊन राहतात. गीत ५५: ४. यशा. ५७: १. प्र० १४: १३. नीती ११: ७. मात्थी २५: ४६.

प्र० ९. मनुष्याला मरणासाठीं नेहेमी सिद्ध होऊन राहणें अगत्य आहे कीं काय?

उ० होय, प्रत्येक मनुष्याने मरणासाठीं सर्वदां सिद्ध असावें हें फार अवश्य आहे. कारण कीं आपणांस मरण केव्हां लागेल हें कोणास कळत नसतें. आमच्या आयुष्याच्या एका घटकेचा देखील आह्मास भरवसा नाहीं. आणि मरणोत्तर स्थितीमध्यें ह्मणजे परलोकीं जें सर्वकाळचें सुख किंवा दुःख आह्मास लागणें आहे, तें आह्मी मरणासाठीं जसी तयारी करूं त्याप्रमाणेंच होईल. यास्तव आह्मी मरणासाठीं सर्वदां सिद्ध असावें हे अवश्य आहे. मात्थी २४: ४४. उप. ९: १०. १ तिम. ६: १९.

प्र० १०. मरणासाठीं तयार होण्याकरितां आह्मी काय करावें?

उ० जें करण्याने आह्मी ईश्वराच्या न्यायासनासमोर उभे राहण्यास, व आकाशांत जाऊन तेथील सर्वकाळिक सुखांचा उपभोग घेण्यास, ह्मणजे जे पूर्ण नीतिमान आहेत त्यांस जे प्रतिफळ मिळणार तें पावण्यास योग्य होऊं; तें सर्व करणें, हेंच मरणासाठीं तयारी करणें आहे. त्याचा सारांश ह्मटल्यास हाच आहे कीं, खरा पश्चात्ताप करून तारणाऱ्यावर पूर्ण विश्वास ठेवणें, आणि मनाचा पवित्र पालट होऊन ईश्वराच्या आज्ञा पाळीत असणें, हेंच मरणासाठीं तयार होणें आहे. लुका १३: ३. मार्क १६: १६. योहा. ३: ३. याको. २: १७. नीती १४: ३२.

प्र० ११. आह्मी मरणाविषयींचें भाषण कोणत्या रीतीने करावें?

उ० मोठ्या गंभीरपणाने आणि नम्रतेने करावें. या विषयाचा विनोद किंवा उपहास करणें अगदीं अनुचित आहे. आणि जो कोणी या गंभीर विषयाची थट्टा करितो तो नीच, अविचारी, व कुबुद्धीचा आहे असें समजावें.

---

## प्रकरण ३०.

## मरणोत्तर स्थिति.

प्र० १. मनुष्यांस मरणोत्तर स्थिति आहे, हें कशावरून समजतें?

उ० मानवी प्रकृतीचा विचार केल्यावरून आणि शास्त्रांतील बोधावरून याविषयींचें ज्ञान होतें. तें येणेंप्रमाणें.

१. मनुष्यांचा आत्मा अपांचभौतिक आहे; ह्मणून दे-

हाचा नाश होण्याने आत्म्याचा नाश होईल, असें दिसत नाहीं. कारण प्रचितीवरून कळून आलें आहे कीं, आत्मा शरिरांत असतां त्या शरिराचे अनेक अवयव झडले, सडले, किंवा कापून टाकिले, तरी आत्मा जसाचे तसाच राहतो; ह्मणजे शरिराच्या अवयवांच्या भंगाने आत्म्याच्या एकाहि शक्तीचा भंग होत नाहीं. यावरून साफ अनुमान होतें कीं, शरिराच्या भंगाने आत्म्याचा भंग होण्याचें कांहीं अवश्य कारण नाहीं.

२. सुरवंटासारिख्या कांहीं किड्यांची असी गोष्ट दिसून आली आहे कीं, त्यांचे देह पूर्णावस्थेस पोहंचत तोंवर त्यांच्या देहाचे अनेक समूळ पालट होत असतात. आणि ते पालट पाहिले असतां मरणासारिखेच असतात. त्यावरून अनुमान होतें कीं, मनुष्याच्या शरिराचेहि तसेच पालट होऊन त्यास अधिक उत्तम व पूर्णावस्थेचें शरीर मिळणें संभाव्य आहे. आणि मनुष्याच्या बाळपणापासून ह्मातारपणापर्यंत त्याच्या शरिराचे असे अनेक पालट होतात कीं, त्याचें मुळचें शरीर कित्येक वेळा अगदीं पालटून पालटून नवें होतें, त्याप्रमाणें मरणाकडून त्याच्या शरिराचा अणखी एक विशेष पालट होऊन, पुढें त्यास विशेष चांगलें आणि अधिक पूर्ण असें शरीर मिळून त्यांत तो राहील असें अनुमान होतें.

३. मनुष्याला आपलें ज्ञान, गुण आणि सुखहि अत्यंत वाढविण्याची जी शक्ति व इच्छा आहे, तिची पूर्णता या आयुष्यांत कधीं होत नाहीं. ज्या मनुष्यानें आपलें ज्ञान, गण व सुख हीं दुसऱ्या सर्वांहून अधिक वाढविलीं आहेत, त्याची त्या वृद्धीनें पूर्त्तता झाली, किंवा त्याची वृद्धीची शक्ति

खुंटली किंवा उणी झाली, असें होत नाहीं. परंतु उलटें जों जों तो अधिकाधिक वृद्धि पावत जातो, तों तों त्याची वृद्धीविषयींची शक्ति आणि अपेक्षा असी वाढत जाती कीं, त्याच्या आयुष्यांत जी सर्वांहून मोठी वृद्धि त्यास होती, ती त्याच्या संभाव्य व भावी वृद्धीचा केवळ आरंभ मात्र झाल्यासारिखी दिसती. यावरून अनुमान होतें कीं, वृद्धीविषयींची जी शक्ति व इच्छा ईश्वरानें मनुष्यास दिल्ही आहे, तिच्या व्यापाराचा आरंभ झाला नाहीं, इतक्यांतच ईश्वर ती नाहींसी करील असें होणार नाहीं. परंतु जेथें ह्या शक्तीची व अपेक्षेची पूर्त्तता होण्याची सोई होईल, असी दुसरी ह्मणजे मरणोत्तर स्थिति ईश्वर मनुष्यास देईल हें संभाव्य दिसतें.

४. अणखी अमरत्वाची अपेक्षा आणि आवड सर्व मनुष्यांस स्वभावेंकरून आहे, ह्मणजे आपण सर्वकाळ वांचावें आणि कधीं न मरावें असी इच्छा सर्व मनुष्यांच्या ठायीं स्वभावेंकरून असती. परंतु जर मनुष्यास मरणोत्तर स्थिति व्हावयाचीच नसती, तर ईश्वर त्याच्या ठायीं असी इच्छा कशाला घालिता? ह्मणजे जें कधीं प्राप्त होण्याजोगें नाहीं तें प्राप्त करण्याची अपेक्षा त्यास कशाला देता? परंतु अमरत्वाची अपेक्षा सर्व मनुष्यांच्या ठायीं स्वभावेंकरून आहे, त्यापेक्षां मनुष्यास मरणोत्तर स्थिति व्हावयाची आहे, असें स्पष्ट अनुमान होतें.

५. जेव्हां आपण कांहीं वाईट कर्म करितों तेव्हां तें कोणी मनुष्यास कळलें असो किंवा नसो आणि त्यावरून ह्या आयुष्यांत आह्मास दंड लागण्याची संभावना असो किंवा नसो; तरी त्यावरून आमचा सदसद्विवेक आह्मास

दोषी ठरवितो आणि आमच्या मनांत दंडाची भीति घालितो. आणि जेव्हां आह्मी कांहीं चांगलें कर्म करितों, तेव्हां तें कोणी मनुष्यांस कळलें असो किंवा नसो, आणि त्याचें प्रतिफळ ह्या आयुष्यांत मिळण्याची संभावना असो किंवा नसो, तरी त्यावरून आमचा सदसद्विवेक आमची प्रशंसा करून आह्मास सुखाचें आश्वासन देतो. यावरून असें सबळ अनुमान होतें कीं ज्यांत आमच्या बऱ्या वाईट कर्मांचें पूर्ण प्रतिफळ आह्मास मिळेल असी मरणोत्तर स्थिति पुढें आह्मास प्राप्त व्हावयाची आहे. कारण जर असें नसतें, तर आमच्या बऱ्या वाईट कर्मांचें यथार्थ प्रतिफळ ह्या आयुष्यानंतर मिळण्याची सूचना आमचा सदसद्विवेक आह्माला कशासाठीं करिता?

६. अणखी मनुष्याच्या बऱ्या वाईट कर्मांचें योग्य व पूर्ण प्रतिफळ ह्या जगांत होत नसतें, असें केवळ नव्हे पण ह्या जगांतील न्यायाधीशासमोर, जो वास्तविक अन्यायी आहे तो न्यायी ठरून सुख पावतो, आणि जो वास्तविक न्यायी आहे तो अन्यायी ठरून दुःख पावतो, असेंहि वारंवार घडतें. परंतु ईश्वराने मनुष्यास सदसद्विचारी व नीतिज्ञ स्वतंत्रकर्त्ते असे करण्याने ठरविलें आहे कीं, त्यांस त्यांच्या बऱ्या वाईट कर्मांप्रमाणें यथार्थ व पूर्ण प्रतिफळ मिळणें अवश्य आहे. आणि प्रतिफळ देणारा ईश्वर अत्यंत न्यायवान राजा आहे आणि तो प्रत्येकाला त्याच्या कर्मांचें यथार्थ व पूर्ण प्रतिफळ दिल्ह्यावांचून राहणार नाहीं, असा निश्चय आहे. ह्मणून ज्यापेक्षां तें यथार्थ व पूर्ण प्रतिफळ ह्या आयुष्यांत कोणासहि प्राप्त होत नाहीं, त्यापेक्षां जेथें तें प्राप्त होईल

असी मरणोत्तर स्थिति प्रत्येक मनुष्यास होईल, असें फार सबळ अनुमान होतें.

७. अणखी असें कळून आलें आहे कीं, जगांतील सर्व देशांतल्या व सर्व पिढ्यांतल्या बहुतकरून सर्व लोकांनी आपणांस मरणोत्तर स्थिति होणार आहे, असा विश्वास धारिला आहे. आणि ज्या मतास जगांतील बहुतेक लोकांची सम्मति आहे, तें मत खरें असण्याचा फार मोठा संभव असतो. यास्तव ह्या सार्वत्रिक विश्वासावरून हें मत खरें असावें, असें अनुमान होतें.

याप्रमाणें याविषयीं मनुष्याच्या विवेकावरून जीं प्रमाणें निघतात, तीं दाखविलीं आहेत. त्यांतील एकेक प्रमाण पाहिल्यास त्यावरून या सिद्धांताचा पुरता निश्चय होतो असें नाहीं. तरी हीं सर्व प्रमाणें एकदम मनांत आणिलीं तर असा बहुतकरून निश्चय होतो कीं मनुष्यास मरणोत्तर स्थिति व्हावयाची आहे. तरी हीं सर्व प्रमाणें असतांहि ईश्वराने आपल्या शास्त्राकडून याविषयींचें निश्चित ज्ञान दिल्हें नसतें, तर आमची पूर्ण खातरी झाली नसती. परंतु आतां ईश्वराने आपल्या शास्त्रांत बहुत ठिकाणीं अगदीं स्पष्टपणें व निर्धाराने कळविलें आहे कीं, मनुष्यास मरणोत्तर स्थिति व्हावयाची आहे. आणि त्या स्थितीमध्यें प्रत्येक मनुष्यास त्याच्या कर्मांचें यथार्थ व पूर्ण प्रतिफळ मिळावयाचें आहे. यावरून मनुष्यास मरणोत्तर स्थिति व्हावयाची आहे असा निभ्रांत सिद्धांत होतो. २ तिम. १:१०. उप० १२:७. मात्थी १०:२८. १७:३. २२:३२. २ करि. ५:१.

**प्र०** २. मनुष्य मरणोत्तर स्थितीमध्यें कोणत्या प्रकारें राहतील?

उ० ते मरणोत्तर स्थितीमध्येंहि सक्रिय ह्मणजे उद्योग करणारे आणि भानयुक्त ह्मणजे सचेतन होत्साते; पापी असल्यास सर्वकाळचें दुःख, आणि उद्धरलेले असल्यास सर्वकाळचें सुख भोगीत राहतील. कारण मरणाने त्यांचा देह निर्जीव होऊन मातीसीं मिळतो, आणि तो शेवटील दिवसांतल्या पुन्हां उठण्याच्या वेळेपर्यंत तसाच राहतो. परंतु त्याचा आत्मा मरणाने आपल्या मातीच्या घरांतून बाहेर निघतो ह्मणजे विदेही होतो, त्यावरून तो देहासारिखा अचेतन किंवा निष्क्रिय होतो असें नाहीं. तर तो विदेही झाल्यावरहि नेहमी सक्रिय आणि सचेतन राहतो. यास्तव तो मरणोत्तर स्थितीमध्येंहि विचार करणें, समजणें, इच्छिणें, भोगणें, आणि कर्मे करणें, ह्या गोष्टी सर्वदा करीत जाईल, याविषयीं कांहीं संशय नाहीं. आतां विदेही झालेले आत्मे, समजणें, विचार करणें, इच्छिणें, कर्म करणें, व सुख दुःख भोगणें, ह्या क्रिया कोणत्या रीतीने करितात, हें जरी आमच्या सांप्रतच्या अवस्थेंत आह्मास समजत नाहीं, तरी यावरून ते ह्या क्रिया करीत नाहींत असें कांहीं प्रमाण निघत नाहीं. कारण सुशिक्षित व विद्वान लोक आपले विचार व इच्छा हीं लेखनद्वारें एकमेकांस कसीं कळवितात, व दुसरीं बहुत कलाकुशळतेचीं कामें यंत्रांकडून कसीं करितात, हें जरी अनक्षर व अनाडी अशा रानटी लोकांस अगदीं समजत नाहीं, तरी त्यावरून विद्वान लोक आपले विचार लेखनद्वारें एकमेकांस कळवीत नाहींत, व दुसरीं यांत्रिक कामें करीत नाहींत, असा सिद्धांत होत नाहीं. त्याचप्रमाणें परलोकांतील आत्म्यांच्या क्रियांविषयीं समजावें. लूका १६:२२–२५. २३:४३. २ करिं. ५:६–९.

प्र० ३. मरणोत्तर स्थितीमध्यें मनुष्याचे गुण व शक्ति हीं वाढून ते अधिकाधिक सुखदुःख भोगण्यास योग्य होतात कीं काय?

उ० होय, मरणोत्तर स्थितीमध्यें मनुष्याचे गुण व शक्ती नेहमी वाढत जातील आणि त्यावरून ते अधिकाधिक सुख-दुःख भोगण्याजोगे होत जातील. तथापि ते कितीहि वाढले तरी ईश्वर जो अनंत व अपार आहे त्याच्या बरोबरीस कधीं यावयाचे नाहींत.

प्र० ४. आत्म्याची मध्यस्थिति ह्मणजे काय?

उ० मनुष्यें मरण पावल्यावर, त्यांचे विदेही आत्मे लागलेच परलोकीं जाऊन सुखाच्या किंवा दुःखाच्या स्थितींत राहतात. परंतु त्यांचे देह मातीसीं मिळून पुन्हा उठण्याच्या समयापर्यंत निद्रिस्थ ह्मणजे अचेतन व निष्क्रिय राहतात. ते सर्व पुन्हा उठण्याच्या दिवसीं ह्मणजे जगाच्या समाप्तीच्या दिवसीं अविनाशी असे उठतील आणि आपापल्या आत्म्यांसीं संयुक्त होऊन, पुढें सर्वकाळपर्यंत तसेच राहतील असें आहे. यास्तव मरणापासून पुन्हा उठण्याच्या दिवसापर्यंत ज्या विदेही स्थितींत परलोकवासी आत्मे राहतात, तिला पृथक् स्थिति किंवा मध्यंतर स्थिति ह्मटलें आहे.

---

## प्रकरण २१.

## मेलेल्यांचें पुन्हा उठणें.

प्र० १. मेलेल्यांचें पुन्हा उठणें ह्मणजे काय?

उ० मरण पावलेल्या मनुष्यांचीं भंगलेलीं व मातीसीं मिळून गेलेलीं शरिरें यथास्थित सजीव व अविनाशी असीं उठून आपापल्या आत्म्यांसीं संयुक्त होणें; यास मेलेल्यांचें पुन्हा उठणें ह्मटलें आहे.

प्र० २. असें पुन्हा उठणें होईल, हें कशावरून समजतें?

उ० असें पुन्हा उठणें होईल याविषयींचीं प्रमाणें येणे-प्रमाणें आहेत. (१) मेलेल्यांचें पुन्हा उठणें होईल, ही गोष्ट आह्मास आमच्या तर्कानेच कळून आली नसती खरी, तरी ही गोष्ट व्हावयाची आहे, असें दुसऱ्या रीतीने प्रगट झाल्यावर, ही गोष्ट घडणें असंभाव्य किंवा असंगत नाहीं हें आह्मास समजतां येतें. (२) जीवजंतु वनस्पति आणि झाडें यांचें पुन्हा उठणें वर्षोवर्षीं होतांना आह्मी पाहतों. त्यावरून अनुमान होतें कीं, मनुष्यांसहि पुन्हा उठणें होणें, संभाव्य आहे. (३) हनोख आणि एलिया हे देहासुद्धां लोकांतरीं नेले गेले; आणि याईरसाची कन्या, एका विधवेचा पुत्र आणि लाजारस यांस ख्रीस्ताने मेलेल्यांमधून उठविलें; आणि ख्रीस्ताला वधस्तंभीं मारिलें, तेव्हां बहुत मेलेल्यांचीं शरिरें सजीव होऊन उठलीं; असें शास्त्रांत सांगितलें आहे. त्यावरून समजतें कीं सर्व मेलेल्यांचें पुन्हा उठणें होणें संभाव्य आहे. (४) प्रभु येशू ख्रीस्त जो दुसरा आदाम तो सर्व भक्तांचा पुढारी आणि प्रतिनिधि असा आहे. यास्तव तो मेलेल्यांतून पुन्हा उठल्यावरून असें ठरलें कीं, ज्यांचा तो पुढारी व प्रतिनिधि आहे, तेहि त्यासारिखे पुन्हा उठतील. (५) अणखी सर्व मेलेल्या मनुष्यांचीं शरिरें शेवटील दिवसीं पुन्हा उठतील, व जे त्या वेळेस ह्या पृथ्वीवर जिवंत असतील, त्यांच्या शरिरांचें रूपांतर होईल; असें शास्त्रांतील बहुत वाक्यांमध्यें अगदीं स्पष्टपणें व निर्धाराने सांगितलें आहे. इयो. १९: २६, २७. योहा. ५: २८, २९. ११: ४३, ४४. प्रे० २४: १५. १ करिं. १५: २१,

२२. इब्री ११:५. २ राज. २:११. लूका ८:५४,५५. ७:१४,१५. मात्थी २७: ५२. २८: ६.

प्र० ३. जें शरीर मातीसीं मिळतें तेंच पुन्हा उठेल कीं काय?

उ० होय, तेंच शरीर मोठा पालट पावून उठेल. ह्मणजे जें पूर्वीं नाशवंत, नीच, अशक्त, आणि प्राणाचें शरीर असें होतें; तें पुन्हा उठण्यांत, जरी अविनाशी, श्रेष्ठ, समर्थ, आणि आत्मिक असें होऊन उठेल, तरी त्याचा असा मोठा पालट झाल्यावरहि, जें मातीसीं मिळालें होतें तेंच तें शरीर आहे, असें ह्मणण्यास कांहीं हरकत राहणार नाहीं. १ करिं. १५: ३५–४४.

प्र० ४. मेलेल्यांचीं शरिरें पुन्हा उठावीं हें शक्य आहे कीं काय?

उ० होय. त्यांस पुन्हा उठवायास ईश्वर समर्थ आहे. कारण कीं मरणाने तीं नाहींसीं होतात असें नाहीं, पण केवळ भंगलीं जाऊन पृथ्वीतत्वांसीं मिळतात असें आहे. आणि जर मुळीं त्यांस पृथ्वीतत्वांपासून उत्पन्न करितां येतें, तर तीं पृथ्वीतत्वांसीं मिळून गेल्यावर पुन्हा त्यांस पृथ्वीतत्वांपासून पृथक करून उठविणें हेंहि करितां येईल यांत काय संशय? मेलेल्यांचीं शरिरें पुन्हा उठविण्याचें काम, त्यांस मुळीं उत्पन्न करण्याच्या कामाहून कांहीं कठीण नाहीं. यास्तव मेलेल्यांचीं शरिरें पुन्हा उठवावीं हें सर्वसमर्थ ईश्वराला पूर्णपणें शक्य आहे. प्रे. २६. ८.

प्र० ५. सार्वत्रिक पुन्हा उठणें केव्हां होईल?

उ० जगाच्या समाप्तीस न्यायदिवसीं सार्वत्रिक पुन्हा उठणें होईल; ह्मणजे जे मनुष्य त्या दिवसाच्या पूर्वीं मेलेले

असतील, ते नीतिमान असोत किंवा अनीतिमान असोत, तरी त्यांचीं शरिरें त्या दिवसीं पुन्हा उठून, आपापल्या आत्म्यांसीं संयुक्त होतील, आणि जे मनुष्य त्या वेळेस जिवंत असतील त्या सर्वांच्या शरिरांचें रूपांतर होईल. तें रूपांतर होणेंहि मेलेल्यांतून पुन्हा उठण्यासारिखेंच होईल. आणि हनोख व एलिया हे जे मरण न पावतां लोकांतरीं गेले, ते तरी असें रूपांतर झाल्यावांचून गेले नाहींत. आणि याप्रमाणें पुन्हा उठणें किंवा रूपांतर होणें याकडून जे देह आपापल्या आत्म्यांसीं संयुक्त होतील, ते पुढें सर्वकाळपर्यंत तसेच राहतील. १ थेस. ४:१५–१७. १ करिं. १५:५१, ५२,५३,२३.

प्र० ६. याप्रमाणें शरिराचें पुन्हा उठणें किंवा रूपांतर होणें कशासाठीं होईल?

उ० त्याचें (१) पहिलें कारण असें आहे कीं, मनुष्याचा सांप्रतचा देह, त्याच्या मरणोत्तर स्थितीस योग्य नाहीं. ईश्वराचा साधारण सृष्टिक्रम असा आहे कीं, प्रत्येक प्रकारच्या प्राण्यास ज्या स्थितीमध्यें उत्पन्न करावें, त्या स्थितीस योग्य असा देह त्यास द्यावा. त्याप्रमाणें जो देह त्याने मनुष्यास ह्या आयुष्यांत दिल्हा आहे, तो त्याच्या ह्या आयुष्यांतील स्थितीस मात्र योग्य आहे; आणि मरणोत्तर स्थिति जी ऐहीक स्थितीहून अगदीं वेगळी आहे तिजसाठीं हा देह योग्य नाहीं. ह्मणून हा देह पालटून मरणोत्तर स्थितीस योग्य असा दुसरा देह मनुष्यास प्राप्त होण्यासाठीं पुन्हा उठणें अवश्य आहे. १ करिं. १५: ५०. (२) अणखी मनुष्यें ह्या आयुष्यांत असतां जीं कामें करितात, तीं करण्यांत जसा त्यांचा देह भागीदार असतो, तसाच त्या

कामांचें प्रतिफळ भोगण्यांतहि तो देह भागीदार व्हावा हें योग्य आणि यथान्याय आहे. हें होण्यासाठीं मनुष्यांच्या देहाचें पुन्हा उठणें किंवा रूपांतर होणें, याचें अगत्य आहे. (३) मनुष्यास मरणोत्तर स्थितीमध्यें जीं सुखें किंवा दुःखें लागावयाचीं आहेत, तीं भोगण्याची समर्पकता व शक्ति, ते देहयुक्त असल्याने जसी होईल, तसी ते देहविरहित असल्यास होणार नाहीं. आणि जे मनुष्य उद्धार पावणारे आहेत त्यांच्या आत्म्यांचा व देहांचाहि पुरता उद्धार करावा; ह्मणजे पापाची सत्ता व फळ यांपासून त्यांचा आत्मा व देह या उभयतांस पूर्णपणें मोकळें करावें; आणि जे मनुष्य उद्धार पावणारे नव्हत, ह्मणजे दंड पावणारे आहेत, त्यांजवर पापाची सत्ता पूर्ण होऊं द्यावी आणि पापाचीं संपूर्ण व परिपूर्ण फळें त्यांस लावावीं, असा ईश्वराचा मनोदय आहे. परंतु त्यांच्या देहांचें पुन्हा उठणें किंवा रूपांतर होऊन, ते देह त्यांच्या आत्म्यांसीं संयुक्त झाल्यावांचून, हा ईश्वराचा मनोदय सिद्धीस जाणार नाहीं. कारण दैहिक वासना ज्या आहेत त्या देहाच्या संबंधाने मात्र माणसाला होत असतात. ह्या वासना अशा आहेत कीं, त्यांचें यथायोग्य नियमन केल्याने सद्गुण जडतात आणि त्यांचें योग्य नियमन न करितां त्यांस मोकळें सोडण्याने व तृप्त करण्याने दुर्गुण जडतात. आणि त्या वासनांचें नियमन जसजसें चांगलें व पूर्ण करावें, तसतसें त्या मनुष्याचे सद्गुण वाढून त्यालाअधिक सुख भोगण्याची पात्रता व शक्ति येती. आणि त्या वासनांस जसजसें मोकळें सोडून तृप्त करावें, तसतसें त्या मनुष्याचे दुर्गुण वाढून त्याला अधिक दुःख भोगण्याची पात्रता व शक्ति येती. यास्तव जे उद्धार पाव-

णारे आहेत, त्यांस परिपूर्ण सुखी करण्यासाठीं, आणि जे दंड पावणारे आहेत, त्यांस परिपूर्ण दुःखी करण्यासाठीं त्यांच्या शरीरांचें पुन्हा उठणें किंवा रूपांतर होणें, हें फार अवश्य आहे. (४) अणखी मनुष्यांचे देह पुन्हा उठून किंवा रूपांतर पावून त्यांच्या आत्म्यांसीं संयुक्त होण्याने ईश्वराचें चातुर्य, चांगुलपणा, आणि सामर्थ्य इत्यादि गुण फार गौरवी दिसतील. आणि जेणेंकरून ईश्वराचें गौरव विशेष होईल तें ह्या सृष्टीमध्यें घडणें योग्य व अगत्य आहे. तर ह्यावरून सदरीं सांगितलेलें पुन्हा उठणें व रूपांतर होणें अवश्य आहे असें समजावें.

प्र० ७. हें पुन्हा उठणें कोण करील?

उ० येशू ख्रीस्त जो देवाचा पुत्र आणि मनुष्यांचा तारणारा आहे तोच हें अमानुष आणि ईश्वरी काम करील, असें शास्त्रांत सांगितलें आहे. शेवटील दिवसीं ख्रीस्त येशू आज्ञा करील, तेव्हां ईश्वराचा आद्य दूत आपली तुतारी वाजवील, आणि त्या तुतारीच्या शब्दाबरोबर ख्रीस्ताची सजीवनी शक्ति मेलेल्यांच्या देहांस लागू होऊन ते उठतील, आणि आपल्या आत्म्यांसीं संयुक्त होतील. आणि जे त्या दिवसापर्यंत जिवंत असतील, त्यांच्या देहांचें रूपांतरहि त्याच प्रकारें होईल. १ थेस. ४ः १६.

प्र० ८. पुन्हा उठलेलीं किंवा रूपांतर पावलेलीं शरिरें कोणत्या प्रकारचीं होतील?

उ० जे मनुष्य उद्धार पावणारे आहेत, त्यांचीं शरिरें आत्मिक अविनाशी समर्थ आणि चपळ व गौरवी असीं होतील. तेव्हांपासून पुढें तीं शरिरें कष्टानी थकावयाचीं नाहींत, आणि रोग विकाराने क्षीण व्हावयाचीं नाहींत,

आणि वयोवृद्धीनें जर्जर व्हावयाचीं नाहींत, किंवा कोणत्याहि प्रकारें नाश पावायाचीं नाहींत. परंतु जे पापिष्ठ व दंड पावणारे आहेत त्यांचीं शरिरें जरी अमर अशीं उठतील, तरी तीं नीच कुरूप, लाजिरवाणीं आणि सर्वकाळिक अपमान व धिःकार यांस पात्र अशीं होतील. फिलीपै. ३: २१. दानी. १२: २.

प्र० ९. त्या सार्वत्रिक पुन्हा उठण्याच्या वेळेस सर्व मनुष्यांच्या मनोवृत्ति कशा होतील?

उ० जे उद्धार पावणारे आहेत, ते हर्ष व जयजयकार करीत उठतील, आणि जे दंड पावणारे आहेत, ते लज्जा, भय, आणि थरकांप यांसहित उठतील.

प्र० १०. मनुष्यांस ह्या आयुष्यांत असतां ज्यांची ओळख होती, त्यांस ते पुन्हा उठणें झाल्यावरहि ओळखतील कीं काय?

उ० होय, निश्चयें ओळखतील. नीतिमान जे आहेत, ते जसे आपल्या सोबत्यांस व इष्टमित्रांस व इतर ओळखीच्यांस जाणतील तसेच जे दुष्ट आहेत तेहि आपल्या सोबत्यांस इष्ट मित्रांस आणि इतर ओळखीच्यांस जाणतील. आणि त्यावरून नीतिमानांचें सुख वाढेल आणि दुष्टांचें दुःख वाढेल. आणि मध्यस्थितींतले आत्मेहि याप्रमाणें परस्परांस ओळखतात याविषयीं कांहीं संशय नाहीं. ख्रीस्ताचें रूपांतर होण्याच्या डोंगरावर, जेव्हां मोशे व एलिया हे आले होते, तेव्हां ते एकमेकांस ओळखून परस्परांसीं व ख्रीस्तासीं बोलत होते. मात्थी १७: ३.

प्र० ११. पुन्हा उठण्याविषयींचा सिद्धांत फार अगत्याचा आहे कीं काय?

उ० होय, जरी हा सिद्धांत समजण्यास गूढ आहे आणि विधर्मी व अविश्वासी लोक या सिद्धांताचा नाकार करीत असतात, तरी ख्रिस्ती लोकांस हा सिद्धांत पूर्ण विश्वास्य व अगत्याचा वाटतो. कारण कीं हा ख्रिस्ती धर्माच्या फार भारी व मुख्य सिद्धांतांतील एक विशेष सिद्धांत असा आहे. कारण कीं जर मेलेले पुन्हा उठत नाहींत, तर ख्रीस्तहि पुन्हा उठला नाहीं असें ठरेल, आणि जर ख्रीस्त पुन्हा उठला नाहीं तर जे त्याजवर विश्वास ठेवितात, त्यांची आशाहि व्यर्थ आहे असें होईल. यास्तव हा सिद्धांत ख्रिस्ती मनुष्याच्या आशेचा पाया असा असतां फार मोठ्या अगत्याचा आहे. १ करिं. १५: १२,१३, १४.

---

## प्रकरण २२.

## सार्वत्रिक न्याय.

प्र० १. सार्वत्रिक न्याय ह्मणजे काय?

उ० सर्व मनुष्यें व सर्व पवित्र आणि अपवित्र दूत, यांस एकत्र करून त्या सर्वांसमक्ष त्यांतील प्रत्येकाच्या सर्व कर्मांचा हिशोब घेणें, आणि त्यांच्या कर्मांस योग्य अशा सर्वकाळिक स्थितींत त्यांस घालणें, यास सार्वत्रिक न्याय ह्मटलें आहे.

प्र० २. ह्या सार्वत्रिक न्यायाच्या काळापर्यंत कोणाचा कांहींच न्याय होत नाहीं कीं काय?

उ० असें नाहीं. प्रत्येक मनुष्याच्या व प्रत्येक दुताच्या परीक्षेचा काळ समाप्त होतांच त्याचा पृथक् न्याय होतो, आणि त्याच्या कर्मांचें योग्य प्रतिफळ त्यास लागलेंच प्राप्त

होतें. परंतु हा न्याय केवळ व्यक्तिपर ह्मणजे एकेकाचा पृथक् पृथक् होत असतो. आणि या न्यायांत जें प्रतिफळ त्यास लागतें, तें तो विदेही असतां भोगतो. परंतु सार्वत्रिक न्याय जो होणार आहे, तो सर्वांचा एकदम आणि सर्वांसमक्ष होईल. आणि त्या काळीं सर्व मनुष्यांच्या देहांचें पुन्हां उठणें होऊन प्रत्येकाचा देह त्याच्या आत्म्याशीं संयुक्त होईल. यास्तव तेव्हांपासून प्रत्येक मनुष्य आपलें प्रतिफळ आपल्या देहासुद्धां भोगीत राहील. आणि पुढें सर्वकाळपर्यंत त्याच्या अवस्थेचा कांहींच पालट होणार नाहीं. असा सार्वत्रिक न्यायाचा व व्यक्तिपर पृथक् न्यायाचा भेद आहे.

**प्र०** ३. असा सार्वत्रिक न्याय होणार आहे, हें कशावरून समजलें आहे?

उ० शास्त्रांतील ईश्वरी वचनावरून समजलें आहे. कारण कीं असा सार्वत्रिक न्याय पुढें होणार आहे, असें शास्त्रांतील अनेक ठिकाणीं अगदीं स्पष्ट सांगितलें आहे. प्रे० १७:३१. रोम. १४:१०,१२. यहू. ६.

**प्र०** ४. हा सार्वत्रिक न्याय केव्हां होईल?

उ० जगाच्या समाप्तीस, ह्मणजे ह्या पृथ्वींतील सर्व गोष्टींची पूर्णता होईल तेव्हां. मात्थी २५:३१–३३.

**प्र०** ५. हा सार्वत्रिक न्याय होण्याचें काम किती काळपर्यंत चालेल?

उ० तें काम ज्या काळपर्यंत चालेल त्या काळाची कांहीं परिमिति शास्त्रांत सांगितली नाहीं. आणि ज्या काळांत तें काम उरकेल त्या काळाला जरी न्यायाचा दिवस किंवा शेवटील दिवस असें ह्मटलें आहे, तरी त्या ठि-

काणीं दिवस या शब्दाचा अर्थ एक समय ह्मणजे अनिश्चित अवधीचा काळ, असा होतो. यास्तव सार्वत्रिक न्यायसंबंधी जीं कामें व्हावयाचीं आहेत तीं सर्व होण्यास जितका काळ अगत्य आहे तितके काळपर्यंत तें काम चालेल असें आह्मी समजावें.

प्र० ६. ह्या सार्वत्रिक न्यायाचा समारंभ कोणत्या ठिकाणीं होईल?

उ० तो समारंभ कोणत्या ठिकाणीं होईल हेंहि शास्त्रांत सांगितलें नाहीं. तथापि त्या प्रसंगास योग्य व पुरतें अशा ठिकाणींच तो समारंभ होईल, यांत कांहीं संशय नाहीं. यास्तव बहुधा तो समारंभ ह्या लहानशा पृथ्वीवर होणार नाहीं. परंतु विस्तीर्ण अंतराळामध्यें होईल असा तर्क होतो. १ थेस. ४:१७.

प्र० ७. त्या प्रसंगीं न्यायाधीश कोण होईल?

उ० प्रभु येशू ख्रीस्त हा न्यायाधीश होईल. तो आपल्या गौरवी न्यायासनावर बसेल, आणि प्रत्येकाला त्याच्या कर्मांचें यथान्याय प्रतिफळ भरून देईल. योहा. ५:२२, २७. मात्थी २५:३१–४६.

प्र० ८. जेव्हां प्रभू येशू ख्रीस्त न्याय करावयास येईल, तेव्हां तो कोणत्या रीतीने प्रगट होईल?

उ० तो आपल्या पूर्ण वैभवाने व तेजाने प्रगट होऊन आपल्या गौरवी दुतांसहवर्त्तमान येईल. मात्थी २५:३१.

प्र० ९. जेव्हां प्रभु येशू ख्रीस्त न्याय करावयास येईल, तेव्हां सर्व दूत व मनुष्यें यांस कसें वाटेल?

उ० त्या काळीं प्रभु येशू ख्रीस्ताचें ईश्वरीपण व मानवीपण हीं नाकारावयास, किंवा त्याच्या धर्माचें खरेपण

नाकबूल करावयास कोणी धजणार नाहीं व इच्छिणारहि नाहीं. परंतु जे पवित्र व उद्धार पावलेले आहेत, ते ख्रीस्ताला येतां पाहून अत्यंत आनंद व हर्ष पावतील. आणि जे अपवित्र व दंड पावणारे आहेत, ते त्याला येतां पाहून अत्यंत मोठ्या भयाने व शोकाने व्याकूळ होतील.

प्र० १०. प्रत्येकाच्या परीक्षेच्या अवस्थेचा काळ समाप्त होतांच त्याचा न्याय होऊन, त्याचें योग्य प्रतिफळ त्याला त्याच वेळेस दिल्हें जात असतां, पुन्हा शेवटील दिवसीं सार्वत्रिक न्याय करण्याचें प्रयोजन काय आहे?

उ० जो न्यायाधीश आहे त्याला प्राण्यांच्या कर्मांविषयींची नवी माहिती अथवा अधिक ज्ञान होण्यासाठीं सार्वत्रिक न्याय होण्याचें अगत्य आहे असें नाहीं. कारण कीं तो सर्वज्ञानी प्रभु असतां, त्याला प्रत्येक प्राण्याचीं सर्व कर्में, हेतु, भावना आणि कल्पनाहि पूर्णपणें कळल्या आहेत. परंतु आपण व इतर बुद्धियुक्त प्राणी हे कोणत्या कारणांवरून न्यायी किंवा अन्यायी ठरलों आणि ईश्वराने आपणांस व इतरांस जें कांहीं केलें आहे, तें करण्यांत ईश्वर कसा न्यायी व निर्दोष आहे, हें सर्व पवित्र व अपवित्र प्राण्यांस पुरतेपणीं दिसून यावें; ह्मणून असा सार्वत्रिक न्याय होणें अवश्य आहे. कारण कीं जें यथार्थ व यथान्याय आहे, तेंच ईश्वराने आपल्या प्राण्यांसीं करावें, हें जसें अगत्य आहे; तसेंच जें आपण त्यांसीं करितों, तें सर्व यथार्थ व योग्य आहे, असी सर्व बुद्धियुक्त प्राण्यांची खातरी करावी, आणि तशाने आपलें गौरव दाखवावें, हेंहि अगत्य आहे. आतां प्रत्येक बुद्धियुक्त प्राण्याच्या परीक्षेच्या अवस्थेच्या समाप्तीस त्याचा जो व्यक्तिपर ह्मणजे, पृथक् न्याय ईश्वर करीत अस-

तो, व जें प्रतिफळ त्यास लावीत असतो, त्याकडून त्याच प्राण्यास आपणाविषयीं मात्र असी खातरी होण्याजोगी आहे कीं, ईश्वराने मजसीं जें कांहीं केलें आहे, तें सर्व योग्य व यथार्थ आहे. परंतु दुसऱ्या सर्व बुद्धियुक्त प्राण्यांसहि जें योग्य आहे, तेंच ईश्वराने केलें आहे किंवा नाहीं, हें त्याला समजणें आणि त्यांस जें कांहीं ईश्वराने लाविलें, तें योग्य व यथान्याय आहे किंवा नाहीं, हें दुसऱ्यांस समजणें; हें सार्वत्रिक न्याय झाल्यावांचून होऊं शकणार नाहीं. कारण सार्वत्रिक न्यायाकडून मात्र प्रत्येक प्राण्यास जसीं आपलीं तसीं दुसऱ्या सर्वांचींहि कर्में माहीत होतील. आणि आपणास जें प्रतिफळ मिळालें, तें जसें तसेंच दुसऱ्या सर्वांस जें प्रतिफळ मिळालें, तेंहि माहीत होईल. कारण कीं सार्वत्रिक न्यायाच्या समयीं ईश्वर सर्व बुद्धियुक्त प्राण्यांस एकत्र जमवून त्या सर्वांसमक्ष त्यांतील प्रत्येकाचीं सर्व कर्में प्रगट करील, आणि त्या कर्मांचें योग्य प्रतिफळ त्याला अशा प्रकारें लावील कीं, जसी आपणाविषयीं तसी दुसऱ्या सर्व बुद्धियुक्त प्राण्यांविषयींहि प्रत्येकाची खातरी होईल कीं आपणासीं व दुसऱ्या सर्व बुद्धियुक्त प्राण्यांसी जें कांहीं ईश्वराने केलें आहे, तें सर्व योग्य व यथान्याय आहे. तर याप्रमाणें सर्व पवित्र आणि अपवित्र दूत व सर्व मनुष्यें, यांसीं ईश्वराची जी सर्व वागणूक पहिल्यापासून झाली आहे, व शेवटीं जें प्रतिफळ त्यांस ईश्वर देतो, त्या सर्वांत ईश्वर अगदीं निर्दोष व न्यायवान आहे, असें सर्व बुद्धियुक्त प्राण्यांच्या खातरीस येण्याने, ईश्वराच्या सर्व गुणांचें गौरव दिसावें, आणि विशेषेंकरून प्रभु येशू जो मनुष्यरूपी देव त्याचें गौरव

उत्तम प्रकारें दिसून यावें; ह्मणून हा सार्वत्रिक न्याय होण्याचें अगत्य आहे.

प्र० ११. सर्व मनुष्यें व दूत यांचा न्याय प्रभु येशू ख्रीस्त कोणत्या नेमाने करील?

उ० ज्यांस ईश्वरी शास्त्राचें ज्ञान प्राप्त झालें होतें, त्यांचा न्याय तो ईश्वरी शास्त्रावरून करील. परंतु ज्यांस ईश्वरी शास्त्राचें ज्ञान प्राप्त झालें नव्हतें, त्यांचा न्याय तो शास्त्रावांचून ह्मणजे सृष्टिजन्य ज्ञानावरून करील; ह्मणजे आपल्या कर्त्तव्य कर्मांविषयींचें जितकें ज्ञान प्राप्त करण्याचीं साधनें व उपाय प्रत्येकास होते व तीं कर्त्तव्य कर्मं पाळण्याचीं जितकीं उत्तेजनें व जितक्या प्रेरणा प्रत्येकास मिळाल्या होत्या, त्यांप्रमाणें त्यांचा न्याय प्रभु येशू ख्रीस्त ठरवील. रोम. २: १२,१६.

प्र० १२. कशाविषयीं सर्व दूत व मनुष्यें यांचा न्याय केला जाईल?

उ० त्यांच्या सर्व कर्मांविषयीं त्यांचा न्याय केला जाईल. ज्या दुतानी आपली मुळची पवित्रता राखिली आणि ईश्वराच्या सर्व आज्ञा पाळिल्या त्यांचीं सर्व मानसिक कर्मे परिक्षलीं जाऊन त्यांची प्रशंसा केली जाईल. आणि ज्या दुतानी आपली मुळची पवित्रता राखिली नाहीं आणि ईश्वराच्या आज्ञा मोडून पाप केलें त्यांचींहि सर्व कर्मं परिक्षलीं जाऊन ते दोषी व दंडास पात्र असे ठरविले जातील. आणि मनुष्यजातींतील जे पश्चात्ताप न करितां व ख्रीस्तावर विश्वास न ठेवितां मेले, त्यांचीं सर्व मानसिक कर्मं परिक्षलीं जाऊन तेहि दोषी व दंडास पात्र ठरविले जातील. आणि ज्या मनुष्यानी आपल्या पापांचा पश्चात्ताप करून व

ख्रीस्तावर विश्वास ठेवून उद्धार मिळविला आहे, त्यांचीं सर्व कर्मे परिक्षलीं जाऊन ते न्यायीकृत व सर्वकाळिक जीवनास पात्र असे ठरतील. तरी दंडास पात्र ठरणाऱ्या मनुष्यांचीं सर्व पापें जसीं उघड करून परिक्षलीं जातील, तसींच उद्धार पावणाऱ्या मनुष्यांचींहि सर्व पापें उघड करून परिक्षलीं जातील. कारण उद्धार पावलेले व उद्धार न पावलेले या उभय प्रकारच्या मनुष्यांचीं बहुतेक मानसिक कर्मे एकमेकाच्या अशा निकट संबंधाने घडलेलीं आहेत, व तीं सर्व अशा प्रकारें एकांत एक गोवलेलीं आहेत कीं, एकाचीं कर्मे प्रगट करितांना दुसऱ्याचींहि प्रगट करणें भाग पडतें. आणि जे आपल्या पापाचा पश्चात्ताप करून व ख्रीस्तावर विश्वास ठेवून उद्धार पावले, त्यांजवर कृपा करून त्यांस तारण देण्यानें ईश्वराचा पवित्रपणा व न्यायीपणा कसा निर्बाध राहतो, आणि जे अपश्चात्तापी व अविश्वासी राहून आपल्या पापांत मरण पावले, त्यांस शासनांत घालण्याने ईश्वरास दोष कसा लागत नाहीं; हें सर्वांस दाखविण्यासाठीं आणि विशेषेंकरून उद्धार पावणाऱ्या मनुष्यांवर ईश्वराने जी अपूर्व कृपा केली, तिची संपत्ति सर्वांस दाखविण्यासाठीं, उद्धार न पावणाऱ्याचीं जसीं तसीं उद्धार पावणाऱ्यांचींहि सर्व पापें उघड करून परिक्षलीं जातील. आणि याप्रमाणें सर्व बुद्धियुक्त प्राण्यांच्या सर्व बऱ्या वाईट मानसिक कर्मांचा न्याय करून, प्रभु जो न्यायाधीश तो जेव्हां दुष्ट व अपश्चात्तापी यांस सर्वकाळच्या शासनांत घालील, आणि पश्चात्तापी व विश्वासणाऱ्या मनुष्यांस सर्वकाळचें जीवन देईल; तेव्हां त्याचें सर्व करणें अगदीं यथान्याय व उत्तम आहे असें सर्व बुद्धियुक्त प्राण्यांचें मन त्यांस

साक्ष देईल; ह्मणून ते सर्व कबूल करितील कीं त्या न्यायवान व श्रेष्ठ न्यायाधीशानें केलेले सर्व ठराव अगदीं यथान्याय व उत्तम आहेत. २ करिं० ५:१०. उप० १२;१४. लुका १२:२. मात्थी १२: ३६,३७. १ करिं० ४:५. प्रग० २०:१२,१३.

प्र० १३. सर्व बुद्धियुक्त प्राण्यांच्या सर्व मानसिक कर्मांचें परीक्षण झाल्यावर तो न्यायाधीश त्यांविषयीं कसे ठराव करून सांगेल?

उ० जे दुष्ट आहेत त्यांस तो सर्वकाळिक शासनांत जाण्याचा ठराव सांगेल. आणि जे नीतिमान व उद्धरलेले आहेत त्या सर्वांस तो सर्वकाळिक जीवनांत जाण्याचा ठराव करून सांगेल. याप्रमाणें सांगितलेले ठराव सर्व काळपर्यंत अपालट व स्थिर राहतील. ह्मणून त्या वेळेस जी अवस्था प्रत्येक दूत व प्रत्येक मनुष्य यास प्राप्त होईल तीच पुढें त्याची सर्वकाळिक आणि अढळ अवस्था असी होईल. मात्थी २५:३४,४१,४६.

प्र० १४. तर हा न्यायाचा समय सर्वांनी कसा मानावा?

उ० तो समय दुसऱ्या सर्व समयांहून, अत्यंत श्रेष्ठ, वैभवी, गंभीर, आणि चित्तवेधक समय असा मानावा. कारण कीं त्या समयीं सर्वांहून भारी आणि श्रेष्ठ गोष्टी घडतील. ह्मणजे त्या वेळेस काळाची समाप्ति होईल, अनंत काळाचा आरंभ होईल. प्रभु जो ख्रीस्त तो स्वतां आपल्या परिपूर्ण ईश्वरी तेजानें व वैभवानें येऊन आपल्या सामर्थ्यवान आद्य दुताच्या माहानादासुद्धां प्रगट होईल. आकाशें मोठ्या पडद्यासारिखीं गुंडाळलीं जातील, तत्वें मोठ्या तप्ततेनें जळून

विरघळतील. अधोलोकांतील सर्व मनुष्यें पुनरुत्थान पावतील; आणि सर्व देश भाषा जाती आणि लोक यांतील सर्व मनुष्यें हीं सर्व पवित्र व अपवित्र दुतांसहवर्त्तमान अत्यंत मोठ्या समूहांत एकत्र केलीं जाऊन, आपल्या कर्मांच्या प्रतिफळाविषयींचा सर्वकाळिक व अपालट ठराव समजून घेण्यासाठीं तटस्थ उभीं ठाकतील. प्रभु येशू ख्रीस्त हा आपल्या वैभवी न्यायासनावर बसून सर्व बुद्धियुक्त प्राण्यांस सर्वकाळिक व अपालट अवस्था नेमून देईल. आणि जे पवित्र व उद्धार पावलेले आहेत, त्यांचें सर्वाहून श्रेष्ठ गौरव व सुख आणि जे अपवित्र व दुष्ट आहेत त्यांची अत्यंत मोठी लज्जा, पामरपण आणि क्लेश, हीं आरंभून पुढें सर्वकाळपर्यंत वाढत वाढत जातील; ह्मणून तो समय दुसऱ्या सर्व समयांहून अत्यंत थोर व गंभीर मानावा हें योग्य आहे.

प्र० १५. जीं मनुष्यें हा सिद्धांत ऐकतात किंवा समजतात त्यानी काय करावें?

उ० सर्वकाळिक जीवनांत जाण्यास योग्य होण्यासाठीं, ह्मणजे त्या मोठ्या न्यायदिवसीं ईश्वराची कृपा व प्रसन्नता पावायास योग्य होण्यासाठीं जें कांहीं करणें अवश्य आहे तें सर्व करण्यास त्यानी मोठ्या तत्परतेने व अगत्याने झटावें. २ पेत्र. ३:१०,११.

---

## प्रकरण २३.

# मरणोत्तर सुखावस्था.

प्र० १. जे सद्भक्त आहेत, त्यांस मरणोत्तर सुखावस्था प्राप्त व्हावयाची आहे, हें कशावरून समजलें आहे?

उ० ईश्वरी शास्त्रावरून समजलें आहे, कारण शास्त्रामध्यें बहुत ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे कीं, जे नीतिमान आहेत त्यांस मरणोत्तर सुखावस्था प्राप्त व्हावयाची आहे. मात्थी २५:३४. प्रग० ३:२१. १४:१३. गीत १६:११.

प्र० २. ही सुखावस्था किती काळपर्यंत राहील?

उ० सर्वकाळपर्यंत राहील. ह्या अवस्थेचा शेवट कधींच व्हावयाचा नाहीं. मात्थी २५:४६. १ थेस० ४:१७.

प्र० ३. जे सद्भक्त आहेत, ते मरणानंतर कोठें राहतील?

उ० दिव्यलोकीं ह्मणजे ज्या ठिकाणीं ईश्वर आपल्या भक्तांसहवर्त्तमान विशेषेंकरून राहतो, त्या स्थानीं राहतील. त्या स्थानाला शास्त्रामध्यें आकाश किंवा तिसरें आकाश, किंवा आकाशावरलें आकाश असें ह्मटलें आहे. मात्थी २४:३६. २ करिं० १२:२. १ राजे ८:२७.

प्र० ४. दिव्यलोक हें खरोखर स्थान आहे, किंवा केवळ एक प्रकारची स्थिति मात्र आहे?

उ० तो खरोखर स्थान आहे असें शास्त्रांत स्पष्ट दर्शविलें आहे. दिव्यलोकाविषयीं वर्णन करितांना, त्यांला सौख्यलोक, ईश्वराने बांधलेली इमारत, जियोन डोंगर, नगर, राज्य, अधिक चांगला देश, आकाशांतील यरूशलेम, इ० ज्या संज्ञा लाविल्या आहेत त्यांवरून तो लोक खरोखर स्थान आहे असें उघड दिसतें. आणि ज्यापेक्षां प्रभु येशू ख्रीस्त व सर्व उद्धार पावलेलीं मनुष्यें हीं आपल्या पुन्हा उठलेल्या देहांसुद्धां तेथें राहावयाचीं आहेत, त्यापेक्षां तो दिव्यलोक खरोखर स्थान असावाच, कारण कीं

जे सदेह आहेत, त्यांस राहण्यासाठीं खरोखर स्थानच अवश्य पाहिजे. इब्री ११:१६. १२:२२,२३. लुका २३: ४३. २करिं०५:१. मात्थी २५:३४.

प्र० ५. जे दिव्यलोकवास पावतात त्यांची अवस्था कसी होती?

उ० पृथ्वींतील व नरकांतील दुष्ट प्राण्यांचे पापमोह त्यांस पुन्हा कधीं लागणार नाहींत. परंतु ते आपल्या सर्व अंतःकरणाने व वर्त्तणुकीने ईश्वरानुरूप होऊन पूर्ण सुखी असे राहतील. १ योहा० ३:२. १ करिं० १३: १२. प्रग० ७:१६,१७. गीत १६:११.

प्र० ६. दिव्यलोकांत राहणाऱ्यांचें सुख कोणत्या प्रकारचें आहे?

उ० तें निश्चेष्ट व निष्क्रिय अवस्थेचें नव्हे, व दैहिक विषयभोगांचेंहि नव्हे, परंतु चैतन्य व सक्रिय अवस्थेचें आणि आत्मिक व पवित्र उपभोगांचें असें आहे. जे दिव्यलोकवास पावतात ते ईश्वरपणांतील बाप पुत्र व पवित्र आत्मा यांच्या समक्षपणांत राहून त्याचा गौरवी व सुखकारक सहवास व प्रीति यांचा निरंतर उपभोग घेतात. आणि ते आपण ईश्वराची भक्ति, प्रीति आणि सेवा सर्वदा करितात, व ईश्वराचे गुण व त्याने केलेली उत्पत्ति व तिजमध्यें चाललेलें त्याचें ईश्वरी सूत्र यांविषयीं, आणि ख्रीस्ताचे गुण व त्याने केलेलें तारणोपायाचें काम यांविषयीं, आणि पवित्र आत्म्याचे गुण व कामें यांविषयीं निरंतर अभ्यास करितात. अणखी आकाशवासी सर्व भक्तांचा स्वभाव, इच्छा, कामें, आणि उपभोग हीं एकच प्रकारचीं असतां, ते सर्व तेथें एकमेकांस ओळखितात, एकमेकांवर

प्रीति करितात आणि एकमेकांचें साह्य करितात. आणि एकमेकांस प्रिय भाऊ असें मानून एकमेकांच्या सहवासाने मोठें सुख पावतात. प्रग० ७:१५. २२:३. ५:९,१०,१३.

प्र०. ७. दिव्यलोकांत राहणाऱ्या सर्व भक्तांचे सद्गुण आणि सुख यांचें परिमाण एकसारिखेंच आहे कीं काय?

उ० नाहीं, त्यांचे सद्गुण आणि सुख यांच्या परिमाणामध्यें भेद आहे. ह्मणजे जे उद्धार पावलेले आहेत, ते सर्व जरी आपापल्या परीं पूर्ण पवित्र आणि पूर्ण सुखी असे आहेत, तरी त्यांतील प्रत्येकाचे सद्गुण व सुख, यांच्या परिमाणाची परस्पर तुलना करून पाहिल्यास, एकाचे सद्गुण व सुख, दुसऱ्याचे सद्गुण व सुख यांहून कमी किंवा अधिक परिमाणाचे आहेत असें दिसेल. कारण ह्या आयुष्यांत असतां, प्रत्येक भक्ताने जसे आपले सद्गुण कमी किंवा अधिक वाढविले असतील व जसें ईश्वराचें गौरव कमी किंवा अधिक केलें असेल, तसे कमी किंवा अधिक परिमाणाचे सद्गुण त्याच्या ठायीं दिव्यलोकींहि होतील; आणि अर्थातच त्याचें सुखहि त्याच परिमाणाने कमी किंवा अधिक होईल.

प्र० ८. दिव्यलोकांत राहणाऱ्या भक्तांचें ज्ञान सद्गुण आणि सुख हीं सर्वकाळपर्यंत वाढत जातील कीं काय?

उ० होय, तीं निरंतर वाढत जातील हें संभाव्य दिसतें. आणि जर त्यांचें ज्ञान, सद्गुण व सुख हीं निरंतर वाढत गेलीं, तर कालांतराने असेंहि होईल कीं, हालीं पवित्र दूत हे उद्धार पावलेल्या मनुष्यांहून जितके श्रेष्ठ

आहेत, तितके उद्धार पावलेले मनुष्यहि, पवित्र दुतांच्या हाल्लींच्या अवस्थेहून श्रेष्ठ अवस्थेचे होतील यांत कांहीं संशय नाहीं. तथापि जसीं दिव्यलोकांत राहणारीं मनुष्यें ज्ञान सद्गुण व सुख यांविषयीं नेहमीं वाढत जातील तसेच पवित्र दूतहि वाढत जातील, ह्मणून दिव्यलोकांत राहणारीं मनुष्यें कितीहि वाढलीं, तरी तीं दुतांच्या बरोबरीचीं कदापि होणार नाहींत हें उघडच आहे.

प्र० ९. विधर्मी लोकांच्या शास्त्रांत वर्णिलेला सौख्यलोक आणि ख्रिस्ती शास्त्रांत वर्णिलेला सौख्यलोक यांमध्यें काय भेद आहे?

उ० विधर्म्यांच्या शास्त्रांत वर्णिलेल्या सौख्यलोकामध्यें जे जातात, ते जसे ह्या आयुष्यांत तसे तेथेंहि अशुद्ध व भ्रष्ट कर्में करितात आणि दैहिक व पापिष्ठ सुखांचा उपभोग घेतात आणि आपला पुण्यांश सरे तोंवर तेथें राहून पुन्हा पृथ्वीवर टाकले जातात; असें सांगितलें आहे. यास्तव त्यांचा सौख्यलोक मृत्युलोकाहून फारसा वेगळा नाहीं. परंतु ख्रिस्ती शास्त्रांत वर्णिलेल्या दिव्यलोकांत जे जातात, ते तेथें केवळ शुद्ध व पवित्र कर्में करितात आणि आत्मिक व पवित्र सुखांचा उपभोग घेतात. आणि ते आपल्या पुण्यानें तो दिव्यलोकवास पावले नाहींत, परंतु तारणाऱ्याच्या पुण्याने पावले. आणि त्या तारणाऱ्याचें पुण्य अक्षय व पूर्ण आहे, ह्मणून ते तेथें सर्वकाळपर्यंत राहतील; असें ख्रिस्ती शास्त्रांत सांगितलें आहे. यावरून उघड दिसतें कीं ख्रिस्ती शास्त्रांत वर्णिलेला सौख्यलोक खरा व सर्वोत्कृष्ट आहे. आणि विधर्म्यांच्या शास्त्रांत वर्णिलेला सौख्यलोक खोटा व कल्पित आहे.

प्र० १०. किती मनुष्यें दिव्यलोकांतील सुखावस्था पावतील?

उ० असंख्य मनुष्यें ही सुखावस्था पावतील असें शास्त्रामध्यें दर्शविलें आहे. जलप्रलयापूर्वीं बहुत मनुष्यें तारण पावलीं, आणि मोश्याच्या व्यवस्थेमध्यें त्यांहून अधिक मनुष्यें तरलीं; आणि ख्रिस्ती व्यवस्थेमध्यें तर सर्वांहून अधिक मनुष्यें तारलीं जात आहेत. आणि पुढें ख्रीस्ताच्या राज्याच्या सहस्रकामध्यें जे तारण पावतील, त्या सर्वांची संख्या पूर्वीं सांगितलेल्या तीन काळांतील तारण पावलेल्यांच्या संख्येहून अतिशय होईल; ह्मणून जीं सर्व मनुष्यें तारण पावतात, त्यांची संख्या अत्यंत मोठी होईल, यांत कांहीं संशय नाहीं. यावरून असें अनुमान होतें कीं, नाश पावणाऱ्या एकंदर मनुष्यांच्या संख्येपेक्षां, तारण पावणाऱ्या एकंदर मनुष्यांची संख्या फार मोठी होईल. प्रग० ७:९.

प्र० ११. जे खरे ईश्वरभक्त आहेत त्यांच्या मरणावरून आह्मास कशा भावना व्हाव्या?

उ० मरणाने त्यांचें कांहीं अनहित झालें आहे असें समजल्यासारिखा शोक आह्मी त्यांविषयीं करूं नये. आणि त्यांचा आह्मापासून वियोग झाल्यामुळें जरी आह्मास दुःख वाटलें, तरी ते उत्तम व पूर्ण सुखावस्थेंत गेले आहेत असें मनांत आणून आह्मास समाधान व्हावें. आणि आह्मास त्यांच्या सारिखें मरण प्राप्त व्हावें व आमचा परिणाम त्यांच्या सारिखा सुखावह व्हावा, ह्मणून त्यांच्या सारिख्या नीतिमत्वाने व धार्मिकपणाने वागण्याचें उत्तेजन

व बोध आह्मास त्याच्या मरणावरून व्हावा हेंच योग्य आहे. फिली० १:२१. गण० २३:१०.

---

## प्रकरण २४.

## मरणोत्तर दुःखावस्था.

प्र० १. दुष्टांस ह्मणजे अपश्चात्तापी मनुष्यांस मरणानंतर दुःखावस्था प्राप्त होती हें कशावरून समजलें आहे?

उ० (१) पवित्र शास्त्रांत अनेक ठिकाणीं अगदीं स्पष्ट व निर्धाराने सांगितलें आहे कीं, जे अपश्चात्तापी असतां मरतात ते सर्वकाळिक दंडांत जातात. योहा० ५:२९. मार्क १६:१६. गीत ९:१७. नीति ११:७. योहा० ३:३६. फिलि० ३:१९. मात्थी २५:३०. ७:१३. नीति १:३१. (२) मोशे भविष्यवादी ख्रीस्त आणि प्रेषित यांच्या उपदेशाचा जो मोठा विरोध त्यांच्या ऐकणाऱ्यांतील अपश्चात्तापी मनुष्यानी केला त्यावरून प्रमाण पटतें कीं, अपश्चात्तापी मनुष्यांस परलोकीं दंड लागेल हा सिद्धांत त्यानी शिकविला. कारण कीं पश्चात्तापी आणि अपश्चात्तापी असीं सरसगट सर्व मनुष्यें तारण पावतील असें जर त्यानी शिकविलें असतें तर त्यांच्या उपदेशाचा एवढा मोठा विरोध आणि अव्हेर कोणी केला नसता. अणखी (३) ख्रीस्त व प्रेषित यांचा उपदेश ऐकणाऱ्यांतून बहुतांनी परलोकीं होणारा दंड चुकवून आपलें तारण साधावें ह्मणून मोठी उत्कंठा व अगत्य बाळगिलें. त्यावरूनहि प्रमाण पटतें कीं त्यानी हा सिद्धांत शिकविला. अणखी (४) मोशे भविष्यवादी ख्रीस्त व प्रेषित यानी या पृथ्वीवर असतां

मनुष्यांच्या आत्म्यांची जी अत्यंत मोठी कळकळ बाळगिली, व लोकानी झटून आपलें तारण साधून घ्यावें ह्मणून त्यांस बोध व उत्तेजन देण्यासाठीं जे पराकाष्ठेचे श्रम केले, व दुःखें आणि छळणुका सोसिल्या त्यांवरून अगदीं स्पष्ट सिद्ध होतें कीं, अपश्चात्तापी पाप्यांस परलोकीं मोठी दुःखावस्था प्राप्त होईल, असा त्या उपदेशकांचा पूर्ण विश्वास होता.

प्र० २. ईश्वर दुष्टांस परलोकीं दंड ह्मणजे शासनरूप पिडा कशासाठीं लावितो ?

उ० (१) त्याचें एक कारण असें आहे कीं ते आपल्या पापामुळें दंडपात्र झालेले आहेत. (२) दुसरें कारण असें आहे कीं, त्यांस दंड करणें हें सार्वत्रिक हितासाठीं अवश्य आहे. कारण ईश्वरास पापाचा द्वेष आणि पवित्रतेची आवड आहे आणि त्याच्या आज्ञा सर्वांनी मानल्या पाहिजेत, आणि त्याचा अधिकार कोणाच्याने आपणावरून काढवत नाहीं; हें अपश्चात्तापी पाप्यांस दंड लावल्यावांचून, कोणास समजणार नाहीं. आणि हें सर्वांस चांगल्या प्रकारें समजल्यावांचून सृष्टीचें वास्तविक हित होणार नाहीं ही गोष्ट उघड आहे. यास्तव आपला नीतिसंबंधी अधिकार निर्दोष राखण्यासाठीं आणि सृष्टीचें श्रेष्ठ व मुख्य हित साधण्यासाठीं ईश्वर दुष्टांस योग्य दंड करितो.

प्र० ३. जे दुष्ट आहेत त्यांस नरकांतील सर्वकाळच्या यातनानी पिडण्याकडून ईश्वर निर्दय किंवा निष्ठूर ठरतो कीं काय ?

उ० अगदीं नाहीं. आमच्या पापामुळें जीं अनेक दुःखें ईश्वर आह्मास ह्या आयुष्यांत लावीत असतो, त्यांवरून

जर ईश्वर निर्दय ठरत नाहीं, तर परलोकीं आमच्या पापाचा योग्य व पूर्ण दंड आह्मास लाविल्याने तो कसा निर्दय ठरेल? जगांतील अधिकाऱ्यानी प्रजेंतील दुष्टांस योग्य दंड केल्यावरून ते निर्दय आहेत असें कोणास वाटत नाहीं. पण त्यानी दुष्टांस योग्य दंड न लाविल्यास मात्र ते निर्दय आहेत असें सर्वांस वाटतें. तसेंच ईश्वराने अपश्चात्तापी दुष्टांस नरकांतील दंड लाविल्यावरून तो निर्दय ठरत नाहीं, परंतु फार दयाळू व न्यायी आहे असेंच ठरतें. कारण कीं दुष्टांस योग्य दंड लाविल्यावांचून सृष्टीचें वास्तविक आणि मुख्य कल्याण होणार नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे.

प्र० ४. जे मरणोत्तर दुःखावस्थेंत पडतात ते त्या अवस्थेंत किती कालपर्यंत राहतील?

उ० आमच्या विवेकावरून आह्मास समजतें कीं अनंत थोर ईश्वराच्या प्रसन्नतेचें फळ जें सुख तें जसें अनंतकालिक आहे, तसेंच अनंत ईश्वराच्या अप्रसन्नतेचें फळ जें दुःख तेंहि अनंतकालिक असावें, हें योग्यआहे. अणखी जे अपश्चात्तापी असतां मरतात त्यांचा स्वभाव जो भ्रष्ट व पापिष्ठ आहे तो पुढें सर्वकाळपर्यंत तसाच राहील, ह्मणून ते मरणानंतर पुढेंहि सर्वकाळपर्यंत पाप करीत जातील असें दिसतें. आणि जोंवर ते पाप करीत जातील तोंवर ईश्वराने त्यांस दंड करीत जावें, हें यथान्याय आहे. यावरून अनुमान होतें कीं, दुष्टांची मरणोत्तर दुःखावस्था सर्वकाळपर्यंत राहील. तथापि नुसतें आमच्या विवेकाच्या ठरावावरूनच याविषयींचा सिद्धांत होतो असें नाहीं. कारण स्वतां ईश्वराने आपल्या शास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे

कीं, जे दुष्ट आहेत त्यांस मरणानंतर सर्वकाळपर्यंत दंड भोगावा लागेल. यास्तव जे अपश्चात्तापी असतां मरतात ते पुढें सर्वकाळपर्यंत नरकयातना भोगतील, असा विश्वास धरणें आह्मास योग्य आहे. मात्थी २५:४६. २६:२४. २ थेस० १:९. प्रग० १४:११. दानी० १२:२. मार्क ३:२९. (अणखी ९ व्या प्रश्नाखालीं लिहिलेलीं शास्त्रवाक्यें पाहावीं.)

प्र० ५. जीं मनुष्यें अपश्चात्तापी असतां मरतात तीं मरणोत्तर दुःखावस्थेंतील ह्मणजे नरकांतील पीडा नियमित काळ भोगल्यावर सुधरून ह्मणजे पवित्र होऊन ईश्वरी प्रसन्नतेस पात्र होतात, असें जें मत कित्येक लोक धरितात तें खरें आहे कीं काय?

उ० तें अगदी खोटें आहे. कारण (१) हें आयुष्य मात्र परीक्षेच्या अवस्थेचा ह्मणजे मरणोत्तर स्थितीच्या तयारीचा काळ आहे. आणि जसा कोणी मरणापूर्वी असेल तसा तो मरणानंतर सर्वकाळपर्यंत राहील असें शास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे. लुका १६:२२–२६. प्रग० २२:११. उप० ९:१०. अणखी (२) ह्या जगांत जीं दुःखें मनुष्यांस लागतात त्यांतील बहुतेक जरी त्यांच्या शिक्षणार्थ ह्मणजे सुधारणुकीसाठीं असतात खरीं, तरी पापी मनुष्यें मरणोत्तर स्थितीमध्यें असतां ज्या नरकयातना त्यांस लागतात त्या त्यांस सुधारण्यासाठीं नसतात; पण त्यांच्या पापाचें योग्य व यथान्याय प्रतिफळ जें सर्वकाळिक नाश असें आहे तें त्यांस भरून देण्यासाठीं लागतात, असें शास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे. योहा० ५:२९. रोम २:६–१०. मात्थी २५:४१,४६. यास्तव अपश्चात्तापी असतां मरतात असे

जे मनुष्य त्यांतून कोणी पुन्हा पवित्र होऊन ईश्वरी कृपेस पात्र होणें, ही गोष्ट कधीं घडायाची नाहीं. जे एकदां नरकयातनांत पडतात ते सर्वकाळपर्यंत तेथें राहून ईश्वराची अप्रसन्नता भोगतील.

प्र० ६. जीं मनुष्यें अपश्चात्तापी असतां मरतात आणि नरकांतील यातनांमध्यें घातलीं जातात, तीं तेथें क्लेश व यातना भोगितां भोगितां कांहीं काळाने नष्ट होतील, ह्मणजे नाहींसीं होऊन जातील, असें जें मत कोणी कोणी धरितात त्यास कांहीं आधार आहे कीं काय ?

उ० त्या मतासहि कांहीं आधार नाहीं. कारण मनुष्यांचे आत्मे अमर आहेत आणि जगाच्या समाप्तीस ह्मणजे शेवटील दिवसीं सर्व मनुष्यांचे देह पुन्हा उठून त्यांच्या आत्म्यांसीं संयुक्त होतील; आणि जे नीतिमान आहेत ते पुढें सदेह असतां सर्वकाळिक सुखावस्थेंत आणि जे अन्यायी आहेत तेहि पुढें सदेह असतां सर्वकाळच्या दुःखावस्थेंत राहतील, असें शास्त्रामध्यें स्पष्ट सांगितलें आहे. प्रकरण २० वें व २१ वें पाहा.

प्र० ७. दुष्टांच्या मरणोत्तर दंडाचें वर्णन शास्त्रामध्यें कसें केलें आहे ?

उ० मरण, कधीं न मरणारा किडा, अथांग खांच, अंधार, निबीड अंधार, अंधाराची सर्वकाळिक निबिडता, अग्नि आणि गंधक यांचा डोह, जो अग्नि कधीं विझणार नाहीं तो, सर्वकाळचा अग्निदंड भोगणें, अग्नीची भट्टी, सैतान आणि त्याचे दूत यांसाठीं सिद्ध केलेला अग्नि; अशा अतिभयंकर आणि चित्तवेधक शब्दानीं व वाक्यानीं दुष्टांच्या मरणोत्तर दंडाचें वर्णन केलें आहे. ह्या वर्णनांत

योजिलेलीं बहुतेक वाक्यें व शब्द जरी केवळ लाक्षणिक आहेत; तरी नरकांतील यातनांचें वर्णन ह्या जगांतील सर्वांहून क्लेशकारक व भयंकर अशा पदार्थांच्या उपमांकडून करण्याने हेंच दर्शविलें आहे कीं, नरकांतील यातना अत्यंत दारुण व पराकाष्ठेच्या भयंकर व दुःसह आहेत. आणि अशा दुःसह यातना मनुष्याच्या हालींच्या प्रकृतीने एक घटकाभर देखील सोसवणार नाहींत हें खरें. तरी मरणोत्तर स्थितीमध्यें ज्या नव्या आणि अमर ह्मणजे सर्वकाळ टिकून राहणाऱ्या प्रकृतीने दुष्ट मनुष्यें राहतील त्या प्रकृतीने ते नरकांतील पराकाष्ठेच्या आणि अत्यंत क्लेशदायक यातना भोगण्यास समर्थ होतील. ह्मणजे त्या अवस्थेंत त्यांचीं दुःखें भोगण्याची समाव इतकी वाढेल कीं, जीं अनंत व दारुण दुःखें ईश्वर त्यांस लावील तीं सर्व त्यांच्या ठायीं समावतील, आणि त्यांकडून होणारे संपूर्ण क्लेश ते सर्वकाळपर्यंत भोगतील.

प्र० ८. मरणोत्तर दुःखावस्थेमध्यें ह्मणजे नरकयातनांमध्यें पडणाऱ्या सर्व दुष्टांला जो दंड लागेल तो एकसारिखाच होईल, किंवा त्यांमध्यें कांहीं भेद होईल?

उ० नरकयातनांमध्यें पडणाऱ्या सर्व दुष्टांला जो दंड लागेल त्याचा प्रकार एकसारिखाच होईल. तरी तेथील प्रत्येकाला लागणाऱ्या दंडाचें परिमाण वेगळालें होईल. ह्मणजे ह्या आयुष्यांत असतां ज्याने जसें व जितकें अधिक किंवा कमी दुष्टपण केलें असेल, तसा कमी किंवा अधिक परिमाणाचा दंड त्याला नरकवासामध्यें लागेल. जसे दोन आजारी मनुष्यांस एकच प्रकारचा रोग लागला असतांहि, एकाचा आजार दुसऱ्याहून अधिक

तीव्र व कठीण असून त्यास त्याच रोगानें दुसऱ्याहून अधिक पीडा व व्याकुळता होण्याजोगी आहे, किंवा जसें एकच प्रकारचें वीष खाणाऱ्यांमध्यें, ज्यानें तें अधिक खाल्लें असेल त्यास अधिक पिडा व्हावी आणि ज्यानें तें कमी खाल्लें असेल त्यास कमी पिडा व्हावी हें संभाव्य आहे; तसेंच जरी नरकवासी सर्व जनांच्या यातना एकच प्रकारच्या आहेत, तरी ज्यानें अधिक दुष्टपण केलें असेल त्यास तेथें अधिक दुःख लागावें आणि ज्यानें त्याहून कमी दुष्टपण केलें असेल त्यास तेथें कमी दुःख लागावें हें संभाव्य आहे. यास्तव नरकवासी प्रत्येक दुष्टाला जो दंड लागेल तो ज्याचा त्याला आपआपल्या परी अतिशय आणि पराकाष्ठेचा कठीण व दुःसह असा वाटेल; तरी एकाचा दुसऱ्याच्याशीं लावून पाहिल्यास परिमाणाविषयीं कोणाचा अधिक व कोणाचा कमी असा दिसेल, यांत कांहीं संशय नाहीं. २ करिं० ५:१०. प्रग० २०:१३. रोमे० २:६.

प्र० ९. मरणोत्तर दुःखावस्थेमध्यें ज्या दुष्ट पीडा दुष्ट मनुष्यांस लागतात त्या मानसिक आहेत किंवा शारीरिक आहेत?

उ० त्या मानसिक व शारीरिक अशा उभय प्रकारच्या आहेत. कारण मनुष्यानें ह्या आयुष्यांत असतां जीं पापें केलीं, तीं शरीर आणि आत्मा हीं संयुक्त असतां केलीं. यास्तव त्या पापाचें प्रतिफळहि त्यानें शरीर व आत्मा हीं संयुक्त असतां भोगावें हें योग्य दिसतें. केवळ मध्यस्थित अवस्थेमध्यें ह्मणजें, मरणाच्या काळापासून शरिराच्या पुन्हा उठण्याच्या काळापर्यंत मात्र तो विदेही आत्म्यानें आपलें प्रतिफळ भोगील. परंतु शेवटील न्यायदिवसा-

पासून पुढें सर्वकाळपर्यंत तो आत्मा व शरीर या उभयतांकडून आपल्या पापाचें प्रतिफळ भोगीत राहील, असें शास्त्रांतील अनेक वाक्यांवरून स्पष्ट दिसतें. दुष्टांच्या दंडाविषयीं जें वर्णन शास्त्रांत आहे तें जरी लाक्षणिक दृष्टांतानी केलें आहे, तरी तो दंड मानसिक व शारीरिक अशा उभय प्रकारचा आहे, असें त्या दृष्टांतांवरूनहि अनुमान होतें. तथापि त्यांच्या प्रतिफळाचा मुख्य व मोठा भाग मानसिक यातनांचा होईल. आणि आत्मा व शरीर हीं संयुक्त असतां जीं मोठीं व अनिवार दुःखें आत्म्यास लागतील, त्यांवरून शरिराचीं दुःखें अतिशय वाढतील. आणि याप्रमाणें झाल्याने त्यांचा आत्मा व शरीर या उभयांच्या यातना अत्यंत वृद्धिंगत होतील. दुष्टांच्या मानसिक दुःखांचे मुख्य उद्गम ह्मणजे कारणें येणेंप्रमाणें होतील. (१) आपण अत्यंत पातकी व दुष्ट असतां केवळ दंड मात्र पावण्यास योग्य आहों असी जी मनोमय खातरी त्यांच्या मनामध्यें उत्पन्न होऊन सर्वकाळपर्यंत राहील ती त्यांच्या मानसिक यातनांचा एक उद्गम होईल. (२) अणखी ते स्मरतील कीं, आह्मी जगांत असतां ईश्वराने दया करून आपल्या शास्त्रद्वारें व आपल्या सूत्राकडून व आपल्या पवित्र आत्म्याच्या सूचनांकडून आह्मास वारंवार बोध केला कीं, तुह्मी पाप सोडून मजकडे फिरा ह्मणजे मी तुह्मास तारीन; तसेंच ईश्वराचे उपदेशक, शुभवार्त्तिक व दुसरे सद्भक्त यानींहि आह्मास फार ममतेने व आग्रहाने बोध केला कीं, तुह्मी आपल्या पापाचा पश्चात्ताप करून व ख्रीस्तावर विश्वास ठेवून आपला उद्धार साधून घ्या; तेव्हां जर आह्मी ते बोध अंगीकारिले असते

तर आह्मास तारण मिळण्याजोगें होतें. परंतु आह्मी अविचाराने व कृतघ्नतेने ते बोध अव्हेरिले, ह्मणून आतां आह्मास तारण प्राप्त करून घेण्याचा प्रसंग राहिला नाहीं. यास्तव आतां आह्मास नरकांतील अघोर व दारूण क्लेश सर्वकाळपर्यंत भोगीत राहिलें पाहिजे; असें मनांत आणून ते मोठ्या निराशेमध्यें बुडतील. आणि ही निराशा त्यांच्या यातनांचा दुसरा मोठा उद्गम होईल. (३) अणखी ख्याली, खुशाली, मौजा आणि सर्व प्रकारचीं विषयसुखें यांचा उपभोग घेण्याविषयींच्या ज्या अनिवार वासना आणि इच्छा ह्या आयुष्यांत असतां त्यानी बाळगिल्या, त्यांची पूर्त्तता ह्या आयुष्यांत कधीं झाली नव्हती व पुढें तर अगदींच होणार नाहीं, हें पाहून त्यांस जी मोठी अतृप्तता व असंतुष्टता होईल ती त्यांच्या यातनांचा अणखी एक उद्गम होईल. (४) सैतान व त्याचे दूत आणि सर्व अपश्चात्तापी दुष्ट मनुष्यें हीं नरकवासी जनांचे सोबती होतील. आणि ह्या सोबत्यांचा स्वभाव असा आहे कीं, एकमेकांस निरंतर पीडा व त्रास दिल्ह्यावांचून राहूंच नये. तरी नरकांतील यातनांमध्यें जे पडतात त्यांना ह्या दुष्ट सोबत्यांची संगत एक क्षणभर देखील सोडितां येणार नाहीं. ह्मणून तेथील दुष्ट सोबती हे त्यांच्या यातनांचा अणखी एक उद्गम होतील. (५) अणखी सर्व नरकवासी दुष्ट प्राणी जाणतील कीं, आह्मी परीक्षेच्या अवस्थेंत असतां जीं सर्व पापें व दुष्टपणें आह्मी केलीं तीं, व जीं दुःखें व दंड तेव्हां आह्मी भोगिले व आतां भोगीत आहों ते सर्व, ईश्वर आपल्या भक्तांच्या कल्याणास आणि आपल्या गौरवास उत्तम प्रकारें साधक असे करून घेतो.

ह्मणून ईश्वराचा व त्याच्या भक्तांचा द्रोह करून त्यांस त्रासविण्याच्या उद्देशाने ज्या सर्व गोष्टी आह्मी केल्या त्यांकडून त्याचें तिळमात्रहि वास्तविक अनहित झालें नाहीं, हें पाहून जी चुटपूट व खुरखूर त्यांच्या मनांत सर्वदां होत जाईल ती त्यांच्या यातनांचा अणखी एक उद्‍गम होईल. (६) अणखी ते पाहतील कीं ईश्वराच्याजवळ राहण्याने परिपूर्ण व अत्यंत मोठें सुख प्राप्त होतें, परंतु आपण त्याजपासून दूर घालविलेले आहों आणि पुढें कधींहि आमचें त्याच्याजवळ राहणें होणार नाहीं, ही गोष्ट त्यांच्या यातनांचा अणखी एक उद्‍गम होईल. (७) अणखी ते पाहतील कीं जे पृथ्वीवर असतां सद्भक्त झाले ते आतां आकाशामध्यें उत्कृष्ट आणि सर्वकाळिक सुख भोगीत आहेत. परंतु त्यांचा स्वभाव अत्यंत मत्सरी आणि परदुःखसंतोषी असतां सद्भक्तांची सुखी अवस्था पाहून त्यांस मोठें दुःख वाटेल. यास्तव सद्भक्तांस आकाशांतील सुखें भोगतां पाहणें, हा त्यांच्या यातनांचा अणखी एक उद्गम होईल. (८) परंतु त्यांच्या अंतःकरणांचें अत्यंत मोठें दुष्टपण द्रोहकपण व पापिष्ठपण हीं असीं पराकाष्ठेचीं अनिवार होतील कीं तींच त्यांच्या अक्षय नरकयातना व क्लेश यांचा मोठा उद्‍गम होऊन राहतील. (९) आणि या सर्वांवर ईश्वराचा अति संतप्त क्रोधाग्नि निरंतर वर्षत असतां त्यांचे क्लेश व यातना अपार व पराकाष्ठेचे दुःसह होतील. मात्थी २५:४१. १३:३०,४०,४१,४२,४९,५०. ३:१२. प्रग० १९:२०. २०:१०,१४,१५. २१:८. १४:१०. मार्क ९:४३,४४. यशा० ३३:१४. गीत ११:६. २ थेस० १:९. दानी० १२:२.

प्र० १०. नरकलोक हें खरोखर स्थान आहे किंवा केवळ स्थिति मात्र आहे ?

उ० तें खरोखर स्थान आहे असें शास्त्रांतील अनेक वाक्यांवरून उघड दिसतें. आकाशलोक हें खरोखर स्थान आहे याविषयीं जीं प्रमाणें २३ व्या प्रकरणाच्या चवथ्या प्रश्नांत दाखविलीं आहेत त्यांतील बहुतेक प्रमाणें नरकलोक खरोखर स्थान आहे हें सिद्ध करण्याच्याहि उपयोगीं पडतात.

प्र० ११. प्रभु येशू ख्रीस्ताने सर्व जगासाठीं तारणोपाय केला आहे, ह्मणून सर्वच मनुष्यें तारण पावतील, ह्मणजे जे पश्चात्ताप करून ख्रीस्तावर विश्वास ठेवितात ते, आणि जे पश्चाताप करीत नाहींत व ख्रीस्तावर विश्वास ठेवीत नाहींत ते सर्व सरसकट तारण पावतील, असें मत कित्येक लोक धरितात, तें योग्य आहे कीं काय ?

उ० नाहीं. तें मत अगदी खोटें आणि नाशकारक आहे. कारण कीं (१) हें मत अगदीं शास्त्राविरुद्ध आहे. सर्व सरसगट तारण पावतील असें शास्त्रांत कोठेंहि सांगितलें नाहीं. परंतु जे आपलें पाप सोडणार नाहींत व ख्रीस्तावर विश्वास ठेवणार नाहींत ते नाश पावतील असें स्पष्ट सांगितलें आहे. (२) जसें अन्न एका गांवांतील सर्व लोकांस मिळण्याजोगें व पुरण्याजोगें तयार झालेलें असल्यावरून त्या गांवच्या सर्व मनुष्यांची भूक तृप्त होईल असें नाहीं. परंतु त्यांतील जे तें अन्न भक्षितील त्यांचीच भूक तृप्त होईल; तसेंच ख्रीस्ताने केलेला तारणोपाय जगांतील सर्व मनुष्यांस मिळण्याजोगा व पुरण्याजोगा जरी आहे, तरी जे कोणी तो तारणोपाय योग्य

प्रकारें अंगीकारितील, तेच तारण पावतील. आणि जे तो तारणोपाय अंगीकारणार नाहींत ते नाश पावतील, हें उघड आहे. (३) अणखी या मताच्या फळांवरूनहि हें मत खोटें व नाशकारक आहे असें सिद्ध होतें. कारण कीं पश्चात्ताप करून ख्रीस्तावर विश्वास ठेवितात ते जसे, तसेच जे पाप सोडीत नाहींत व ख्रीस्तावर विश्वास ठेवीत नाहींत तेहि तारण पावतील असें मत धरणाऱ्यांस पाप सोडून पवित्रपण धरण्याचें कांहीं अगत्य वाटणार नाहीं, इतकेंच केवळ नव्हे पण सर्व प्रकारचीं पापें करण्याची मोकळीक व उत्तेजन होईल. मग अर्थातच ते सर्व प्रकारचे दुर्गुण व दुर्व्यसनें धरून बहुत दुष्टाई करितील. आणि सर्व सरसगट तारण पावतील असें मत धरणाऱ्या लोकांची वर्त्तणूक सदरीं सांगितल्याप्रमाणेंच होत असती हें सर्वत्र प्रसिद्ध आहे. परंतु कोणत्याहि धर्मसिद्धांताचें खरे-पण जाणण्याचा एक मार्ग असा आहे कीं त्या सिद्धांताच्या विश्वासावरून होणारें फळ पाहावें. आणि तें फळ चां-गलें नसेल तर तो सिद्धांत खोटा आहे असें जाणावें. त्याप्रमाणें पाहतां सरसकट सर्व मनुष्यें तारण पावतील या सिद्धांताच्या विश्वासाचें फळ वाईट होत असतें, ह्मणून हें मत खोटें व नाशकारक आहे असें जाणावें. (४) आणि पश्चात्तापी व अपश्चात्तापी, सद्भक्त व अभक्त, हे सर्व सरसकट तारण पाव-तात असें मत धरल्याने ईश्वरी शास्त्रांत सांगितलेल्या कित्येक गोष्टींचा अगदीं विपरीत अर्थ निघेल. ह्मणजे जलप्रल-याच्या वेळीं ह्या पृथ्वीवर जीं मनुष्यें होतीं तीं नोहा खेरीज करून सर्व फार दुष्ट व भ्रष्ट होतीं. ह्मणून ईश्वराने आपला भक्त नोहा यास त्याच्या कुटुंबासुद्धां तारिलें, आणि

बाकीच्या सर्व अभक्तांचा नाश केला असें सांगितलें आहे. परंतु सर्वच मनुष्यें तारण पावतात या मताप्रमाणें पाहिल्यास असें ठरेल कीं जीं अभक्त मनुष्यें जलप्रलयाकडून मारिलीं गेलीं तीं आपल्या दुष्टपणावरून नोहाच्या अगोदर आकाशांतील पूर्ण व अक्षय सुखांत गेलीं. आणि नोहा जो सद्भक्त होता तो आपल्या धार्मिकपणामुळें ह्या जगांतील दुःखें व हाल भोगण्यासाठीं अणखी कांहीं काळपर्यंत ह्या जगवस्तींत ठेवला गेला. तसेंच सदोम व गमोरा यांतील सर्व भ्रष्ट व पापिष्ट मनुष्यें आपल्या दुष्टपणामुळें अग्नि व गंधक यांकडून लोटापूर्वीं आकाशांतील सुखामध्यें घेतलीं गेलीं. परंतु लोट याला धार्मिकपणामुळें ह्या दुःखाच्या व खेदाच्या लोकीं अणखी कांहीं काळपर्यंत राहावें लागलें. तसेंच ख्रीस्ताच्या पहिल्या बारा शिष्यांतील दुष्ट व घातक असा जो यहूदा इस्कारयोतेस तो आपल्या प्रभूला परस्वाधीन करण्याच्या दुष्टाईकरितां आत्महत्या करण्याकडून बाकीच्या अकरा प्रेषितांपूर्वीं आकाशांतील सुखांत घेतला गेला. आणि बाकीचे अकरा जे विश्वासू आणि भक्तिशील प्रेषित होते त्यांस त्यांच्या धार्मिकपणामुळें अणखी कांहीं काळपर्यंत ह्या जगांत श्रम कष्ट व दुःखें भोगण्यासाठीं ठेविलें, असें ठरेल. आणि तसेंच फारो व त्याचें सैन्य जें सुफ समुद्रांत नाश पावलें आणि कोराह व त्याचे सोबती ज्यांस जमिनीनें गिळून मारिलें, आणि अनान्या व साफिरे ज्यांस त्यांच्या ढोंगामुळें पवित्र आत्म्यानें तत्क्षणींच मारिलें, ते आणि असलीं दुसरीं बहुत मनुष्यें जीं आपल्या दुष्टाईमध्यें मरण पावलीं तीं पश्चात्तापी व सद्भक्त मनुष्यांहून अगोदर आकाशांतील सुखांत गेलीं असें ठरेल. परंतु

जे आपलें पाप व दुष्टपण न सोडितां आणि ख्रीस्तावर विश्वास न ठेवितां मरतात, त्यांस आकाशांतील सुखांत घेणें हाच मुळीं मोठा अन्याय आहे, आणि असें ईश्वर कदापि करणार नाहीं; तर मग त्यांस, सद्भक्तांच्या अगोदर आकाशांत घेणें हें कोठून? तथापि सर्वच मनुष्यें तारण पावतील या मताप्रमाणें पाहिल्यास ईश्वराच्या सदरीं लिहिलेल्या कामांविषयीं असाच विपरीत व खोटा अर्थ होतो. यास्तव हें अगदीं खोटें व अनर्थक आहे असें समजलें पाहिजे.

**प्र०** १२. सर्वच मनुष्यें तारण पावतील, या मतास कांहीं आधार व प्रमाण नसतां हें मत मनुष्यें कशासाठीं धरितात?

उ० त्याना या मताच्या खरेपणाचें कांहीं प्रमाण पटलें आहे ह्मणून नव्हे. परंतु असें मत धरिल्याने त्यांस आपल्या पापिष्ट आवडीप्रमाणें भ्रष्ट कर्में करण्यास मोकळिक वाटती आणि त्यावरून दंड होण्याचें भय त्यांच्या मनांत येत नाहीं याकरितां ते हें मत धरितात; ह्मणजे मरणोत्तर दुःखावस्थेंतले क्लेश व यातना ज्या अनंत व अपार आहेत त्या आपल्यांस लागतील अशा विचाराने जी भीति व अशांतता आपल्या मनांत होती, तिचें निवारण निदान अल्पकाळपर्यंत तरी व्हावें; याच हेतूने ते असें अविचारी व खोटें मत धरितात.

**प्र०** १३. जीं मनुष्यें असें खोटें मत धरून आपणांस फसवितात त्यांसीं सद्भक्तानी कसें वागावें?

उ० मोठ्या ममतेने आणि त्यांच्या तारणाविषयींच्या मोठ्या उत्कंठेने त्यांजसीं बोलावें व वागावें. आणि त्यांला

त्यांच्या ह्या नाशकारक मतापासून वळवून याविषयींचें खरें आणि शास्त्रीय मत अंगीकारण्यास व आपलें तारण साधून घेण्यास बोध व उत्तेजन द्यावें हें योग्य आहे.

प्र० १४. अधर्मी व अपश्चात्तापी मनुष्यांस मरणोत्तर दुःखावस्थेमध्यें मोठा व अनंतकालिक दंड लागणार आहे, हा सिद्धांत समजल्यावरून मनुष्यांनी काय करावें?

उ० ह्या सिद्धांताचें ज्ञान होतांच त्यानी आपल्या सर्व पापांचा पश्चात्ताप करून ख्रीस्तावर विश्वास ठेवावा. आणि मरण, न्याय ठरणें, आणि अनंतकालिक सुखावस्था, यांसाठीं तयार होण्याकरितां मोठ्या काळजीने आणि तत्परतेने झटावें. ह्मणजे सर्वकाळिक दंड चुकवून सर्वकाळिक जीवन पावण्यास योग्य होण्यासाठीं झटावें हेंच योग्य आहे. २ पेत्र० ३:११–१४. लुका २१:३३, ३४,३६.

---

## प्रकरण २५.

# ईश्वरी कृपादानें पावण्याचीं साधनें.

प्र० १. ईश्वरी कृपादानें पावण्याचीं साधनें ह्मणजे काय?

उ० मनुष्यास धर्माविषयींचा उपदेश होणें व तो मनांत ठसणें, आणि त्याच्या मनाचा पवित्र पालट होणें, आणि त्याच्या धार्मिकपणाची वृद्धि होणें; हें घडण्यासाठीं ज्या गोष्टी केल्या पाहिजेत असा ईश्वरी नेम आहे त्या गोष्टींस ईश्वरी कृपादानें पावण्याचीं साधनें ह्मणावें.

प्र० २. हीं कृपादानें पावण्याचीं साधनें कोणतीं?

उ० शास्त्राचा उपदेश ऐकणें व नियमित धर्मसुशिक्षण पावणें, पवित्र शास्त्र व दुसरीं धर्मसंबंधी पुस्तकें वाचणें व त्यांचें मनन करणें, लौकिकांत कुटुंबांत व एकांतीं ईश्वराची भक्ति करणें, धर्मसंस्कार ह्मणजे बाप्तिस्मा व प्रभुभोजन हीं घेणें, धार्मिक मनुष्यांसीं सहवास व भाषण करणें, आणि स्वपरीक्षा करणें; हीं ईश्वरी कृपादानें पावण्याचीं मुख्य साधनें आहेत. १ करिं० १:१८,२१,२३,२४. एफे० ४:११,१२. प्रे० १७:११. मात्थी ७:७. २८:१९. १ करिं० ११:२६. लुका २४:३२. गीत १:२. २ करिं० १३:५. अनु० ६:६,७.

प्र० ३. हीं कृपादानाचीं साधनें कशानें सफळ होतात?

उ० मनुष्याला ईश्वरी शास्त्राचा उपदेश होऊन, तो मनांत ठसल्यानें हीं साधनें सफळ होतात. कारण मनुष्याच्या मनाचा धर्म असा आहे कीं तें हेतू व कारणें यांकडून मात्र प्रेरलें जातें. आणि धार्मिक होण्याचे हेतु व कारणें तर खरेपणाचें ह्मणजे ईश्वरी शास्त्राचें ज्ञान झाल्यावांचून मनुष्याच्या मनांत यावयाचीं नाहींत. कारण ईश्वर किती उत्तम व प्रियकर आहे हें समजल्यावांचून ईश्वराविषयींची प्रीति मनुष्याच्या मनांत कसी उत्पन्न होईल? होणार नाहीं. तसेंच ईश्वराच्या आज्ञांचें ज्ञान प्राप्त झाल्यावांचून पापाचा पश्चात्ताप होणार नाहीं,आणि तारणारा जो प्रभु येशू ख्रिस्त त्याचें ज्ञान झाल्यावांचून कोणी मनुष्य त्याजवर विश्वास ठेवणार नाहीं. आणि ख्रिस्ती लोकांला जे आशीर्वाद प्राप्त होतात त्यांचें ज्ञान झाल्यावांचून कोणाच्या ठायीं ख्रिस्ती आशा उद्भवणार नाहीं.

याप्रमाणें मनांतील धार्मिकपण आणि शास्त्रांतील उपदेशाचें ज्ञान यांचा असा दृढ संबंध आहे, कीं साधारण नेमाप्रमाणें पाहिल्यास, शास्त्रबोध झाल्यावांचून धार्मिकपण मनुष्याच्या ठायीं उत्पन्न व्हावयाचें नाहीं. यास्तव शास्त्रांतील बोधाचें ज्ञान होण्याने व ते मनांत ठसल्याने; ह्मणजे त्याप्रमाणें चालण्यास उत्तेजन व प्रेरणा प्राप्त होण्याने, हीं कृपादानाचीं साधनें सफळ होतात असें समजावें. गीत १९:८. इब्री ४:१२. इर्म. २३:२९.

प्र०. ४. केवळ हीं साधनें करण्यानेच मनुष्याच्या मनाचा पालट आणि पवित्रीकरण होतें कीं काय?

उ० असें अगदीं नाहीं. कारण तीं साधनें केवळ कार्याचे उपाय ह्मणजे कारागिराच्या हातांतील हत्यारांप्रमाणें असतां, जसीं हत्यारें हीं कारागिराच्या कर्त्रृत्वावांचून कांहीं काम करावयास शक्तिमान नाहींत, तसेंच कृपादानांच्या साधनांच्या योगाने मन पवित्र करणारा जो पवित्र आत्मा त्याच्या कर्त्रृत्वावांचून हीं नुसतीं साधनें मनुष्यास पवित्र करावयास शक्तिमान नाहींत. मनुष्याचें मन प्रकाशित करण्यासाठीं व त्यास पवित्रता धरण्याची प्रेरणा देण्यासाठीं, पवित्र आत्मा ह्या साधनांचा उपयोग करितो खरें; तरी जर मनुष्य हीं साधनें करीत असतां ईश्वर आपल्या पवित्र आत्म्याच्या योगाने तीं सफळ करणार नाहीं, तर त्या साधनांकडून कधीं कोणाचें मन शुद्ध होणार नाहीं. यास्तव हीं कृपादानांचीं साधनें सफळ होण्यासाठीं पवित्र आत्म्याचें साह्य अवश्य आहे.

प्र० ५. मनुष्यास सौख्यलोकीं जाण्यास योग्य करण्यासाठीं सद्गुणांचीं साधारण साधनें सर्वदा अवश्यच आहेत

कीं काय? ह्मणजे ह्या साधनांवांचून ईश्वर कधीं कोणास सौख्यलोकीं जाण्यासाठीं योग्य करीत नसतो, असें आहे कीं काय?

उ० असें नाहीं. जर ईश्वरास योग्य वाटेल तर तो ज्यास पाहिजे त्यास ह्या साधारण साधनांवांचूनहि पालटून पवित्र करावयास शक्तिमान आहे. आणि ज्या लेंकरांस तो तारितो त्यांस तो याचप्रमाणें, ह्मणजे साधारण साधनांवांचून पवित्र करितो असें दिसतें. परंतु याविषयीं ईश्वराचा साधारण नेम पाहिल्यास असा आहे कीं, ज्यांविषयीं साधनें होण्याजोगीं आहेत, त्यांस तो साधनांच्या योगानेच पवित्र करितो, यास्तव ईश्वराच्या साधारण नेमाप्रमाणें ह्मटल्यास, आपण पापी व दंडास पात्र आहें असी कोणी मनुष्याची खातरी होणें व त्याचें मन पालटून पवित्र होणें व त्याच्या धार्मिकपणाची वृद्धि होणें, हें साधनांचा उपयोग केल्यावांचून घडावयाचें नाहीं. कारण नियमित साधनानी कार्यसिद्धि होणें हा ईश्वराचा साधारण नेम जसा ऐहिक गोष्टींस लागतो, तसाच आत्मिक गोष्टींलाहि लागतो.

प्र० ६. कार्यसिद्धि व साधनें यांविषयींच्या ह्या सिद्धांतावरून ईश्वराचें कर्तृत्व व स्वतंत्रसत्ता यांस आणि मनुष्याचें कर्तृत्व व ईश्वराधीनता यांस कांहीं बाध येतो कीं काय?

उ० कांहींच बाध येत नाहीं. पण ह्या सिद्धांतावरून या गोष्टीचा उलगडा होऊन इच्छा खरेपणाचें प्रमाण पटतें. कारण जरी ईश्वर साधनांच्या योगानेच आपलीं कार्यें करितो, तरी त्या कार्यांचा कर्त्ता तो आपणच आहे, आणि ज्या साधनांच्या योगाने तो तीं कार्यें करितो तीं केवळ शस्त्ररूप असतां, तीं कार्याचे कर्त्ते नव्हत, पण ईश्वराने

योजून चालविलेले उपाय असीं आहेत. ह्मणून ईश्वराचें कर्तृत्व व स्वतंत्रसत्ता हीं, साधनांवांचून केलेल्या कार्यांत जसीं दिसतात, तसींच साधनांच्या योगाने केलेल्या कृत्यांतहि दिसतात. आणि जरी ईश्वर आपल्या आत्म्याच्या प्रेरणेने मनुष्यास सत्कर्में करावयास प्रेरितो, तरी मनुष्य आपलीं सर्व मानसिक कर्मैं पूर्ण स्वतंत्रतेने करितो, असें सर्वांच्या अनुभवावरून समजतें. यावरून सिद्ध होतें कीं, जरी मनुष्य ईश्वराधीन आहे आणि ईश्वराच्या प्रेरणेवांचून त्याच्याने कांहीं सत्कर्म करवत नाहीं, तरी ईश्वराच्या प्रेरणेखालीं असतां जीं मानसिक कर्मैं तो करितो, तीं तो स्वसंतोषाने व पूर्ण स्वतंत्रतेने करितो. यास्तव साधनांच्या योगाने कार्यसिद्धि होण्याच्या सिद्धांतावरून ईश्वराचें कर्तृत्व व स्वतंत्रसत्ता यांस आणि मनुष्याची ईश्वराधीनता व मानसिक स्वतंत्रता यांस कांहींच बाध येत नाहीं. १ करिं० ३:७. फिलि० २:१२,१३.

प्र० ७. सर्व माणसांस ह्मणजे जसें भक्तांस तसें अभक्तांलाहि ईश्वरी कृपादानें पावण्याचीं साधनें करणें अवश्य आहे कीं काय?

उ० होय. कारण त्यांनी हीं साधनें करावीं असी ईश्वराची आज्ञा आहे; आणि हीं साधनें केल्याने त्यांचें मोठें हित होत असतें. जे सद्भक्त आहेत त्यांचें धार्मिकपण वाढणें व पवित्रीकरण पूर्ण होणें, हें ह्याच साधनांच्या योगाने होतें. आणि जे अभक्त आहेत त्यांच्याहि मनाचा पालट होणें आणि पवित्रीकरण होणें, हें याच उपायांच्या योगाने बहुधा होत असतें. हीं साधनें केल्यावांचून धार्मिक झालेल्या एकाहि प्रौढ वयाच्या मनुष्याची गोष्ट सर्व शास्त्रांत

अढळत नाहीं. परंतु हीं साधनें केल्याने धार्मिक झालेल्या बहुत मनुष्यांचें वर्णन शास्त्रांत अढळतें. यावरून सिद्ध होतें कीं, जे कोणी हीं साधनें करीत नाहींत, त्यांपेक्षां जे हीं साधनें करितात त्यांचें मन पालटून धार्मिक होण्याविषयीं फार अधिक आशा आहे. ह्मणजे जे अभक्त हीं साधनें करितात ते हीं साधनें करण्याच्या क्रियेने कांहीं पुण्य करितात आणि त्यावरून ही आशा होती असें नाहीं. परंतु अभक्तांस सद्भक्त करण्याचीं जीं साधनें ईश्वराने नेमून ठेविलीं आहेत, तीं करण्याने ते ज्या स्थितींतल्या लोकांस ईश्वर आपल्या आत्म्याची प्रेरणा देऊन आपणाकडे फिरवीत असतो त्या स्थितींत जातात; त्यावरूनच ते ईश्वराकडे फिरून धार्मिक होण्याची विशेष आशा उत्पन्न होती. कारण मनुष्यानी आपलें तारण साधण्यासाठीं जीं साधनें करावीं ह्मणून ईश्वराने नेमिलें आहे तीं जे करीत नाहींत त्यांस ईश्वर बहुधा तारीत नसतो. यास्तव ईश्वरी साधारण नेमाप्रमाणें पाहिल्यास, ईश्वराने नेमलेलीं साधनें करणें, हें जसें सद्भक्तांस तसें अभक्तांसहि अवश्य आहे. आणि जे अज्ञानी अविचारी, अन्यायी आणि दुष्ट आहेत त्यांवांचून दुसरे कोणी हीं साधनें करण्याची अवश्यकता नाकबूल करीत नसतात. प्रे० २०:३२. योहा० १७:१७. प्रे० २:३७, ४१. २ करिं० १०:४,५. नीति ८:३३–३५. १५:८.

प्र० ८. हीं ईश्वरी कृपादानें पावण्याचीं साधनें मनुष्यानी कसीं करावीं?

उ० मनोभावाने व त्यांकडून आपली सुधारणा करून घेण्याच्या इच्छेने आणि त्यांवर ईश्वराचा आशीर्वाद येणें अगत्य आहे अशा खातरीने तीं साधनें करावीं, आणि तीं

सफळ होण्यासाठीं ईश्वरी पवित्र आत्म्याचें साह्य मिळण्याकरितां ईश्वराजवळ प्रार्थना करावी.

---

## प्रकरण २६.

# ईश्वराची भक्ति.

प्र० १. ईश्वराची भक्ति ह्मणजे काय?

उ० ईश्वराच्या परिपूर्ण व अति उत्तम गुणस्वभावास आणि अधिकारास शोभेल अशा प्रकारें त्याला भजणें; ह्मणजे त्याचा सन्मान व स्तुति करणें हीच ईश्वराची भक्ति आहे. प्रग. ४:९–११.

प्र० २. ईश्वराची भक्ति करण्याविषयींचें आमचें कर्त्तव्यकर्म सृष्टिजन्य ज्ञानावरून समजतें किंवा शास्त्रावरून समजतें?

उ० ईश्वराची भक्ति करण्याची अवश्यकता शास्त्रावांचून सृष्टिजन्य ज्ञानावरूनहि समजती. परंतु ती भक्ति कसी व कोणत्या प्रकारें आणि कोणत्या समयीं करावी याविषयींचें यथार्थ व योग्य ज्ञान पतित मनुष्यांस ईश्वरी शास्त्रावांचून प्राप्त होणार नाहीं.

प्र० ३. ईश्वराच्या भक्तीचे किती प्रकार आहेत?

उ० एकांतांतील भक्ति, कुटुंबांतील भक्ति आणि लौकिकांतील ह्मणजे मंडळींतील भक्ति, असे तीन प्रकार आहेत. या तीन प्रकारें प्रत्येक भक्ताने परमेश्वराला भजावें हें सर्व सद्भक्तांस योग्य दिसतें; असें केवळ नाहीं पण पवित्र शास्त्रांतील बोधाचा अभिप्राय मनांत आणल्यास, या तिन्ही प्रकारें मनुष्यानी ईश्वराला भजावें, असी ईश्वरे-

च्छाहि दिसून येती. गीत ८४:४. १३२:७. यहो. २४:१५. मात्थी ६:६.

प्र० ४. ईश्वराची लौकिकभक्ति केव्हां करावी?

उ० दर शाब्बाथ दिवसीं नेमाने करावी; आणि हरएक मंडळीची स्थिति, कारणें व प्रसंग यांप्रमाणें ज्या वेगळाल्या इतर दिवसीं ईश्वराची लौकिकभक्ति करणें अगत्य वाटेल, त्या दिवसींहि करावी, हें योग्य आहे. लेवी १९: ३०. योए. १:१४. गीत १००:४.

प्र० काय करण्याने ईश्वराची लौकिकभक्ति करावी?

उ० ईश्वरी शास्त्राचें पठन किंवा श्रवण करणें, व शास्त्रांतील बोधाचा उपदेश ऐकणें व ईश्वराची प्रार्थना करणें व ईश्वरी स्तुतीचीं स्तोत्रें गाणें आणि ईश्वराने नेमलेले संस्कार ह्मणजे बाप्तिस्मा व प्रभुभोजन घेणें, ह्या गोष्टी करण्याने ईश्वराची लौकिकभक्ति करावी. आणि मंडळींतील सर्वांस जी भाषा समजत असेल त्याच भाषेंत ह्या सर्व गोष्टी केल्या पाहिजेत. मंडळींतील बहुतांस समजत नाहीं अशा भाषेमध्यें लौकिकभक्ति करण्याची जी रीत ग्रीक व रोमनक्याथोलीक वगैरे बिघडलेल्या ख्रिस्ती लोकांमध्यें चालत आहे, ती फार अयोग्य आणि शास्त्रनिषिद्ध आहे, असें समजावें. प्रे०१५:२१. १८:४. २:४१,४२. १तीम.२:८. कल.३:१६. १करिं.१४:१९,२३,२७,२८.

प्र० ६. लौकिकभक्ति चालण्यासाठीं, ह्मणजे लौकिक भक्तिसंबंधी सर्व गोष्टी यथास्थित रीतीने चालण्याची सोय होण्यासाठीं जें साह्य व जो द्रव्याश्रय देणें अगत्य आहे, तो मंडळींतल्या सर्वांनी द्यावा हें त्यांचें कर्त्तव्यकर्म आहे कीं काय?

उ० होय, हें त्यांचें फार भारी व अगत्याचें कर्त्तव्यकर्म आहे. कारण त्यांचें ऐहिक व पारलौकिक सुख व समृद्धि याच कर्त्तव्यकर्मावर विशेषें अवलंबून राहती. कोणत्याहि मंडळीमध्यें ही लौकिकभक्ति जितकी योग्य प्रकारें व तत्परतेने चालती, तितके ते लोक विशेष सद्गुणी यशस्वी आणि सुखी होत असतात, असें सर्वत्र दिसून आलें आहे. आणि लौकिक भक्तीसंबंधी सर्व कामें नीट रीतीने चालण्यासाठीं जें साह्य व जो द्रव्यआश्रय अगत्य आहे, तो सर्व सद्भक्तांनी पुरवावा असी शास्त्राज्ञाहि आहे. १ करिं. ९:११,१४. मात्थी १०:९,१०. १ तिम. ५:१८. गल. ६:६. रोम. १५:२७. २ करिं. ८:१३,१४.

प्र० ७. कांहीं खरोखर व योग्य अडचण किंवा प्रतिबंध नसतां जे कोणी लौकिकभक्तीस जाण्याची हयगय करितात, ते योग्य करितात कीं काय?

उ० ते अगदीं अयोग्य करितात असें केवळ नाहीं पण तसें करण्याने ते आपली मोठी हानी करून घेतात. इब्री १०:२५. गीत १००:४.

प्र० ८. कुटुंबांतील भक्ति केव्हां करावी?

उ० प्रत्येक सकाळीं व संध्याकाळीं करावी हें आपल्या विवेकबुद्धीवरून आणि ईश्वरी शास्त्रांतील बोधावरून योग्य दिसतें. आणि भोजनाच्या पूर्वीं ईश्वराची आभारस्तुति करून आशीर्वाद मागणें हा कुटुंबांतील भक्तीचाच एक प्रकार आहे. गीत ९२:१,२.१४१:२. १ तिम. ४:३–५. मात्थी १५:३६.

प्र० ९. कुटुंबांतील भक्ति काय करण्याने करावी?

उ० शास्त्र वाचून मनन करणें व शास्त्रांतील बोधा-

विषयीं उपदेश ऐकणें व ईश्वराच्या स्तुतीचीं गीतें गाणें आणि ईश्वराची प्रार्थना करणें, ह्या गोष्टी करण्याने कुटुंबांतील ईश्वरीभक्ति करावी. प्रे० १७:११. अनु. ६:६,७. गीत ९२:१,२. फिलीं० ४:६.

प्र० १०. एकांतांतील ईश्वरीभक्ति केव्हां करावी?

उ० दररोज निदान एकदां तरी हीभक्ति अवश्य केली पाहिजे. सकाळीं निजून उठतांच आणि रात्रीं निजावयास आडे घेण्यापूर्वीं एकांतांतील ईश्वरीभक्ति करणें, हें बहुधा सर्व सद्भक्तांस अगत्य व सोईवार वाटतअसतें. परंतु सर्वांची सोय व प्रसंग सारिखे नसतात ह्मणून या भक्तीच्या वेळेचा नेम करून सांगवत नाहीं.

प्र० ११. दररोज एकांतांतील ईश्वरीभक्ति करणें, हें प्रत्येक ईश्वरी भक्ताचें कर्त्तव्यकर्म आहे कीं काय?

उ० होय, एकांतस्थळीं जाऊन कांहीं ईश्वरी वाक्याविषयीं ध्यान करणें, व ईश्वराची प्रार्थना करणें, यांकडून एकांतींची ईश्वरभक्ति दररोज निदान एकदां तरी करावी, हें प्रत्येक ईश्वरभक्ताचें सर्वांहून मोठें अगत्याचें कर्त्तव्यकर्म आहे. कारण ह्या प्रकारच्या भक्तिसमयीं जसी मोकळ्या मनाने आणि प्रेमळ बुद्धीने भक्त ईश्वराची प्रार्थना करूं शकेल तसी दुसऱ्या प्रकारच्या भक्तिसमयीं त्याच्याने करवणार नाहीं. अणखी आपलीं पापें कबूल करणें,आपल्या दुःखांविषयीं शोक करणें, आणि आपल्या व दुसऱ्यांच्या गरजांविषयीं विनंती करणें, यांसंबंधी अशा अनेक गोष्टी प्रत्येक सद्भक्ताला प्रार्थनाद्वारें ईश्वराला कळवायाच्या असतात कीं, त्या दुसऱ्या मनुष्यांस समजूं देणें उपयोगी नाहीं व योग्यहि नाहीं. यासाठीं ह्या गोष्टींविषयींची प्रार्थना एकांतांतच

केली पाहिजे. आणि ह्या प्रकारच्या भक्तीने भक्ताच्या मनांतील धार्मिकपण जसें वाढतें व टिकतें तसें ह्याखेरीज दुसऱ्या प्रकारच्या भक्तीने होत नाहीं. आणि अशा प्रकारची प्रार्थना नित्य करीत जावी असी ईश्वरी आज्ञाहि आहे. यावरून सिद्ध होतें कीं, ह्या प्रकारची ईश्वरीभक्ति करणें, हें प्रत्येक ईश्वरभक्ताचें सर्वांहून भारी कर्त्तव्यकर्म आहे. उत्प० २४:६३. मात्थी ६:६.

**प्र०** १२. ईश्वराची प्रार्थना ह्मणजे काय?

उ० धर्मनिष्ट बुद्धीने ह्मणजे भक्तिभावाने केलेल्या ईश्वराच्या विनवणीस, ईश्वराची प्रार्थना ह्मणावें. आणि जो कोणी ईश्वराची प्रार्थना मनोभावाने करितो, तो तसें करण्याने आपण गरजवंत दीन व लाचार आहें असें कबूल करितो, आणि ज्याविषयीं तो ईश्वराला प्रार्थितो तें पावण्याची उत्कंठा व आशा तो धरीत असतो. लूका १८:१३.

**प्र०** १३. ईश्वराची प्रार्थना करणें हें प्रत्येक मनुष्याला अवश्य आहे कीं काय?

उ० होय, मनुष्याचा ईश्वरासीं जो संबंध आहे, त्यावरून आणि प्रार्थना केल्याने जे लाभ मनुष्यास प्राप्त होतात त्यांवरून पाहतां ईश्वराची प्रार्थना करणें हें प्रत्येक मनुष्याचें अवश्य कर्त्तव्य आहे असें दिसतें. कारण ईश्वराची प्रार्थना करण्याकडून मनुष्याचें मन सुधरतें आणि जे आशीर्वाद त्याला अगत्य आहेत, ते त्यास प्राप्त होतात. आणि मनुष्यानी नेहमी ईश्वराची प्रार्थना करीत जावी असी शास्त्राज्ञाहि आहे. ह्मणून सर्व मनुष्यानी ईश्वराची प्रार्थना करावी हें त्यांचें मोठें कर्त्तव्यकर्म आहे. आणि जे कोणी हें भारी आणि अगत्याचें कर्त्तव्यकर्म पाळण्याची

हयगय करितात ते मोठें पाप करितात असें केवळ नाहीं, पण ते आपली मोठी हानी करून घेतात असें समजावें. लुका ११:९.

प्र० १४. ईश्वराशिवाय दुसऱ्या कोणाची प्रार्थना करणें योग्य आहे कीं काय ?

उ० ईश्वर जो बाप पुत्र आणि पवित्र आत्मा याशिवाय दुसऱ्या कोणाची प्रार्थना करणें योग्य नाहीं. कारण कीं ईश्वरावांचून दुसरा कोणी आमच्या भजनास पात्र नाहीं. ह्मणून कुमारी मारया आणि पवित्र मानलेले साधुसंत आणि दिव्यदूत यांची प्रार्थना करणें, किंवा यांच्या नावानेहि ईश्वराची प्रार्थना करणें, हें मूर्त्तिपुजेसारिखें पाप आहे. लुका ११:२. २ करिं० १३:१४. प्रे० ७:५९. कल० २:१८. प्रग० १९:१०.

प्र० १५. मनुष्यानी ईश्वराची प्रार्थना कोणाच्या नांवाने करावी ?

उ० खीस्ताच्या नांवाने करावी. कारण कीं मनुष्यें पतित ह्मणजे पापिष्ट आणि अपराधी असीं असतां, त्यांला मध्यस्थाच्या योगावांचून ईश्वराकडे जाणें किंवा ईश्वरासीं भाषण करणें योग्य नाहीं. आणि देव व मनुष्य यांमध्यें येशू खीस्तावांचून दुसरा कोणी मध्यस्थ नाहीं. ह्मणून सर्व मनुष्यानी खीस्त येशूच्या नांवानेच ईश्वराची प्रार्थना करावी. १ तिम० २:५. एफे० २:१८.

प्र० १६. ईश्वराची प्रार्थना कसी करावी ?

उ० समंजसपणाने व गंभीरपणाने आणि भिडेने व मर्यादेने आणि आपण मोठे पापिष्ट व अपराधी असतां ईश्वराची कृपा पावण्यास अयोग्य आहों हें मनांत वागवून

नम्रतेने व अनुतापीपणाने आणि प्रीतीने व विश्वासाने आणि कृतज्ञतेने व स्थिरतेने, आणि ईश्वरी इच्छेस मान्य अशा बुद्धीने ईश्वराची प्रार्थना करावी. गीत ४७:७. इब्री १२:२८. लुका १८:१३. योहा० ४:२४. इब्री. ११:६. एफे० ६:१८. लुका २२:४२.

प्र० १७. कोणकोणांसाठीं ईश्वराची प्रार्थना करावी?

उ० आपणांसाठीं व आपल्या मित्रांसाठीं व आपल्या वैऱ्यांसाठींहि करावी. आणि आपले अधिकारी व त्यांची प्रजा यांसाठीं, आपले उपदेशक व त्यांचे उपदेश ऐकणारे यांसाठीं आणि ईश्वराच्या सार्वत्रिक मंडळीसाठीं व जगांतील सर्व लोकांसाठीं मनुष्यांनी ईश्वराजवळ प्रार्थना करावी. परंतु ही प्रार्थना केवळ जे ह्या पृथ्वीवर हल्लीं आहेत व पुढें उत्पन्न होतील त्यांसाठीं मात्र; ह्मणजे जे परीक्षेच्या अवस्थेंत आहेत त्यांसाठीं मात्र करावी. परंतु जे मरण पावून आकाशवासी किंवा नरकवासी झाले आहेत त्यांसाठीं किंवा आकाशांतील दिव्यदुतांसाठीं किंवा नरकांतील भ्रष्ट दुतांसाठीं किंवा ज्यानीं अक्षम्य पाप केलें आहे, त्यांसाठीं प्रार्थना करणें योग्य नाहीं. १ तिम० २:१,२. मात्थी ५:४४. गीत १२२:६. प्रग० २२:११. १ योहा० ५:१६.

प्र० १८. मनुष्यानी प्रार्थना करितांना ईश्वराजवळ काय मागावें?

उ० ज्या गोष्टी व वस्तु मुळींच निर्दोष आहेत, ह्मणजे ईश्वराने निषेधिल्या नाहींत व ज्यांकडून ईश्वराचें गौरव व ईश्वराच्या मंडळीची सुवृद्धि आणि जगाचें ह्मणजे आपलें व इतरांचें कल्याण होण्याजोगें आहे, त्या सर्व गोष्टी प्रार्थना

करितांना ईश्वराजवळ मागाव्या हें योग्य आहे. १ तिम० २:१-४.

प्र० १९. दिव्यलोकवासी भक्त जी ईश्वराची भक्ति करितात, तिजमध्यें आणि भूलोकवासी भक्त जी ईश्वराची भक्ति करितात, तिजमध्यें कोणता भेद आहे?

उ० दिव्यलोकवासी भक्त जी ईश्वरी भक्ति करितात तिजसंबंधी त्यांच्या सर्व क्रिया सर्वस्वें पवित्र व निर्दोष असतात. आणि ईश्वराची स्तुति करणें व आभार मानणें हेंच त्यांच्या भक्तीचे मुख्य विषय असतात. परंतु भूलोकवासी भक्त जी ईश्वरी भक्ति करितात, तिजसंबंधी त्यांच्या सर्व क्रिया बहुधा अपूर्ण असतात, ह्मणजे त्यांमध्यें बहुत दोष व चुका असतात. आणि कृपादानें व आशीर्वाद पावण्यासाठीं ईश्वरापासीं विनवणी करणें हाच त्यांच्या भक्तीचा मुख्य विषय असतो. याप्रमाणें या उभय भक्तांच्या भक्तीचा भेद आहे.

प्र० २०. कोणी ख्रिस्ती मनुष्याने ईश्वराची प्रार्थना केल्यावांचून राहावें हें योग्य आहे कीं काय?

उ० जो खरा ख्रिस्ती आहे, तो कधीं ईश्वराची प्रार्थना केल्यावांचून राहणार नाहीं. कारण कीं ईश्वराची प्रार्थना करणें हें ख्रिस्ती जीण्याचा श्वासोश्वास असें आहे. ह्मणून जो मनुष्य ईश्वराची प्रार्थना करण्याची हयगय किंवा कंटाळा करीत असतो,त्याच्या धार्मिकपणाविषयीं मोठा संशय येण्याजोगा आहे. प्रे० ९:११.

---

## प्रकरण २७.

## शाब्बाथ दिवस.

प्र० १. शाब्बाथ दिवस ह्मणजे काय?

उ० ज्या दिवशीं जगिक ह्मणजे व्यवहारिक आणि प्रापंचिक कामधंदा व उद्योग अगदीं सोडून, ईश्वरी भक्ति व दुसरीं पवित्र कामें करावयाचीं, त्या दिवसाला शाब्बाथ दिवस ह्मणजे विश्रामवार ह्मटलें आहे.

प्र० २. शाब्बाथ पाळण्याविषयींचा नेम, नीतीसंबंधी नेम आहे किंवा विधीसंबंधी नेम आहे?

उ० तो एक अर्थी नीतीसंबंधी नेम आहे. कारण कीं आमच्या काळाचा कांहीं तरी भाग ईश्वराच्या भक्तीकरितां वेगळा करणें अवश्य आहे, हें आमच्या विवेकबुद्धीवरूनहि आह्मास समजतें. ह्मणून या अर्थी हा नीतीसंबंधी नेम आहे. परंतु आमच्या काळाचा कितवा भाग व कोणता भाग शाब्बाथ व्हावा, हें केवळ ईश्वरी प्रगटविण्यावरून मात्र आह्मास कळतें. यास्तव या अर्थी हा नेम विधीसंबंधी आहे, असें ह्मणावें.

प्र० ३. वेळेचा कितवा भाग आह्मासाठीं शाब्बाथ व्हावा ह्मणून ईश्वराने नेमिलें आहे?

उ० वेळेचा सातवा भाग ह्मणजे दर सात दिवसांमध्यें एक दिवस शाब्बाथ व्हावा असें ईश्वराने नेमिलें आहे. निर्ग० २०:८–१०.

प्र० ४. हा शाब्बाथ दिवस पवित्र दिवस असा कशासाठीं पाळावा?

उ० (१) कारण कीं तेणेंकडून मनुष्यांस नित्याच्या

कामापासून विश्रांति होती, आणि शास्त्र व दुसरीं धर्मसंबंधी पुस्तकें वाचून मनन करण्यास, आणि आपल्या लेंकरांस धर्म शिकविण्यास, आणि सद्भक्तांचा सहवास करण्यास, आणि ईश्वराची लौकिकभक्ति करण्यास चांगला प्रसंग होतो. आणि ह्या गोष्टी करण्यांचा सुप्रसंग व्हावा हें तर सर्व मनुष्यांस फार अगत्य आहे. ह्मणून ह्या गोष्टी करण्याची चांगली सोई होण्यासाठीं हा दिवस पवित्र असा पाळणें अवश्य आहे. (२) आणि मनुष्यानीं हा दिवस ईश्वराच्या सेवेसाठीं पवित्र असा पाळावा ह्मणून ईश्वराने आज्ञा केली आहे. उत्प० २:३. निर्ग० २०:८.

प्र० ९. शाब्बाथ दिवसाची मूळस्थापना केव्हां झाली?

उ० उत्पत्तीचें काम समाप्त होतांच झाली. कारण (१) ह्या दिवसाच्या स्थापनेविषयीं जें पहिलें वाक्य शास्त्रांत आहे त्यावरून असेंच अनुमान होतें. उत्प० २:३. आणि (२) ज्या हेतूस्तव हा दिवस पाळण्याचा नेम लावून दिल्हा त्याविषयीं विचार केल्यास असेंच अवश्य दिसतें. उत्पत्तीच्या कामामध्यें दिसून आलेल्या ईश्वरी गुणांचें ध्यान करून त्या गुणांस शोभेल अशा प्रकारें ईश्वराची भक्ति आणि सेवा करून मनुष्याने आकाशांत जाण्यास तयार व्हावें ह्मणून तो दिवस पाळण्याचा नेम लाविला. परंतु आकाशांत जाण्यास तयार होण्यासाठीं हा दिवस पाळण्याचें अगत्य जसें हल्लींच्या मनुष्यांस आहे तसेंच पहिल्या काळच्या मनुष्यांसहि होतें. यास्तव तो दिवस पाळण्याचा नेम उत्पत्ति होतांच लाविला असावा असें अनुमान होतें. (३) अणखी दिवसांच्या सप्तकानीं काळ

मोजण्याचा परिपाठ पहिल्यापासून पृथ्वींतील सर्व लोकांमध्यें चालत आला. ह्या परिपाठाचें मूळ ह्या शाब्बाथाच्या नेमामध्येंच आहे. उत्प० ४:३. ८:१०,१२. २९:२७,२८.

प्र० ६. शाब्बाथ पाळण्याविषयींचा नेम ईश्वराने इस्राएल लोकांस पुन्हा सांगितला कीं काय?

उ० होय. जेव्हां ईश्वराने त्यांस सिना डोंगरावर दाहा आज्ञा दिल्ह्या, तेव्हां त्याने शाब्बाथ पाळण्याचा नेम पुन्हा सांगितला. निर्ग० २०:८.

प्र० ७. शाब्बाथ पाळण्याविषयींचा जो नेम त्या दाहा आज्ञांमध्यें आहे, तो जसा इस्राएल लोकांस तसाच ख्रिस्ती लोकांसहि लागू आहे कीं काय?

उ० होय. कारण (१) सिना डोंगरावर दिल्हेल्या दाहा आज्ञा पृथ्वींतील सर्व लोकांस सर्व काळीं लागू आहेत असें बहुधा सर्व लोक कबूल करितात. आणि शाब्बाथ पाळण्याविषयींचा नेम तर त्याच दाहा आज्ञांमध्यें आहे. ह्मणून हा नेम ख्रिस्ती लोकांसहि लागू आहे. (२) आणि ख्रीस्त येशू जो शाब्बाथाचा प्रभु आहे त्याच्या व त्याच्या प्रेषितांच्या उपदेशावरून व वहिवाटीवरूनहि असेंच ठरतें. आणि (३) असेंच समजून सर्व ख्रिस्ती मंडळ्यांमध्यें शाब्बाथ दिवस पाळण्याचा सांप्रदाय पहिल्यापासून चालत आला आहे. यावरून उघड आहे कीं शाब्बाथ पाळण्याविषयींचा नेम जसा इस्राएल लोकांस तसाच ख्रिस्ती लोकांसहि लागू आहे. ह्मणून हा नेम सर्व ख्रिस्ती मंडळ्या पाळितात व पुढेंहि शेवटपर्यंत

पाळतील. ६ व्या आणि १० व्या प्रश्नांखालीं लिहिलेलीं शास्त्रवाक्यें पाहावीं.

**प्र०** ८. सप्तकांतील कोणता दिवस इस्राएल लोकांचा शाब्बाथ दिवस होता?

उ० सप्तकाचा सातवा दिवस इस्राएल लोकांचा शाब्बाथ दिवस होता.

**प्र०** ९. इस्राएल लोकांचा शाब्बाथ दिवस कोठपर्यंत चालला?

उ० ख्रीस्त येशूच्या पुन्हा उठण्याच्या वेळापर्यंत चालला. कारण तेव्हां ख्रीस्तानें वांटणीची आडभिंत फोडिली आणि बहुत गोष्टी पूर्वस्थितींत आणिल्या. यास्तव यहूदी शाब्बाथ दिवस जो ख्रीस्तानें आपल्या मंडळीकरितां सिद्ध केलेल्या विसाव्याचा दाखला होता, तो बदलून, ज्या दिवशीं ख्रीस्त आपल्या तारणोपायासंबंधीच्या कामांपासून विसांवा घेता झाला, त्या दिवसावर आला. ह्मणजे सप्तकांतील सातव्या दिवसाच्या ठिकाणीं सप्तकांतील पहिला दिवस ख्रिस्ती शाब्बाथ झाला. कारण जेव्हां मोश्याकडून लावून दिल्हेली यहूदी व्यवस्था बंद झाली ह्मणजे तिजकडून दर्शविलेल्या गोष्टी ख्रीस्ताकडून पूर्ण झाल्या, आणि ती व्यवस्था पुढें चालण्याचें अगत्य राहिलें नाहीं; तेव्हां तिच्या ठिकाणीं नवी जी ख्रिस्ती व्यवस्था ती चालू झाली आणि त्याप्रमाणें नवा शाब्बाथ दिवसहि तेव्हांपासून चालू व्हावा हें योग्य आहे.

**प्र०** १०. नव्या व्यवस्थेंतल्या भक्तानी ह्मणजे ख्रिस्ती लोकानी सप्तकाचा पहिला दिवस हा ख्रिस्ती शाब्बाथ असा पाळावा असी ईश्वराची इच्छा आहे हें कशावरून समजतें?

उ० याविषयींचीं प्रमाणें पाहतांना प्रथम हें मनांत आणावें कीं शाब्बाथ पाळण्याविषयीं चवथ्या आज्ञेमध्यें जें कांहीं सांगितलें आहे, त्यावरून अमुकच वार शाब्बाथ दिवस असा पाळावा हें कांहीं निश्चित होत नाहीं. परंतु सात दिवसांतून एक दिवस, ह्मणजे कामाचे साहा दिवस गेल्यावर सातवा दिवस शाब्बाथ असा पाळावा एवढेंच त्यावरून ठरतें. आतां सप्तकाचा पहिला दिवस ख्रिस्ती शाब्बाथ व्हावा याचें पहिलें कारण हें आहे कीं, ख्रीस्त प्रभु याच दिवशीं मेलेल्यांतून उठला, आणि मनुष्यांच्या तारणोपायाच्या कामापासून विसावा घेता झाला. त्यावरून सप्तकाचा पहिला दिवस हा ख्रिस्ती शाब्बाथ झाला. आणि असेंच होण्याची सूचना ईश्वराने पूर्वींपासून करून ठेविली होती असें दिसतें. ख्रीस्ताकडून झालेल्या तारणोपायास शास्त्रामध्यें नवी उत्पत्ति ह्मटलें आहे. आणि या नव्या उत्पत्तीच्या स्मरणोत्साहाच्या पुढें, जुन्या ह्मणजे स्वाभाविक उत्पत्तीचा स्मरणोत्साह विसरला जाईल; ह्मणजे पहिल्या उत्पत्तीचा स्मरणोत्साहाच्या ठिकाणीं दुसऱ्या उत्पत्तीचा स्मरणोत्साह येईल आणि तोच पुढें सर्वदां चालेल असें दर्शविलें आहे. यशा० ६५:१७,१८ पाहा. आणि ज्या दिवशीं ख्रीस्त प्रभु मेलेल्यांतून पुन्हा उठण्याने कोपऱ्याचा मुख्य धोंडा ह्मणजे मनुष्याचा तारणारा असा स्थापित होईल, तो दिवस विशेष स्मरणोत्साहाचा होईल असें गीत ११८:२२–२४. या वाक्यांत दर्शविलें आहे. त्याप्रमाणें ख्रीस्त येशू मेलेल्यांमधून उठला तो सप्तकाचा पहिला दिवस नव्या उत्पत्तीच्या ह्मणजे ख्रीस्ताकडून झालेल्या तारणोपायाच्या कामाच्या स्मरणोत्साहाचा दिवस

व्हावा हें योग्य आहे. आणि प्रग० १:१० यामध्यें ख्रीस्ताच्या पुन्हा उठण्याच्या दिवसाला ह्मणजे सप्तकाच्या पहिल्या दिवसाला प्रभूचा दिवस असें जें ह्मटलें आहे, याचा अर्थ, प्रभूच्या तारणोपायासंबंधी कामाच्या स्मरणोत्साहाचा दिवस हाच असावा असें दिसतें. त्याला प्रभूचा दिवस ह्मणण्यानें तो प्रभूसाठीं पवित्र केलेला ह्मणजे वेगळा केलेला विशेष दिवस असें दर्शविलें आहे. (२) अणखी दुसरा आधार असा आहे कीं, ख्रीस्त मेलेल्यांतून उठला त्या वेळापासून पुढें प्रेषित व पुरातन ख्रिस्ती लोक हे सप्तकाचा पहिलाच दिवस शाब्बाथ दिवस असा पाळीत असत आणि तेव्हांपासून आजपर्यंत सर्व ख्रिस्ती मंडळ्यांची सप्तकाचा पहिला दिवस शाब्बाथ असा पाळण्याची वहिवाट चालत आली आहे, असें शास्त्रांतील वाक्यांवरून व मंडळीच्या बखरीवरून प्रमाण पटतें. परंतु सप्तकाच्या शेवटल्या दिवसाच्या ठिकाणीं सप्तकाचा पहिला दिवस शाब्बाथ असा पाळण्याविषयीं, ख्रीस्त जो शाब्बाथाचा प्रभु आहे, त्याची सूचना झाली असल्यावांचून, अथवा याविषयीं त्याचें अनुमोदन तरी मिळालें असल्यावांचून, प्रेषितांनी शाब्बाथ दिवसाचा असा पालट केला नसेल असें समजणें योग्य आहे. अणखी ख्रीस्ताच्या नेमणुकीप्रमाणें प्रेषित हे ख्रिस्ती मंडळीचे स्थापणारे, पुरस्कर्ते आणि नियम लावून देणारे असे असतां, त्यांचें याविषयींचें उदाहरण देखील, आज्ञेनें लावून दिल्हेल्या नेमाप्रमाणें आह्मी मानावें हें योग्य आहे. यास्तव प्रेषितांच्या उदाहरणावरून आणि प्रेषितांपासून पुढें सर्व ख्रिस्ती मंडळ्यांमध्यें सतत चालत आलेल्या वहिवाटीवरून सप्तकाचा पहिला दिवस हा ख्रिस्ती

शाब्बाथ आहे असें प्रमाण पटतें. मार्क २:२८. प्रग० १:१०. प्रे० २०:७. यांवरून उघड दिसतें कीं प्रेषित व पुरातन ख्रिस्ती लोक हे लौकिकभजन आणि प्रभुभोजनाचा संस्कार जो लौकिकभजनांतला संस्कार आहे, तो ह्याच दिवसीं करीत असत. आणि १ करिं० १६:२ यावरून समजतें कीं पवित्र कामासाठीं धर्मादाय याच दिवसीं जमा करण्याची जी रीत ख्रिस्ती मंडळ्यांत चालत होती, तीस पवित्र आत्म्यानें अनुमोदन देण्यानें हा दिवस विशेष पवित्र कामांचा दिवस असें ठरविलें आहे. अणखी योहा० २०:१, १९, २६ या वाक्यांवरून समजतें कीं ख्रीस्ताचे शिष्य ह्या दिवसीं प्रार्थना करावयास एकत्र मिळाले असतां, ख्रीस्तानें त्यांमध्यें प्रगट होऊन त्यांस आशीर्वाद दिल्हा. आणि प्रे० २:१ यावरून समजतें कीं पंचाशत सणाच्या दिवसीं ह्मणजे सप्तकाच्या प्रथम वारीं शिष्य एकत्र मिळाले असतां, त्यांजवर पवित्र आत्मा उतरला. या वाक्यांवरून इतकें तरी निश्चित्त होतें कीं, सप्तकाचा पहिला दिवस शाब्बाथ असा पाळण्याविषयीं ख्रीस्तानें अनुमोदन दिल्हें आहे. कारण हा दिवस शाब्बाथ असा पाळणें हें जर ख्रीस्ताच्या इच्छेविरुद्ध असतें तर तो ह्या दिवसीं त्यांच्या मंडळींत प्रगट होऊन त्यांस आशीर्वाद देताना व पवित्र आत्म्याचें कृपादान त्यांजवर ओतताना.

प्र० ११. ख्रिस्ती शाब्बाथ दिवस केव्हां लागतो? ह्मणजे तो केव्हांपासून आरंभतो?

उ० कित्येकांचें मत आहे कीं तो संध्याकाळीं ह्मणजे सूर्यास्तापासून लागतो; दुसऱ्यांचें असें मत आहे कीं तो

मध्यरात्रीपासून लागतो;अणखी कित्येकांचें मत आहे कीं तो सकाळीं ह्मणजे सूर्योदयाच्या वेळेस लागतो; अणखी कित्येक असें ह्मणतात कीं तो केव्हांपासून लागतो त्याचा निश्चय करितां येत नाहीं. परंतु आमचें असें मत आहे कीं तो मध्यरात्रीपासून आरंभावा हें फार चांगलें आहे. कारण दुसऱ्या कोणत्याहि वेळेस आरंभल्याने, शाब्बाथाच्या पवित्र कामानंतर, लागलींच प्रापंचिक कामें करण्यांत येऊन, शाब्बाथाच्या पवित्र प्रेरणा बहुतकरून निष्फळ होतील; असें केवळ नाहीं परंतु शाब्बाथाच्या कामांनंतर लागलेंच प्रापंचिक काम करावयाचें असल्यावरून शाब्बाथाच्या काळांत त्या कामाविषयींचे विचार मनांत येतील, आणि त्या कामाची कांहीं तयारीहि शाब्बाथ काळांत करण्यांत येऊन शाब्बाथ विटाळविला जाण्याचें मोठें भय आहे. ह्मणून मध्यरात्रीपासून शाब्बाथ आरंभावा हें योग्य दिसतें.

प्र० १२. शाब्बाथ दिवस कसा पाळावा?

उ० तो पवित्र दिवस असा पाळावा; ह्मणजे नित्याच्या व्यवहारिक आणि प्रापंचिक कामांपासून विसावा घेऊन, पवित्र ह्मणजे आत्मिक व परमार्थसंबंधी कामें, मात्र त्या दिवसीं करावीं. चाकरीसंबंधी सर्व कामें डामडौल आणि विलासभोग यांविषयींचीं सर्व कामें, आळसीपणा व सुस्ताई, मुशाफरी व देशाटण, घरोघर भेटी घेत हिंडणें, कर्मणुकीसाठीं व गम्मतीसाठीं शेतें व बागबगीचे यांमध्यें हवा घेण्यास जाणें, किंवा शहरांतील रस्त्यांत मौज पाहत हिंडणें, जगिक गोष्टींविषयीं भाषण करणें, आणि व्यवहारिक किंवा विद्येविषयींचीं किंवा नवलाईचीं पुस्तकें

वाचणें; हीं सर्व कामें व यांविषयींचे सर्व विचार या दिवसीं वर्ज आहेत. परंतु एकांतांतील व कुटुंबांतील व लौकिकांतील ह्मणजे मंडळींतील ईश्वरी भक्तिसंबंधी सर्व कामें करणें, आणि शास्त्र व शास्त्रसंबंधी दुसरीं पुस्तकें वाचणें, मनन करणें, व तीं दुसऱ्यांस शिकविणें, व धर्मसंबंधी भाषण करणें, असल्या पवित्र ह्मणजे परमार्थिक कामानी तो दिवस घालवावा. आणि तो दिवस अशा रीतीने पाळतां यावा ह्मणून तो दिवस येण्याच्या पूर्वीं योग्य तयारी करीत जावी आणि तो दिवस प्रार्थनेने आरंभावा हें योग्य आहे. निर्ग० २०:८–११. इर्मे० १७:२१,२२. नेह० १३:१५. यशा० ५८:१३,१४.

प्र० १३. अगत्याचीं आणि दयेचीं कामें शाब्बाथ दिवसीं करण्यास कांहीं प्रत्यवाय आहे कीं काय?

उ० कांहीं नाहीं. रोग्यांस निरोगी करणें, दुःखितांचें समाधान करणें, हलाखींतल्यांचें साह्य करणें; आणि गरजवंतांच्या गरजा करणें, यांविषयींचीं जीं कामें आदल्या दिवसीं करितां आलीं नाहींत व पुढल्या दिवसावर लोटतां येत नाहींत, तीं कामें शाब्बाथ दिवसीं करण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. मार्क. २:२७. लुका १३:१५,१६.

प्र० १४. ख्रिस्ती शाब्बाथ दिवसाला कोणतें नांव शोभतें?

उ० प्रभूचा दिवस, सप्तकाचा पहिला दिवस, किंवा विश्रामवार, यांतून कोणतेंहि नांव ख्रिस्ती शाब्बाथास लावण्यास हरकत नाहीं. परंतु आदित्यवार हें नांव ख्रिस्ती शाब्बाथास शोभत नाहीं.

प्र० १५. शाब्बाथ दिवस पाळण्याचा नेम फार अगत्याचा आहे कीं काय?

उ० होय फार अगत्याचा आहे. कारण कीं हा नेम योग्य प्रकारें पाळण्याने सद्धर्माचें ज्ञान व ईश्वराची भक्ति, हीं लोकांमध्यें प्रवृत्त राहून लोकांचें ऐहिक व पारलौकिक हित जसें होतें, तसें दुसऱ्या कोणत्याहि नेमाकडून कधीं झालें नाहीं. ज्या ठिकाणीं हा नेम योग्य प्रकारें पाळितात त्या ठिकाणचे लोक दुसऱ्या सर्वांहून सुज्ञ सद्गुणी आणि सुखी असतात, असें सर्वत्र दिसून आलें आहे. यास्तव हा दिवस आपण योग्य रीतीने पाळावा व दुसऱ्यांकडून या दिवसाच्या नेमाविरुद्ध कांहीं होऊं न देण्याविषयींचा बंदोबस्त करण्यास झटावें, हें सर्व ईश्वरभक्तांस फार अवश्य आहे.

---

## प्रकरण २८.

## मंडळी.

प्र० १. ईश्वराच्या भक्तमंडळीच्या वेगळाल्या अवस्था दर्शविण्यासाठीं, कोणत्या निरनिराळ्या संज्ञा तिला लाविल्या आहेत?

उ० सार्वत्रिक अथवा पृथक्, आणि दृश्य अथवा अदृश्य, आणि युद्धप्रवृत्त अथवा जयवंत, अशा निरनिराळ्या संज्ञा तिला लाविल्या आहेत.

प्र० २. सार्वत्रिक मंडळी ह्मणजे काय?

उ० ह्या पृथ्वींतील जे मनुष्य आपणांस ईश्वरभक्त ह्मणवितात; ह्मणजे जे कोणी ईश्वराच्या शास्त्रावर आणि

ख्रीस्त प्रभूवर विश्वास ठेवितों असें दाखवितात, आणि ईश्वराच्या भक्तमंडळींत प्रसिद्धपणें मिळाले आहेत, त्या सर्वांमिळून जी मंडळी, तिला सार्वत्रिक मंडळी ह्मणतात. आणि ह्या पृथ्वीवरील जे मनुष्य निदानीं पवित्र केले जाऊन तारण पावतील, त्या सर्वांमिळून जी मंडळी तिलाहि सार्व-त्रिक मंडळी ह्मटलें आहे. एफे० १:१०,२२,२३.

प्र० ३. पृथक् मंडळी ह्मणजे काय?

उ० ख्रिस्ती झालेलीं अमुक मनुष्यें, जीं ख्रिस्ती धर्माचे मुख्य सिद्धांत अंगीकारून त्यांप्रमाणें बरेंच चालतात, आणि ख्रीस्ताने लावून दिल्हेले नेम विधि आणि संस्कार, हे मंडळींतल्या सर्वांबरोबर पाळण्याचा करार करितात आणि त्यांप्रमाणें चालण्यास एकमताने झटतात, त्या सर्वांमिळून जी मंडळी तिला पृथक् ख्रिस्ती मंडळी ह्मटलें आहे. रोम, करिंथ, एफेसस, फिलिपै, कलसै, आणि थेसलनिका इ० ठिकाणीं ज्या मंडळ्या होत्या, त्या अशाच पृथक् मंडळ्या होत्या. प्रग० २:७. रोम० १६:१,४,५,१६. १ करिं० १:२.

प्र० ४. दृश्य मंडळी ह्मणजे काय?

उ० ह्या पृथ्वीवरील ज्या मनुष्यानी ख्रिस्ती शास्त्रांत शिकविलेला धर्म उघडपणें स्वीकारिला आहे आणि ईश्वराने लावून दिल्हेल्या नेमाप्रमाणें ईश्वरासीं व त्याच्या भक्तांसीं करार केला आहे, त्या सर्वांमिळून जी मंडळी, तिला दृश्य मंडळी ह्मटलें आहे. १ करिं० १:२. ५:४,१२.

प्र० ५. अदृश्य मंडळी ह्मणजे काय?

उ० ज्या कोणांच्या ठायीं खरें धार्मिकपण आहे; ह्मणजे जे कोणी खरेपणाने आणि मनोभावाने प्रभु येशू ख्रीस्ता-

वर प्रीति करितात, आणि शास्त्रांतील नेम पाळितात, ते दृश्य मंडळींत मिळालेले असोत किंवा नसोत, तरी त्या सर्वांमिळून जी मंडळी तिला, अदृश्य मंडळी ह्मटलें आहे. २ तिम. २:१९. १करिं० १२:१२,१३. रोम० ११:४.

प्र० ६. युद्धप्रवृत्त मंडळी ह्मणजे काय?

उ० ह्या पृथ्वीवरील सर्व खरे ख्रिस्ती लोक जे ह्या आयुष्यांत असतां आपल्या ठायीं असणारें दुष्टपण, पाप, सैतान, आणि जग, यांसीं सतत लढाई करून पवित्रता साधण्यास आणि वाढविण्यास झटतात, त्या सर्वांमिळून जी मंडळी, तिला युद्धप्रवृत्त मंडळी ह्मटलें आहे. १ तिम० ६:१२. प्रग० २१:७. एफे० ६:१२.

प्र० ७. जयवंत मंडळी ह्मणजे काय?

उ० जे सद्भक्त पूर्ण होऊन गौरवांत गेले आहेत, ह्मणजे पवित्रता आणि सुख यांमध्यें स्थिर होऊन आकाशवासी झाले आहेत, त्या सर्वांमिळून जी मंडळी तिला जयवंत मंडळी ह्मटलें आहे. प्रग० ५:९.

प्र० ८. कोणीएका पृथक् मंडळीची स्थापना कशाने होती?

उ० परस्पर करार ह्मणजे वचन करण्याने होती. कारण कोणत्याहि प्रकारची मंडळी स्थापित होऊन चालण्यासाठीं, तींतील लोकांमध्यें ऐक्यतेचें कांहीं बंधन ह्मणजे कांहीं परस्पर करार किंवा सर्वांस मान्य असें कांहीं सहवाससंबंधी नेम असणें अवश्य आहे.

प्र० ९. ईश्वरभक्तांच्या मंडळीची मूळस्थापना ह्या जगांत केव्हां झाली?

उ० मनुष्य पापांत पडल्यावर थोड्याच काळाने ईश्व-

राच्या भक्तमंडळीची मूळस्थापना ह्या पृथ्वीवर झाली. उत्प० ३:२१ यांत सांगितलें आहे कीं, "तेव्हां ईश्वराने आदामासाठीं आणि त्याच्या बायकोसाठीं कातड्याचीं वस्त्रें केलीं आणि त्यांस नेसविलीं." यावरून दिसतें कीं, आदाम आणि हव्वा यानी पुढें लवकरच आपल्या पापाचा पश्चात्ताप केला आणि पशूंचे यज्ञ जे पुढें होणारा तारणारा प्रभु येशू खीस्त याच्या प्रायश्चित्ताचे दाखले होते, ते वाहिले असतील, आणि त्यांच्या कातड्यांचीं वस्त्रें करून ईश्वराने त्यांस नेसविलीं. आणि जर त्यानी याप्रमाणें पशुयज्ञ केले असले, तर त्यावरून स्पष्ट अनुमान होतें कीं ते तारणाऱ्यावर विश्वासणारे असावे. आणि त्यांचा दुसरा पुत्र हाबेल हा तारणाऱ्यावर विश्वासणारा होता याविषयीं तर कांहींच संशय नाहीं. इब्री ११:४.

प्र० १०. मंडळींत मिळण्यास कोण योग्य आहे?

उ० अनुभविक ह्मणजे खरें धार्मिकपण ज्याच्या ठायीं आहे; ह्मणजे ज्याने पापाचा खरा पश्चात्ताप करून खीस्तावर विश्वास ठेविला आहे, तो मंडळींत मिळण्यास योग्य आहे. प्रे० ८:३७. २:४१.

प्र० ११. जे दृश्य मंडळींत मिळालेले आहेत, त्या सर्वांच्याच ठायीं खरें धार्मिकपण असतें कीं काय?

उ० सर्वांच्याच ठायीं असतें असें नाहीं. कारण त्यांमध्यें कोणी ढोंगी आणि अधार्मिकहि असतात. ज्या मंडळींत कोणीच अधार्मिक अथवा ढोंगी कधीं दिसून आला नाहीं असी एकहि पृथक् मंडळी अढळण्यांत आली नाहीं. खीस्ताच्या पहिल्या बारा शिष्यांत देखील एक जण

अधार्मिक होता. मात्थी १३:४७. ७:२१–२३. योहा० ६:७०.

प्र० १२. जर असें आहे तर ईश्वराने ह्या पृथ्वीवर आपली भक्तमंडळी स्थापण्याचा नेम कशासाठीं लाविला?

उ० सद्धर्माच्या सिद्धांतांचें ज्ञान मनुष्यांस होऊन, त्यांनी ते मानावे व पाळावे आणि शास्त्रांत सांगितलेले विधि आणि संस्कार चालावे आणि मनुष्यमात्रांमध्यें पवित्रपण आणि सुख यांची वृद्धि व्हावी आणि ईश्वराच्या भक्तांची पूर्णता व्हावी; या उद्देशाने ईश्वराने आपली दृश्य मंडळी या पृथ्वीवर स्थापिली आहे. एफे० ४:११–१३. ५:२७.

प्र० १३. ख्रिस्ती मंडळीचे संस्कार किती आहेत?

उ० बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे दोनच आहेत. मात्थी २८:१९. १ करिं० ११:२३–२५.

प्र० १४. युद्धप्रवृत्त मंडळीचा परिणाम काय व्हावयाचा आहे?

उ० तिजविषयीं ईश्वराची योजना असी आहे कीं, ती उत्तरोत्तर वाढत जाऊन सर्व जगामध्यें व्यापावी आणि पुढें जगाच्या शेवटापर्यंत टिकून राहावी. यशा० २:२. मात्थी १६:१८.

---

## प्रकरण २९.

## बाप्तिस्मा.

प्र० १. बाप्तिस्मा ह्मणजे काय?

उ० बाप्तिस्मा हा येशू ख्रीस्ताने लावून दिल्हेला एक संस्कार आहे; ह्मणजे बाप, पुत्र आणि पवित्र आत्मा याच्या

नांवाने मनुष्यांच्या अंगावर पाणी घालणें, यास बाप्तिस्मा ह्मटलें आहे. मात्थी २८:१९.

प्र० २. हा संस्कार करण्याचा नेम केव्हां लावून दिल्हा?

उ० ख्रीस्त येशू मेलेल्यांतून उठल्यावर तो आकाशांत जाण्याच्या पूर्वीं त्याने हा संस्कार लावून दिल्हा. आणि ईश्वराच्या मंडळींत मिळण्याचा हा नवा संस्कार लावून देण्याने, जुन्या व्यवस्थेंत मोश्याकडून लावून दिल्हेला सुंता करण्याचा संस्कार स्पष्टपणें आणि प्रसिद्धपणें रद्द केला, ह्मणजे बंद केला असें दाखविलें गेलें. आणि तेव्हांपासून मोश्याकडून लाविलेली जुनी व्यवस्था बंद होऊन ख्रीस्ताने लावून दिल्हेली नवी व्यवस्था ईश्वरी आज्ञेने चालू झाली आहे असें समजावें. मात्थी २८:१९.

प्र० ३. बाप्तिस्म्याच्या संस्काराकडून काय दर्शविलें जातें?

उ० शरिराचा मळ काढून त्याला निर्मळ करण्यासाठीं जसें पाण्याचें स्नान ह्मणजे धुणें अवश्य आहे, तसेंच आत्म्याचें भ्रष्टपण व अशुद्धता काढून त्याला पवित्र व शुद्ध करण्यासाठीं, पवित्र आत्म्याचें स्नान ह्मणजे पवित्र करणाऱ्या प्रेरणा मिळणें अवश्य आहे; असा अर्थ या संस्काराकडून दर्शविला जातो. हा बाप्तिस्मा, आत्मिक ह्मणजे मानसिक शुद्धीकरणाचा बाह्य व दृश्य दाखला असा आहे. यावरून समजावें कीं, ह्या बाप्तिस्म्याकडून मनाचा पुनर्जन्म होतो असें नाहीं, पण मनाच्या पुनर्जन्माची उपमा मात्र या बाप्तिस्म्याकडून दर्शविली जाती. अणखी हा बाप्तिस्मा, ईश्वर आपल्या भक्तांसीं जो कृपेचा करार करितो, त्याचा

दृश्य शिक्का असा, आणि ख्रिस्ती धर्मप्रवेशाचा ह्मणजे स्वीकाराचा प्रथम संस्कार असाहि आहे. ह्मणजे ख्रीस्ताने लावून दिल्हेल्या नेमाप्रमाणें बाप्तिस्मा घेण्यानेच ख्रिस्ती धर्माचा लौकिक स्वीकार होतो. आणि जो कोणी हा घेतो, तो असें करण्याने ईश्वर जो बाप, पुत्र आणि पवित्र आत्मा त्यांप्रत आपणास समर्पितो; ह्मणजे त्यांची भक्ति व सेवा मनोभावाने आणि सर्वदां करण्याविषयीं लौकिक करार करितो, असें दर्शविलें जातें. तित. ३:५. प्रे० १:५. १ पेत्र. १:२.

**प्र०** ४. बाप्तिस्मा कोणी द्यावा?

उ० शुभवर्त्तमानाच्या नियमित सेवकाने; ह्मणजे ज्याचा बाप्तिस्मा ईश्वरी नेमाप्रमाणें यथाविधि झाला आहे, व जो ईश्वरी नेमणुकीप्रमाणें धर्मोपदेशकाच्या कामावर नेमून ठेविलेला आहे, त्यानेच बाप्तिस्म्याचा संस्कार द्यावा. कारण जेव्हां तो या कामावर नेमलेला होऊन हा संस्कार देतो तेव्हां ख्रीस्ताने त्यास दिल्हेल्या अधिकाराने ह्मणजे ख्रीस्ताच्या वतीने, तो हा संस्कार देतो असें आहे.

**प्र०** ५. बाप्तिस्म्याचा संस्कार घेण्यास कोण योग्य आहेत?

उ० जे कोणी पापाचा पश्चात्ताप करून ख्रीस्तावर विश्वास ठेवितों असें दाखवितात आणि त्याच्या आज्ञा पाळावयास झटतात, ते हा संस्कार घेण्यास योग्य आहेत. आणि दृश्य मंडळींतल्यांचीं जीं लेंकरें अज्ञान अवस्थेंत आहेत, तीं आपल्या आईबापांच्या किंवा पाळकांच्या इच्छेने ईश्वरास अर्पिलीं जातात, तेव्हां तींहि हा संस्कार पावण्यास योग्य आहेत.

प्र० ६. जे ख्रीस्तावर विश्वास ठेवितात, ते हा संस्कार घेण्यास योग्य आहेत, हें कशावरून समजतें ?

उ० (१) जे प्रौढ आहेत ह्मणजे जे विश्वास ठेवण्याजोगे आहेत, त्यानी विश्वास धरून बाप्तिस्मा घ्यावा असें शास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे. (२) आणि प्रौढांतील ज्यानी विश्वास ठेविला, त्यांसच प्रौढपणीं बाप्तिस्मा दिल्ह्याचे दाखले शास्त्रांत आहेत.

पंन्नासाव्या दिवसाच्या सणांत जे तीन हजार ख्रिस्ती झाले त्यांचा व त्या शंढ हबश्याचा, व त्या तुरुंगाच्या नायकाचा, व त्या लुदीयेचा, आणि शोमरोनांत जे ख्रिस्ती झाले त्यांचा, बाप्तिस्मा त्यानी विश्वास धरल्यावरूनच झाला. यावरून सिद्ध होतें कीं, जे प्रौढ आहेत, त्यानी बाप्तिस्मा पावण्यासाठीं विश्वास धरिला पाहिजे. गीत ९०:१६. प्रे० २:४१. ८:१२,३७. १६:१४, १५, ३१, ३३.

प्र० ७. दृश्य मंडळींतील लोकांचीं ह्मणजे ईश्वराच्या कराराखालीं आलेल्या विश्वासणाऱ्यांचीं बाळकें बाप्तिस्मा पावण्यास योग्य आहेत, हें कशावरून समजतें ?

उ० याविषयींचें प्रमाण पाहण्यापूर्वीं हें मनांत वागविलें पाहिजे कीं, जे विश्वास धरण्याजोगे आहेत, त्यानी विश्वास धरून बाप्तिस्मा घ्यावा अशा अर्थाचीं जीं शास्त्रवाक्यें वर सांगितलीं आहेत, त्यांवरून अज्ञान अवस्थेंतील लेंकरें, ज्यांस विश्वास धरितां येत नाहीं, त्यांस बाप्तिस्मा देऊं नये असें ठरत नाहीं. जर कोणी ह्मणेल कीं त्याच वाक्यांवरून बाळकांचा बाप्तिस्मा करूं नये असें ठरतें, तर मग जीं बाळकें प्रौढ होऊन विश्वास ठेवण्याजोगीं होण्यापूर्वीं मरण पावतात, तीं सर्व नाशास जातात असेंहि त्याच वाक्यांवरून

ठरतें असें ह्मटलें पाहिजे. कारण कीं त्या वाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, जो विश्वास धरणार नाहीं तो दंडी ठरविला जाईल. आणि बाळकें तर विश्वास ठेवण्यास शक्तिमान नाहींत, यास्तव सदरहू मताप्रमाणें तीं सर्व नाश पावतात असें ह्मटलें पाहिजे. परंतु जीं बाळकें विश्वास धरण्याजोगीं होण्यापूर्वीं मरण पावतात, तीं सर्व नाशास जातात, असें कोणाच्याने ह्मणवत नाहीं. यास्तव बाप्तिस्मा पावण्यासाठीं विश्वास धरिला पाहिजे, असें ज्या शास्त्रवाक्यांत सांगितलें आहे, त्यांचा अर्थ असा समजणें योग्य आहे कीं, तें सांगणें जे प्रौढ आहेत, ह्मणजे विश्वास धरण्याजोगे आहेत, त्यांस मात्र लागतें. आणि विश्वास धरण्याजोगीं झालीं नाहींत अशा बाळकांस तें सांगणें लागत नाहीं. ह्मणून जे प्रौढ आहेत, त्यांनीं बाप्तिस्मा पावण्यासाठीं विश्वास धरिला पाहिजे, ह्या ठरावावरून विश्वास धरण्यास असमर्थ असीं जीं बाळकें, त्यांस बाप्तिस्मा द्यावा किंवा न द्यावा, याविषयीं कांहींच ठरत नाहीं. कारण कीं त्या वाक्यांत विश्वास ठेवण्यास असमर्थ अशा बाळकांच्या बाप्तिस्म्याविषयीं कांहींच सांगितलें नाहीं. यावरून उघड आहे कीं, विश्वासणाऱ्यांच्या बाळकांस बाप्तिस्मा देऊं नये असें शास्त्रांत कोठेंहि सांगितलें नाहीं व दर्शविलेंहि नाहीं. यास्तव बाळकांस बाप्तिस्मा देऊं नये याविषयींचें कांहीं प्रमाण शास्त्रांतील वाक्यांवरून कोणाच्याने देववत नाहीं, हें उघड आहे. आतां ईश्वराच्या कराराखालीं आलेल्या विश्वासणाऱ्यांच्या बाळकांस बाप्तिस्मा देणें योग्य आहे हें पुढील प्रमाणांवरून दिसून येतें. (१) ईश्वराने आब्राहामासीं जो करार केला तो कृपेचा करार होता. आणि तो केवळ आब्राहामास व त्याच्या

धराण्यासच लागत होता असें नाहीं, तर तो त्याच्या सर्व संतानास आणि विशेषेंकरून विश्वासाकडून जीं त्याचीं लेंकरें त्या सर्वांस तो सर्वकाळचा करार असा आहे. त्या कराराचा शिक्का यहूदी व्यवस्थेमध्यें सुंता ही होती, आणि ती सर्व यहूदी व यहूदी धर्मानुसारी पुरुषांस व पुरुषलेंकरांस करावयाची होती. परंतु ख्रिस्ती व्यवस्थेमध्यें, त्याच कराराचा शिक्का बाप्तिस्मा हा आहे. आणि हा जसा पुरुषांस तसा स्त्रियांसहि द्यावयाचा आहे, कारण कीं तीं सर्व ख्रीस्त येशूकडील एक आहेत. यहूदी व्यवस्थेंतील त्या कराराचा शिक्का ह्मणजे सुंता ही यहूदी मंडळींतील लोकांच्या बाळकांसहि करावयाचा नेम होता; त्यावरून ठरतें कीं, ईश्वराच्या त्याच कराराचा ख्रिस्ती व्यवस्थेंतील शिक्का जो बाप्तिस्मा आहे तो ख्रिस्ती मंडळींतल्या लोकांच्या बाळकांस देणें योग्य आहे. कारण ज्यांस तो शिक्का मिळतो, त्यांस ईश्वराच्या करारामध्यें भागीपण आहे, असें त्याकडून दर्शविलें जातें. आणि विश्वासणाऱ्यांच्या लेंकरांस त्या करारामध्यें भागीपण आहेच. कारण ईश्वर आब्राहामास ह्मणाला, मी तुजसीं आणि तुझ्या संतानासीं सर्वकालिक करार करितों. ह्मणून ज्यापेक्षां विश्वासणाऱ्यांच्या लेंकरांस ईश्वराच्या त्या करारामध्यें भागीपण आहे, त्यापेक्षां त्या कराराच्या भागीपणाचा शिक्काहि त्यांस मिळणें योग्य आहे. ख्रीस्ताच्या येण्यापूर्वीं ईश्वराच्या भक्तमंडळीस यहूदी मंडळी हें नांव होतें, आणि ख्रीस्ताच्या येण्यानंतर ईश्वराच्या भक्तमंडळीस ख्रिस्ती मंडळी हें नांव झालें. परंतु मंडळीचें नांव बदलल्यावरून मंडळींतल्यांचे हक्क व अधिकार बदलले असें नाहीं. यास्तव जुन्या व्यवस्थेंतील भक्तांच्या

बाळकांस ईश्वराच्या कराराच्या भागीपणाचा शिक्का देण्याविषयीं जें कारण व जो आधार होता, तेंच कारण व तोच आधार नव्या व्यवस्थेंतील भक्तांच्या बाळकांस, त्याच कराराचा शिक्का जो आतां बाप्तिस्मा आहे, तो देण्याविषयीं लागू आहे. कारण जरी ईश्वराच्या कराराचा शिक्का बदलून सुंतेच्या ठिकाणीं बाप्तिस्मा झाला, तरी ईश्वराचा करार कांहीं बदलला नाहीं. ह्मणून त्या कराराच्या भागीपणाची खूण किंवा शिक्का कोणास मिळावा याविषयीं कांहीं नवा नेम झाला नाहीं. यास्तव जसें जुन्या व्यवस्थेंत, तसें नव्या व्यवस्थेंतहि ईश्वराच्या कराराचा शिक्का त्या कराराखालीं आलेल्यांच्या बाळकांस देणें योग्य आहे. उत्प० १७:७,९,१०,११,१२,२६, २७. २१:४. रोम. ४:११,१६. ११:१६–२०. १५:८. गाला० ३:७,१७,२८,२९. प्रे० २:३८,३९. एफे० ३:६. इर्मे० ३०:२०. १ करिं० ७:१४.*

---

* सूचना. डाकतर वाल हा बाळकांच्या बाप्तिस्म्याच्या बखरीमध्यें असें लिहितो कीं, यहूदी किंवा यहूदीमतानुसारी लोकांचीं जीं लेंकरें ईश्वराच्या कराराच्या संबंधांत आलीं होतीं, त्यांस त्या कराराच्या संबंधांत येण्याची कांहीं तरी खूण किंवा शिक्का मिळण्याची रीत आब्राहामाच्या वेळापासून आजपर्यंत अखंड व सतत चालत आली आहे, असें चांगल्या आधारावरून समजलें आहे. त्या रीतीचा प्रकार असा होता. आब्राहामाच्या संतानांतील सर्व नरबाळकांची सुंता करण्यानें त्यांस ईश्वराच्या कराराच्या संबंधीं करीत असत. आणि विदेश्यांतील जे कोणी यहूदीमतानुसारी होत असत, त्यांची व त्यांच्या नरबाळकांची सुंता होत असे, आणि त्याशिवाय मंडळींत मिळतांना त्यांस बाप्तिस्मा घेणें व पशुयज्ञ करणें हें करावें लागत असे. आणि त्यांच्या बायका व कन्या, यांस केवळ पशुयज्ञ करणें, व बाप्तिस्मा घेणें, एवढेंच करावयाचें असे. परंतु नव्या व्यवस्थेमध्यें, सुंता व पशुयज्ञ हीं रद्द झालीं असतां, जे कोणी ईश्वराच्या कराराच्या संबंधांत येतात, त्यांस त्या कराराच्या भागीपणाची

अणखी (२) ख्रीस्ताने बाळकांसीं जी वर्त्तणूक केली व त्यांविषयीं जें ह्मटलें, त्यावरून बाळकांस बाप्तिस्मा देणें योग्य आहे असें दिसतें. आपल्या बाळकांस ख्रीस्ताने आशीर्वाद द्यावा या हेतूने जेव्हां लोक आपलीं बाळकें ख्रीस्ताजवळ आणूं लागले, तेव्हां ख्रीस्ताच्या शिष्यांनीं त्यांस मना केलें, तरी ख्रीस्ताने आपल्या शिष्यांचा निषेध करून ह्मटलें कीं, "बाळकांस मजजवळ येऊं द्या आणि त्यांस मना करूं नका." आणि मग ख्रीस्ताने त्या बाळकांस उचलून आपल्या हातांवर घेतलें, आणि त्यांस आशीर्वाद देऊन ह्मटलें, "आकाशाचें राज्य अशांचेंच आहे." एथें "आकाशाचें राज्य" या शब्दांचा अर्थ या जगांतील भक्तमंडळी असा असो किंवा आकाशांत गेलेल्या

---

खूण किंवा शिक्का घेण्यासाठीं, बाप्तिस्मा यावांचून दुसरें कांहीं करावयाचें राहिलें नाहीं. ह्मणून आमच्या प्रभु येशू ख्रीस्ताने सुंता, यज्ञ, आणि बाप्तिस्मा या तिहींतील, बाप्तिस्मा हाच विधि निवडून घेऊन जे कोणी ख्रिस्ती मंडळींत मिळतात, त्यांनी बाप्तिस्म्याचा संस्कार घेण्याने ख्रिस्ती मंडळींत मिळावें असा नेम केला आहे. योहा. ३:५. मात्थी २८:१९. त्या तिहींतील बाप्तिस्मा हाच विधि आपल्या मंडळींत मिळण्याचा संस्कार होण्यासाठीं ख्रीस्ताने निवडिला, याचें कारण असें असेल कीं, हा संस्कार सर्वांहून सुलभ व सर्वांस सोईवार असा असतां, जसा पुरूषांस तसा स्त्रियांसहि घेतां येईल; आणि तेणेंकडून मंडळींत मिळण्याविषयीं पुरूष किंवा स्त्री यांचा कांहीं भेद केल्यासारिखें दिसणार नाहीं. आणि ईश्वराच्या कराराच्या भागीपणाचा शिक्का पावण्यांत पुरूष व स्त्रिया यांमध्यें कांहीं भेद दाखविला जाणार नाहीं असा संस्कार ख्रिस्ती व्यवस्थेमध्यें असणें अगत्य आहे. कारण कीं ख्रिस्ती व्यवस्थेमध्यें विश्वासणारे पुरूष व विश्वासणाऱ्या बायका हीं उभयतां ख्रीस्त येशूकडील एक आहेत; (ह्मणजे एकसारिखीं आहेत.) गाला. ३:२८. आणि कल. २:११,१२ या वाक्यांमध्यें पौलसाने बाप्तिस्म्याला ख्रीस्तसंबंधी सुंता ह्मणण्याने दर्शविलें आहे कीं, बाप्तिस्मा सुंतेच्या ठिकाणीं आला आहे आणि त्याचा अभिप्राय सुंतेसारिखाच आहे.

भक्तांची मंडळी असा असो; तरी त्यावरून एवढें निश्चित होतें कीं, विश्वासणाऱ्यांचीं बाळकेंहि ईश्वराच्या कराराच्या संबंधांत आहेत. आणि जर तीं ईश्वराच्या राज्यांत जाण्यास योग्य आहेत, तर त्याच्या कराराच्या भागीपणाचा शिक्का जो बाप्तिस्मा आहे, तो पावण्यास तीं योग्य नाहींत असें कसें ह्मणावें? लूक १८:१५,१६. (३) अणखी प्रेषित हे विश्वासणाऱ्यांच्या घरांतील सर्वांस बाप्तिस्मा देत असत. त्यानी तुरुंगाच्या नायकास व त्याच्या घरांतील सर्वांस बाप्तिस्मा दिल्हा; तसेंच लुदियेला व तिच्या सर्व कुटुंबाला बाप्तिस्मा दिल्हा; तसेंच स्तेफनसाच्या कुटुंबाचा बाप्तिस्मा पौलसाने केला, असें सांगितलें आहे. आणि विश्वास ठेवितां येत नाहीं असें एकहि बाळक, त्यांतील एकाहि कुटुंबांत नव्हतें असें ह्मणणें शोभत नाहीं, पण त्यांत कांहीं तरी बाळकें होतीं ही कल्पना संभव्य दिसती. ह्मणून घरांतील सर्वांचा बाप्तिस्मा केला या ह्मणण्यावरून त्यांतील बाळकांचाहि बाप्तिस्मा केला आणि तोहि त्यांच्या विश्वासावरून नव्हे, परंतु त्यांच्या वडिलांच्या विश्वासावरून केला असें अनुमान होतें. आणि मंडळींतले संस्कार देण्याविषयींची प्रेषितांची जी रीत होती, ती आमचा कित्ता किंवा नेम आहे असें मानणें योग्य आहे. यास्तव त्या कुटुंबांत कांहीं लेंकरें होतीं ही कल्पना खरी असेल तर, त्यावरून विश्वासणाऱ्यांच्या लेंकरांचा बाप्तिस्मा करणें योग्य आहे, असेंहि सिद्ध होईल. प्रे० १६:१५,३३. १ करिं० १:१६. अणखी (४) विश्वासणाऱ्यांच्या लेंकरांचा बाप्तिस्मा करण्याची चाल प्रेषितांच्या काळापासून आजपर्यंत ख्रिस्ती मंडळीमध्यें अखंड चालत आली आहे. त्यावरून अनुमान

होतें कीं ती चाल प्रेषितांनीं लावून दिल्ही असावी; कारण जर ही चाल त्यांच्या इच्छेविरुद्ध चालू झाली असती, तर त्यांनीं इची मनाई केली असती, परंतु ही चाल त्यांच्या काळीं चालत असतांहि त्यांनीं मना केली नाहीं, यावरून ही चाल त्यांस मान्य होती, एवढें तर अगदीं उघड दिसतें. आणि पुरातन काळच्या बहुतकरून सर्व विख्यात ग्रंथकारांनीं ही चाल प्रेषितांनीं लाविली आहे, असें मानून इजविषयीं लिहिलें. आणि कित्येक तर असें स्पष्ट लिहितात कीं, प्रेषितांनींच ही चाल मुळीं लावून दिल्ही आणि त्यावरून ही चाल तेव्हांपासून आजपर्यंत चालत आली आहे. आणि धार्मिक विद्वान व चांगले माहीतगार अशा बहुत ग्रंथकारांच्या ग्रंथांवरून असें कळून येतें कीं, ख्रिस्ती शकाच्या ११ व्या शतकापर्यंत बाळकांच्या बाप्तिस्म्याविषयीं कोणीं कधीं हरकत देखील काढिली नव्हती, तर तो करणें अयोग्य आहे असें ह्मणणें दूरच आहे. यावरून उघड आहे कीं, विश्वासणाऱ्यांच्या बाळकांचा बाप्तिस्मा करूं नये हें मत अलिकडील ह्मणजे नवीन उत्पन्न झालेलें आहे. आणि जे कोणी हें मत धरितात, त्यांच्याने याविषयीं कांहीं शास्त्राधार दाखववत नाहीं.*

---

* सूचना. आरिजेन जो प्रेषितांच्या काळाच्या फार जवळ होता, आणि ज्याला ख्रिस्ती मंडळींच्या बखरीविषयीं त्या काळच्या दुसऱ्या लोकांपेक्षां फार चांगली माहिती होती, तो लिहितो कीं, "विश्वासणाऱ्यांच्या बाळकांचा बाप्तिस्मा करण्याची आज्ञा प्रेषितांनींच लावून दिल्ही." आणि आरिजेनाच्या काळानंतर थोडक्याच वर्षांनीं बाळकांच्या बाप्तिस्म्याविषयींच्या एका गोष्टीचा विचार करण्यासाठीं सासष्ट पाळकांची एक सभा भरली होती. तींत सर्वानुमतें ठरलें कीं, विश्वासणाऱ्यांच्या बाळकांचा बाप्तिस्मा करण्यास, सुंतेप्रमाणें जन्मल्यापासून आठव्या दिवसापर्यंत विलंब करण्याचें अगत्य नाहीं. आठव्या दिवसाच्या आंतहि जेव्हां पाहिजे

अणखी (५) बाळकांचा बाप्तिस्मा करणें योग्य नाहीं अशा मताचा जो परिणाम होईल त्याविषयीं विचार के-

---

ल्हां करण्याविषयीं कांहीं हरकत नाहीं. परंतु याविषयीं हें मनांत ठेवा कीं, बाळकांस बाप्तिस्मा द्यावा किंवा न द्यावा याविषयीं ठराव करण्यासाठीं ही सभा भरली नव्हती, कारण याविषयीं कोणास कांहीं संशय वाटतच नव्हता. परंतु बाळकें आठ दिवसांचीं होण्यापूर्वीं त्यांचा बाप्तिस्मा करण्यास कांहीं हरकत आहे कीं काय, हाच विचार करण्यास ती सभा भरली होती. आगस्तीन जो ख्रिस्ती शकाच्या सुमारें ३५० व्या वर्षीं जन्मला तो सांगतो कीं, बाळकांचा बाप्तिस्मा करण्याचा परिपाठ सर्व ख्रिस्ती मंडळ्यांत चालत आहे. आणि तो पाठ सभांच्या ठरावावरून निघाला असें नाहीं, पण पहिल्यापासून नेहमीं चालत आला आहे. पिलेड्यस जो आगस्तीनाच्याच काळीं होता, आणि ज्यानें एशिया, युरोप आणि आफ्रिका एथील बहुतेक नामांकित ख्रिस्ती मंडळ्या स्वअंगें जाऊन पाहिल्या होत्या, तो ह्मणतो कीं, "सर्वांहून अधार्मिक पाखंड्याला देखील बाळकांचा बाप्तिस्मा करणें योग्य नाहीं, असें ह्मणतां मी कधीं ऐकिलें नाहीं. अणखी ख्रिस्ती शकाच्या चवथ्या शकामध्यें तर्टलियन नावाच्या एका मनुष्यानें सुचविलें कीं, "जीं लेंकरें प्रौढ होण्यापूर्वीं मरण्यासारिखीं दिसतात, तीं अज्ञान अवस्थेंत असतां त्यांस बाप्तिस्मा द्यावा. परंतु जीं प्रौढ होण्याच्या पूर्वीं मरण्यासारिखीं दिसत नाहींत, त्यांचा बाप्तिस्मा करण्यास तीं प्रौढ होत तोंवर विलंब केला तर बरें होईल. कारण लहानपणीं त्यांचा बाप्तिस्मा केल्यावर कदाचित तीं पाप करितील, आणि नाश पावतील. ह्मणून तीं प्रौढ होऊन आपल्या आचरणाविषयीं चांगलें जपण्यास शक्तिमान झाल्यावर त्यांचा बाप्तिस्मा केल्यास बरें होईल." आतां बाप्तिस्मा घेतल्यावर पाप घडल्यास तीं नाश पावतील असा जो त्याचा समज होता, तो अयोग्य आणि शास्त्रविरुद्ध आहे, हें उघडच आहे. यास्तव या भीतीवरून बाप्तिस्म्यास विलंब करण्याविषयींची त्याची सूचनाहि अविचारी आहे, हें उघड आहे. तथापि हा तर्टलियन देखील बाळकांचा बाप्तिस्मा करणें अयोग्य आहे असें कधीं बोलला नाहीं. कारण जीं लेंकरें प्रौढपणापर्यंत वांचण्यासारिखीं नाहींत त्यांचा बाप्तिस्मा अज्ञान अवस्थेंतच करावा असें त्याचें ह्मणणें होतें, आणि वर सांगितलेली त्याची सूचना ग्रेगोरी नामक एकाच मनुष्यानें अंगीकारून आपल्या लेंकरांच्या बाप्तिस्म्याविषयीं तसा विलंब केला असें कोणी कोणी ह्मणतात, परंतु ग्रेगोरी याशिवाय दुसऱ्या कोणी ही सूचना अगदीं मानिली नाहीं. आणि लेंकरांचा बाप्तिस्मा तीं अज्ञान अवस्थेंत असतां करणें योग्य आहे, असेंच

ल्यास हें मत खोटें आहे असें दिसेल. प्रौढपणीं बाप्तिस्मा पावलेल्यांची परंपरा, ह्मणजे ज्यांचा बाप्तिस्मा प्रौढपणीं बाप्तिस्मी झालेल्या मनुष्यांकडून प्रौढपणीं झाला अशा बाप्तिस्मी झालेल्यांची अखंड परंपरा ख्रीस्ताच्या काळापासून आजपर्यंत सतत चालत आली आहे, असें कोणाच्यानें ह्मणवत नाहीं. आणि ज्याचा बाप्तिस्मा यथायोग्य प्रकारें झाला आहे तोच मात्र दुसऱ्यास बाप्तिस्मा देण्यास योग्य आहे, ही गोष्ट तर सर्वत्र कबूल आहे. आणि ज्याचा बाप्तिस्मा प्रौढपणीं बाप्तिस्मा झालेल्या मनुष्याकडून प्रौढपणीं झाला नाहीं, तो तर बाप्तिस्त मताप्रमाणें योग्य प्रकारें बाप्तिस्मा पावलेला नव्हे. ह्मणून तो दुसऱ्या कोणासहि बाप्तिस्मा देण्यास योग्य नाहीं हें उघडच आहे. आणि

---

त्या वेळेच्या सर्व ख्रिस्ती लोकांचें मत होतें; आणि बाळकांचा बाप्तिस्मा करणें अयोग्य आहे असें मानून, त्यांचा बाप्तिस्मा करण्यास विलंब केला असा एकहि मनुष्य त्या काळांत कळून आला नव्हता. आणि पुढील ७०० वर्षांमध्यें तर तर्टलियनासारिखें मत धरणारा कोणीहि कधीं कळून आला नाहीं. आणि या सर्व काळांतले सर्व ख्रिस्ती लोक आपल्या बाळकांस बाप्तिस्मा देववीत असत असें दिसतें;आणि पुढें ख्रिस्ती शकाच्या ११३० व्या वर्षाच्या सुमारास जेव्हां वालडेन्सी लोकांतील एका शाखेच्या लोकांनी असें मत धरिलें कीं, बाळकें तारण पावण्याजोगीं नाहींत, ह्मणून त्यांचा बाप्तिस्मा करूं नये, तेव्हां तें मत वालडेन्सी लोकांतील बहुतेकांनी अगदीं नाकबूल केलें; आणि तें मत धरणारे जे थोडेसे लोक राहिले होते, ते उत्तरोत्तर कमी होत जाऊन कांहीं काळानें अगदीं नाहींसे झाले. आणि तेव्हांपासून सन १५२२ व्या वर्षापर्यंत असें मत धरणारा एकहि मनुष्य कधीं दिसून आला नव्हता. आणि डाकतर गील जो अलिकडे निघालेल्या बाप्तिस्त मताच्या लोकांतील फार नामांकित व विद्वान मनुष्य असा सर्वत्र प्रसिद्ध आहे, तो कबूल करितो कीं, बाळकांचा बाप्तिस्मा करण्याची रीत ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत सर्व ख्रिस्ती मंडळ्यांत चालत आली आहे यांत कांहीं संशय नाहीं.

ज्यापेक्षां प्रौढपणीं बाप्तिस्मी झालेल्या मनुष्याकडून प्रौढपणींच ज्यांचा बाप्तिस्मा झाला, अशांच्या नियमित व अखंड चालत आलेल्या परंपरेचा एकहि मनुष्य सर्व जगांत नाहीं, त्यापेक्षां बाप्तिस्त मताप्रमाणें आजपर्यंत कोणाचाहि बाप्तिस्मा योग्य प्रकारें झाला नाहीं,व दुसरी नवी व्यवस्था ईश्वराने दिल्यावांचून बाप्तिस्त मताप्रमाणें यथायोग्य बाप्तिस्मा पुढेंहि कोणाचा होऊं शकणार नाहीं. ह्मणजे प्रौढपणीं बाप्तिस्मी झालेल्यांच्या हाताने प्रौढपणीं ज्यांचा बाप्तिस्मा होत आला आहे अशा अखंड परंपरेचा एकहि मनुष्य ह्या जगांत नाहीं, ह्मणून ज्यापासून बाप्तिस्मा घेणें योग्य आहे असा एकहि मनुष्य सर्व जगांत नाहीं असें ठरेल. आणि ज्यापासून बाप्तिस्मा घेणें योग्य आहे असा एकहि मनुष्य ज्यापेक्षां पूर्वीं नव्हता आणि आतांहि नाहीं, त्यापेक्षां पूर्वींपासून आजपर्यंत होत आलेला बाळकांचा जसा तसा प्रौढांचाहि बाप्तिस्मा अयोग्य व व्यर्थ आहे, असें ह्मणावें लागेल. परंतु याप्रमाणें सर्वच बाप्तिस्मा अयोग्य व निरूपयोगी आहे, असें तर बाप्तिस्त मताच्या लोकांच्याने देखील ह्मणवणार नाहीं. ह्मणून ज्या मताचा असा शास्त्रविरूद्ध परिणाम होतो, तें मत खोटें असें समजून बाळकांचा बाप्तिस्मा करणें योग्य आहे असें समजणें सर्वांस उचित आहे.

प्र० ८. मंडळींतल्या मनुष्यांनी आपल्या पोटच्या लेंकरांस जसें, तसेंच आपल्या दत्तक व ओंटींत घातलेल्या लेंकरांसहि बाप्तिस्मा देवविण्याने, ईश्वराच्या कराराच्या संबंधीं करावें हें त्यांचें कर्त्तव्यकर्म आहे कीं काय ?

उ० होय, कारण यहूदी व्यवस्थेंतल्या ईश्वरभक्तांनी,

आपल्या दत्तक लेंकरांस ईश्वराच्या कराराचा शिक्का जो त्या वेळेस सुंता होता, तो देवविण्याने त्यांस ईश्वराच्या कराराच्या संबंधी करावें, असा नेम होता. त्यावरून ठरतें कीं, नव्या व्यवस्थेंतील भक्तानींहि त्याचप्रमाणें आपल्या दत्तक व ओंटींत घातलेल्या लेंकरांस, ईश्वराच्या कराराचा शिक्का जो आतां बाप्तिस्मा आहे, तो देवविण्याने त्यांस ईश्वराच्या कराराच्या संबंधी करावें, हें योग्य आहे; यास्तव या कर्त्तव्यकर्माविषयीं कोणी ख्रिस्ती मनुष्याने हयगय करूं नये. उत्प. १७:१२,१३,२६,२७.

प्र० ९. लेंकरांस बाप्तिस्मा देण्याने त्यांस कोणता लाभ होतो?

उ० ज्या गोष्टी करण्याविषयीं ईश्वराने आज्ञा केली आहे, त्या करण्याने जो लाभ आह्मास होतो त्यावरूनच त्या करण्याची अवश्यकता सिद्ध होती असें नाहीं. पण त्या करण्याविषयीं ईश्वराने आज्ञा केली आहे, त्यावरून मुख्यत्वेंकरून त्या करण्याची अवश्यकता सिद्ध होती. यास्तव आपल्या लेंकरांस बाप्तिस्मा देण्याने जो लाभ त्यांस होतो, त्यावरून तो देण्याची अवश्यकता सिद्ध होत नाहीं. तर भक्तानी आपल्या लेंकरांस बाप्तिस्मा देवविण्याने ईश्वराच्या कराराच्या संबंधी करावें, असा नेम ईश्वराने लावून दिल्हा आहे, त्यावरून मुख्यत्वेंकरून आपल्या लेंकरांचा बाप्तिस्मा करण्याची अवश्यकता सिद्ध होती. परंतु ख्रिस्ती मनुष्याच्या लेंकरांस बाप्तिस्मा मिळण्याने त्या लेंकरांचा कांहीं लाभ होत नाहीं असें कोण ह्मणेल? कारण यहूदी व्यवस्थेमध्यें भक्तांच्या लेंकरांची सुंता करण्याने जो लाभ त्या लेंकरांस होत असे, तोच लाभ ख्रिस्ती व्यवस्थेंतील भक्तां-

च्या लेंकरांसहि बाप्तिस्मा मिळण्याने होतो, यांत कांहीं संशय नाहीं. जसें सुंता झालेलीं लेकरें आपली सुंता झाली असल्यावरून आपण सर्व नियमशास्त्र पाळण्यास बांधलेलीं आहों, असें समजत होतीं, तसेंच बाप्तिस्मा पावलेलीं लेंकरेंहि आपला बाप्तिस्मा झाल्यावरून आपण ईश्वराचें सर्व शास्त्र पाळण्यास बांधलेलीं आहों असें समजतील. त्याशिवाय जीं आईबापें आपलीं लेंकरें ईश्वरास अर्पून देण्याने करार करितात कीं, आह्मी त्यांस ईश्वराच्या मार्गीं लावण्यास प्रयत्न करूं, तीं त्यांस सुमार्गास लावण्यास जशीं झटतील, तशीं जीं आईबापें असा करार करीत नाहींत तीं झटणार नाहींत, हें उघड आहे. आणि जे कोणी ईश्वराने नेमलेले विधि व संस्कार विश्वासाने पाळितात, त्यांस ईश्वर विशेष आशीर्वादहि देत असतो. ह्मणूनच जेव्हां धर्माचें संजीवन होतें, तेव्हां ज्यांचा बाप्तिस्मा लाहानपणीं झाला नव्हता त्यांपेक्षां ज्यांचा बाप्तिस्मा लाहानपणीं झाला होता त्यांतील फार अधिक मनुष्यें ईश्वराकडे फिरतात. आणि हल्लीं सर्व जगांत जे धार्मिक ख्रिस्ती आहेत, त्यांमध्यें ज्यांचा बाप्तिस्मा लाहानपणीं झाला होता, असे फार अधिक आहेत. यावरून उघड आहे कीं, ख्रिस्ती लोकानी ईश्वराच्या नेमाप्रमाणें आपल्या लेंकरांस बाप्तिस्मा देवविण्याने तीं ईश्वराला अर्पण करून द्यावीं याकडून त्या लेंकरांचें मोठें कल्याण आहे.

प्र० १०. जीं आईबापें आपल्या लेंकरांस बाप्तिस्मा देवविण्याने त्यांस ईश्वराला अर्पण करितात, तीं तसें करण्याने आपणाला कशाविषयीं बांधून घेतात?

उ० तीं त्यांस ईश्वराला अर्पितांना ईश्वर, दिव्य दूत,

व मनुष्यें यांसमोर असा करार करितात कीं, प्रभूचा बोध आणि शिक्षा यांकडून आह्मी त्यांचा प्रतिपाळ करूं. ह्मणजे आह्मी त्यांस ईश्वराचें शास्त्र वाचावयास शिकवूं व त्यांतील मुख्य सिद्धांतांविषयीं त्यांस उपदेश करून त्यांचीं कर्त्तव्यकर्मे त्यांस समजावून देऊं आणि आपल्या आत्म्यांचा उद्धार साधण्याची मोठी उत्कंठा बाळगण्याविषयीं आह्मी त्यांस शिकवूं, आह्मी त्यांजबरोबर ईश्वराची प्रार्थना करूं व ख्रीस्त येशूला ज्या प्रकारें जाणण्याने सर्वकाळिक जीवन प्राप्त होतें त्या रीतीने त्यांनीं ख्रीस्ताला जाणावें ह्मणून आमच्याकडून होतील तितके उपाय करूं; असा करार ते करितात; ह्मणजे या रीतीने आपल्या लेंकरांचा प्रतिपाळ करण्याविषयीं ते आपणांस बांधून घेतात.

प्र० ११. बाप्तिस्मा करण्याची कोणती रीत योग्य आहे?

उ० बुडविण्याने ह्मणजे मनुष्यास उचलून पाण्यांत बुचकळण्याने बाप्तिस्मा देणें, आणि मनुष्यावर पाणी ओतण्याने किंवा शिंपण्याने बाप्तिस्मा देणें, अशा दोन रीति हल्लीं ख्रिस्ती लोकांमध्यें चालत आहेत. परंतु त्यांतील अमुकच रीतीने बाप्तिस्मा केला पाहिजे असें कोणाच्याने ह्मणवत नाहीं. कारण कीं अमुकच रीतीने बाप्तिस्मा द्यावा असें शास्त्रांत सांगितलें नाहीं. बाप्तिस्मा देण्याविषयींचीं जीं वाक्यें शास्त्रांत आहेत, तीं बाप्तिस्म्याची रीत दर्शविण्याच्या हेतूने लिहिलीं नाहींत, पण बाप्तिस्मा करण्याची अवश्यकता दर्शविण्याच्या हेतूने लिहिलीं आहेत. बाप्तिस्मा हा शब्द ग्रीक भाषेंतला आहे, आणि त्याचा अर्थ पाण्याने भिजविणें असा आहे. मग तें भिजविणें अल्पांशीं असो किंवा सर्वांशीं असो आणि ते पाण्यांत बुचकळण्याने केलेलें असो किंवा पाणी वर ओतण्याने अथवा शिंपडण्याने

केलेलें असो, तरी त्यावरून त्या शब्दाच्या अर्थास कांहीं विरुद्ध होत नाहीं. यावरून समजतें कीं, बाप्तिस्म्याचा संस्कार जो पाण्याने भिजविणें असा आहे, तो अमुकच रीतीने केला पाहिजे असा शास्त्राचा अभिप्राय नाहीं. ह्मणून ह्या दोहींतून कोणत्याहि रीतीने हा संस्कार करणें शास्त्राविरुद्ध आहे असें ह्मणतां येत नाहीं. आणि ह्या दोन्ही रीतींनी हा संस्कार करण्याची वहिवाट ख्रिस्ती लोकांमध्यें पहिल्यापासून चालत आली आहे. तरी मनुष्यावर पाणी ओतल्याने किंवा शिंपडल्याने हा संस्कार करण्याची रीत सर्व देशांत सर्वकाळीं आणि सर्व प्रसंगीं सोईवार आणि समर्पक आहे, यास्तव हीच रीत उत्तम आहे असें आह्मास वाटतें. यशा० ५२:१५. यहे० ३६:२५. इब्री. ९:१३, १४. १०:२२. १२:२४. १ पेत्र० १:२.

प्र० १२. योहान्नाचा बाप्तिस्मा ख्रिस्ती बाप्तिस्मा होता कीं काय?

उ० तो ख्रिस्ती बाप्तिस्मा नव्हता. कारण कीं ख्रीस्ताने आपल्या मंडळींत मिळणाऱ्यांस बाप्तिस्मा देण्याचा जो नेम लावून दिल्हा त्याप्रमाणें बाप पुत्र व पवित्र आत्मा यांच्या नांवाने योहान्नाने बाप्तिस्मा दिल्हा, असें नाहीं. त्याचा बाप्तिस्मा केवळ पश्चात्तापसंबंधी होता. आणि येशू ख्रीस्ताला त्र्येकाच्या नांवाने बाप्तिस्मा देणें योग्य नव्हतें. कारण कीं तो आपण स्वतां त्या त्र्येकांतील एक आहे. आणि त्यास पश्चात्तापसंबंधीहि बाप्तिस्मा देणें योग्य नव्हतें, कारण त्याने कधीं कांहीं पाप केलें नव्हतें. यावरून असें दिसतें कीं योहान्नाने येशू ख्रीस्ताला जो बाप्तिस्मा दिल्हा, तो ख्रिस्ती बाप्तिस्मा नव्हता. परंतु याजकपणाच्या कामां-

च्या दीक्षेचा संस्कार असा होता. ह्मणूनच तो तीस वर्षांचा होईपर्यंत त्याचा बाप्तिस्मा झाला नव्हता. कारण कीं मोश्याच्या नेमशास्त्राप्रमाणें मनुष्य तीस वर्षांचा झाल्यावर त्यास याजकपणाची दीक्षा मिळत असे. आणि त्याला याजकपणाची दीक्षा देण्याचे जे विधि होत असत, त्यांमध्यें बाप्तिस्मा करणें, ह्मणजे स्नान घालणें हा एक विधि होता. योहान्न हा याजकांच्या वर्गांतील असतां नेमशास्त्राच्या व्यवस्थेंतील शेवटला भविष्यवादी होता. यास्तव त्यानें येशू खीस्ताला याजकपणाची दीक्षा द्यावी हें योग्य होतें. परंतु योहान्नाच्या वेळेस ख्रिस्ती मंडळींची स्थापना झाली नव्हती. ती योहान्नाच्या मरणानंतर बहुत काळानें, येशू खीस्त मेलेल्यांतून उठल्यावर झाली, आणि तेव्हांपासून त्या मंडळीचे संस्कार चालू झाले. यास्तव योहान्नाचा बाप्तिस्मा ख्रिस्ती बाप्तिस्मा आहे, असें समजणें योग्य दिसत नाहीं. आणि बाप्तिस्त मतांतील डाक्तर राबर्ट हाल ह्मणून जो फार नामांकित उपदेशक होता, त्याचेंहि मत असेंच आहे. प्रे० १९:२,३. मार्क. १:४. मात्थी ३:१, २,१४,१५. निर्ग० २९:४. ३०:१९. गण० ४:३.

प्र० १३. बाप्तिस्म्याच्या वेळेस पाण्यांत उतरले, आणि पाण्यांतून वर आले, असीं जीं वाक्यें नव्या कराराच्या मराठी भाषांतरांत आहेत, त्यांवरून बुडविण्यानें किंवा बुचकळण्यानें बाप्तिस्मा करण्याची रीत त्या वेळेस चालली होती असें अनुमान होतें कीं काय?

उ० नाहीं. कारण त्या ठिकाणीं ज्या मूळ ग्रीक उपसर्गाचा तर्जुमा, आंत, आणि आंतून वर, असा केला आहे, त्याच ग्रीक उपसर्गाचा तर्जुमा नव्या करारांतील

दुसऱ्या अनेक वाक्यांमध्यें कडे, आणि पासून, असाहि केला आहे. आणि ह्या वाक्यांतहि तसाच तर्जुमा केला असता, तरी हरकत नव्हती, हें सर्व ग्रीक भाषा समजणाऱ्यांस उघड समजण्याजोगें आहे. तथापि बाप्तिस्मा करण्यासाठीं पाण्यांत गेले आणि पाण्यांतून वर आले असीं वाक्यें त्या ठिकाणीं आहेत, तेवढ्यांवरूनच तो बाप्तिस्मा बुडविण्याने किंवा बुचकळण्याने झाला असा अर्थ जर कोणी धरीत असेल; तर त्याला आमचें ह्मणणें आहे कीं, कांहींसें खोल पाण्यांत जाऊन आणि तेथें उभें राहून मग अंगावर पाणी ओतण्याने किंवा शिंपडण्याने तो बाप्तिस्मा केला नसेल असें कशावरून ह्मणावें? कारण कीं पाण्यांत गेल्यावर मग बाप्तिस्मा कोणत्या रीतीने दिल्हा हें कांहीं तेथें सांगितलें नाहीं. ह्मणून बाप्तिस्म्यासाठीं पाण्यांत गेले, एवढ्यावरून तो बाप्तिस्मा बुडविण्याने किंवा बुचकळण्याने झाला असें ठरवितां येत नाहीं. मात्थी ३:१६. प्रे० ८: ३८,३९.

प्र० १४. रोमेकरांस पत्र यांतील साहाव्या अध्यायाच्या चवथ्या ओवींत ह्मटलें आहे कीं, "आह्मी मरणाकरितां त्याजबरोबर बाप्तिस्म्याने पुरले होतों." या वाक्याचा काय अर्थ होतो?

उ० त्याचा अर्थ आणि पुढल्या ओव्यांत "आह्मी त्याच्या मरणाच्या बरोबरीने त्यासंगतीं लाविलेले आहों," आणि "त्याबरोबर खांबीं दिल्हेले आहों," असीं जीं वाक्यें त्याच अध्यायांत आहेत, त्यांचा अर्थ एकसारिखाच आहे. हीं वाक्यें लाक्षणिक आहेत, आणि ह्यांचा अभिप्राय हाच आहे कीं, जो मेला आणि पुरला आहे, तो जसा ह्या

आयुष्यांतील सर्व गोष्टींपासून दूर झालेला आहे, तसेच जे ख्रिस्ती आहेत त्यानी पापाविषयीं मरावें; ह्मणजे सर्व पापिष्ट वासना इच्छा कामें आणि उपभोग, यांपासून अगदीं दूर व्हावें. पाऊलस ह्या ठिकाणीं बाप्तिस्म्याच्या रीतीविषयीं कांहींच लिहीत नाहीं. परंतु मनाच्या ज्या पुनर्जन्माची उपमा बाप्तिस्मा आहे, त्याच्या फळांविषयीं लिहीत आहे. ह्मणजे ज्यांच्या मनाचा पुनर्जन्म झाला आहे त्यानी कसें वागावें यात्रिषयीं लिहीत आहे, हें उघड आहे. यास्तव त्यावरून बाप्तिस्म्याच्या प्रकाराविषयीं कांहींच निर्णय होऊं शकत नाहीं. परंतु या ठिकाणीं बाप्तिस्म्याविषयीं जें लाक्षणिक बोलणें आहे, त्यावरून बाप्तिस्मा बुडविण्याने करावा असा बोध होतो, असें जे ह्मणतात, त्यांस आमचें ह्मणणें आहे कीं, ख्रीस्त वधस्तंभीं मारिला जाणें आणि बुडविण्याने बाप्तिस्मा देणें, यांत काय साम्यता आहे? जर ख्रीस्त पाण्यांत बुडविण्याने मारला गेला असता, तर मात्र त्याच्या मरणाच्या उपमेने बाप्तिस्मी होण्यासाठीं बुडविण्याने बाप्तिस्मी होणें ही रीत योग्य आहे असें कदाचित ह्मणतां आलें असतें. परंतु ज्यापेक्षां ख्रीस्त येशू वधस्तंभावर मारला गेला, त्यापेक्षां बुडविण्याने बाप्तिस्मी होणें हें त्याच्या मरणाच्या बरोबरीनें बाप्तिस्मी होणें असें अगदीं होऊं शकत नाहीं.

प्र० १९. ख्रिस्ती बाप्तिस्मा झाल्याचे जे लेख पवित्र शास्त्रांत आहेत, त्यांतलि पहिला कोणता?

उ० पन्नासाव्या दिवसाच्या सणांत प्रेषितांच्या उपदेशावरून जे तीन हजार मनुष्य ख्रिस्ती झाले त्यांच्या बा-

स्तिस्म्याविषयींचा जो लेख आहे तोच ख्रिस्ती बाप्तिस्म्याविषयींचा पहिला लेख आहे. प्रे० २:४१.

प्र० १६. त्या तीन हजार मनुष्यांचा बाप्तिस्मा कोणत्या रीतीने झाला?

उ० तो कोणत्या रीतीने झाला हें शास्त्रांत सांगितलें नाहीं. परंतु तो पाणी वर ओतण्याने किंवा शिंपडण्याने झाला असावा असें दिसतें, कारण त्यांचा बाप्तिस्मा यरूशलेम शहरांत झाला. तें शहर एका टेंकडीवर वसलें होतें. आणि त्या शहरांत आणि त्याच्या आसपास, सरोवर, खाडी, समुद्र, नदी, किंवा तलाव असा कांहीं मोठा प्रशस्त जलाशय नव्हता. तेथें केवळ एकच मोठा झरा होता, त्याचें पाणी ज्यांत समावत असे, असें शिलोहाम ह्मटलेलें एक मोठें कुंड किंवा तळें होतें. त्यांतील पाणी त्या शहरांतील राहणाऱ्यांस पुरून उरण्याजोगें होतें खरें. तरी तें तळें इतकें लाहान होतें कीं, त्यांत तीन हजार मनुष्यांस बुचकळून बाप्तिस्मा देण्याची कांहीं सोय नव्हती. ह्मणून त्यांचा बाप्तिस्मा बुडविण्याने झाला नसेल असें वाटतें. अणखी ज्यांचा बाप्तिस्मा त्या वेळेस झाला, ते केवळ प्रेषितांचा उपदेश ऐकण्यासाठीं जमा झाले होते. तेव्हां, आपणांस पुढें बाप्तिस्मा घ्यावयाचा आहे, ही गोष्ट त्यांच्या स्वप्नीं देखील आली नव्हती. यास्तव बुडविण्याने बाप्तिस्मा घेण्यासाठीं तेथें त्यांजवळ कांहीं पडदणी किंवा उपवस्त्र ह्मणजे वस्त्रांतर करण्यासाठीं दुसरीं वस्त्रें सिद्ध होतीं असें नाहीं. परंतु बुडविण्याने बाप्तिस्मी होण्यासाठीं वस्त्रांतर करण्याकरितां दुसरीं वस्त्रें अवश्य होतीं आणि तीं आणण्यासाठीं आपल्या घरीं किंवा बिऱ्हाडीं न जातां लागलाच

तेथल्या तेथेंच त्यांनीं बाप्तिस्मा घेतला असें दर्शविलें आहे. यावरून अनुमान होतें कीं, त्यांचा बाप्तिस्मा बुडविल्याने झाला नसेल. अणखी जर त्यांतील एकेकाला उचलून बुडविण्याने बाप्तिस्मा दिल्हा असता, तर त्या तीन हजार मनुष्यांच्या बाप्तिस्म्याचा विधि एका दिवसांत उरकला नसता, हें उघड आहे. परंतु त्या तीन हजार मनुष्यांचा बाप्तिस्मा तर एकाच दिवसांत असें केवळ नाहीं, परंतु उपदेश करणें झाल्यावर जितका दिवस राहिला होता, तितक्यांतच उरकला असें दर्शविलें आहे. या सर्व गोष्टींवरून असें अनुमान होतें कीं, त्यांचा बाप्तिस्मा बुडविण्याने झाला नसेल परंतु शिंपडण्याने किंवा पाणी त्यांवर ओतण्याने झाला असेल.

प्र० १७. पाऊलस जो प्रेषित त्याचा बाप्तिस्मा कोणत्या रीतीने झाला?

उ० तो दमास्कस नगरांतील कोणी यहूदा नामक मनुष्याच्या घरांत असतां, तेथें त्याचा बाप्तिस्मा झाला. आणि तेथें त्याला बुडविण्याने बाप्तिस्मा देण्याची कांहीं सोय अगोदर करून ठेविली असें कल्पण्यास देखील आधार नाहीं. ह्मणून त्याचा बाप्तिस्मा शिंपडल्याने किंवा पाणी त्यांवर ओतण्यानेच झाला असेल असें वाटतें. प्रे० ९:११. २२:१६.

प्र० १८. तुरूंगाचा नायक आणि त्याच्या कुटुंबांतील माणसें यांचा बाप्तिस्मा कोणत्या रीतीने झाला?

उ० त्यांचा बाप्तिस्मा तुरूंगांतील ज्या घरांत तो राहत होता, त्या ठिकाणीं मध्यरात्रीं झाला असें दर्शविलें आहे. आणि त्याच्या तुरूंगांतील घरामध्यें, बुडविण्याने बाप्तिस्मा

देण्याची कांहीं सोय बहुधा नव्हती, व बाप्तिस्मा घेण्यासाठीं ते तेथून दुसऱ्या ठिकाणीं गेले असें कांहीं सांगितलें नाहीं, व अशा अपरात्रीस त्याच्या कुटुंबांतील सर्व बुडविण्याने बाप्तिस्मा घेऊं शकले असतील असेंहि दिसत नाहीं. या सर्व गोष्टींवरून अनुमान होतें कीं, त्यांचा बाप्तिस्मा पाणी शिंपडण्याने किंवा ओतण्याने झाला असावा. प्रे० १६: ३०,३३.

प्र० १९. कर्नेल्यसाच्या घरीं जे ख्रिस्ती झाले, त्यांचा बाप्तिस्मा कोणत्या रीतीने झाला?

उ० त्यांचा बाप्तिस्मा शिंपडल्याने किंवा पाणी त्यांवर ओतण्याने झाला असावा असें दिसतें. कारण त्यांच्या बाप्तिस्म्याविषयीं सांगतांना पेत्रस ह्मणतो, "त्यांचा बाप्तिस्मा करण्याकरितां पाणी कोणाच्याने मना करवेल?" ह्मणजे त्यांला बाप्तिस्म्याचें पाणी मिळण्याविषयीं किंवा बाप्तिस्म्याचें पाणी त्यांजवर घालण्याविषयीं कोणाच्याने मनाई करवेल? असा त्या वाक्याचा साहजिक अर्थ निघतो, यास्तव त्यांचाहि बाप्तिस्मा शिंपडण्याने किंवा पाणी त्यांवर ओतण्यानेच झाला असेल असें अनुमान होतें. प्रे० १०:४७.

प्र० २०. ख्रिस्ती बाप्तिस्मा, पाणी मनुष्यावर ओतल्याने किंवा शिंपडण्याने करणें योग्य आहे असें समजण्यास दुसरा कांहीं आधार आहे कीं काय?

उ० होय, असें समजण्यास दुसऱ्या बहुत गोष्टींचा आधार आहे, त्या अशा. (१) बाप्तिस्म्याचा संस्कार हा लौकिक भजनांतला विधि आहे. यास्तव हा बहुधा ईश्वराच्या घरांत ह्मणजे भजनगृहांत होणें योग्य आहे. आणि बाप्तिस्मा घेण्यासाठीं भजनगृह सोडून कोणी दुसऱ्या

ठिकाणीं कधीं गेले असें शास्त्रांत कोठेंहि सांगितलें नाहीं. परंतु ज्यांनी ख्रीस्तावर विश्वास ठेविला, त्यांचा बाप्तिस्मा, जेथें ते भजन करावयास मिळाले होते, तेथेंच झाला असें बहुत ठिकाणीं दर्शविलें आहे. आणि ख्रिस्ती बाप्तिस्म्याचा संस्कार तर जसा पुरुषांस तसाच स्त्रियांसहि द्यावयाचा आहे. आणि तो पुरुष व बायका यांच्या समाजांत द्यावयाचा आहे. असें असतां जर तो बुडविण्याच्या रीतीने दिल्हा, तर तो जसा सलज्ज, सुशोभित, आणि स्त्रीपुरुषांच्या समाजांत होणें योग्य आहे, त्या प्रकारें होऊं शकणार नाहीं. परंतु ख्रिस्ती भजनासंबंधीच्या सर्व गोष्टी 'योग्य रीतीने' व 'सर्वांची आत्मिक वृद्धि होईल अशा रीतीने' झाल्या पाहिजेत असी आज्ञा आहे. पण बुडविण्याच्या रीतीचा बाप्तिस्मा, हा स्त्रीपुरुषांच्या समाजांत झाल्याने लोकांच्या मनामध्यें वाईट भावना उत्पन्न होण्याचें व मर्यादशील व शुद्ध मनाच्या मनुष्यांच्या मनांस संकोच व अप्रसन्नता वाटण्याचें कारण होईल. परंतु शिंपडण्याच्या अथवा पाणी वर ओतण्याच्या रीतीने बाप्तिस्मा दिल्ह्यास तो जसा सलज्ज, मर्यादशील आणि सुशोभित रीतीने व्हावा तसाच होईल, यास्तव त्याच रीतीने बाप्तिस्मा करणें उत्तम दिसतें. (२) अणखी बुडविण्याने बाप्तिस्मा देण्याची रीत मनुष्यांच्या कित्येक प्रसंगांस व स्थितींस अगदीं गैरसोईची व दुःसह आहे. कारण कोणकोणी देशांत कित्येक महिनेपर्यंत सर्व पाणी थिजलेलें असतें आणि थंडी अतिशय असती, त्यामुळें बुडविण्याने बाप्तिस्मा घेण्याची मोठी अडचण पडेल. आणि कधीं कधीं ज्यांचा बाप्तिस्मा करावयाचा आहे, तीं मनुष्यें असीं आजारी व

अशक्त असतात कीं, त्यांस बुडविण्याने बाप्तिस्मा दिल्यास तेणेंकडून त्यांच्या प्रकृतीस फार अपकार होईल. परंतु शिंपडण्याने अथवा पाणी मनुष्यांवर ओतण्याने बाप्तिस्मा करण्याच्या रीतीकडून असी अडचण अगदीं पडणार नाहीं. (३) अणखी पाण्याचा बाप्तिस्मा हा पवित्र आत्म्याकडून होणाऱ्या आत्मिक बाप्तिस्म्याचा दाखला आहे. आणि मनुष्याच्या मनाचा बाप्तिस्मा करण्यासाठीं त्यास पवित्र आत्मा देण्याविषयीं जेव्हां ईश्वर बोलला, तेव्हां मी आपला आत्मा त्यांजवर ओतीन व त्यांजवर घालीन असें त्याने ह्मटलें आहे. योए० २:२८. प्रे० २:१७,१८. यशा० ३२: १५. ४४:३. ५२:१५. ह्मणून पाण्याचा बाप्तिस्मा करण्याची रीत, जितक्या प्रकारें पवित्र आत्म्याकडून होणाऱ्या बाप्तिस्म्याच्या रीतीसारिखी करितां येईल, तितक्या प्रकारें ती तसी करावी हें योग्य आहे, ही गोष्ट कोणाच्याने नाकबूल करवत नाहीं. आणि पवित्र आत्म्याकडून मनाचा बाप्तिस्मा होण्याच्या रीतीसीं, मनुष्यावर पाणी ओतण्याने किंवा शिंपडण्याने बाप्तिस्मा करण्याच्या रीतीचा जसा सारिखेपणा दिसतो, तसा मनुष्याला पाण्यांत बुडविण्याने बाप्तिस्मा देण्याच्या रीतीचा सारिखेपणा दिसत नाहीं. पवित्र आत्म्याच्या प्रेरणा देण्याविषयीं सांगतांना, जर ईश्वराने ह्मटलें असतें कीं, मी आपल्या आत्म्यांत त्यांस बुडवीन, तर मात्र मनुष्यांस पाण्यांत बुडविण्याने बाप्तिस्मा देण्याची रीत योग्य दिसली असती. परंतु मनुष्यांस मी आपल्या पवित्र आत्म्यांत बुडवीन असें ह्मणणें अगदीं असंगत आहे, आणि ईश्वरानेहि असें कधीं ह्मटलें नाहीं. ह्मणून पवित्र आत्म्याकडून होणाऱ्या बाप्तिस्म्याच्या उपमार्थ जो पाण्याचा बा-

प्तिस्मा, तोहि अंगावर पाणी ओतण्याने किंवा शिंपडण्याने व्हावा हें फार योग्य दिसतें. (४) आणि त्याचप्रमाणें बाप्तिस्मा झाल्याचे जे लेख शास्त्रांत आहेत, त्यांतील एकामध्येंहि, पाण्यांत बाप्तिस्मा झाला असें ह्मटलें नाहीं, परंतु पाण्याने बाप्तिस्मा झाला असें सर्व ठिकाणीं ह्मटलें आहे. यावरून सुचविलें जातें कीं, पाण्यांत बुडविण्याने नव्हे परंतु पाणी शिंपडण्याने किंवा ओतण्याने बाप्तिस्मा झाला. या सर्व गोष्टींवरून दिसतें कीं, मनुष्यांवर पाणी ओतण्याने किंवा शिंपडण्याने ख्रिस्ती बाप्तिस्मा करावा हें योग्य आहे.

प्र० २१. ज्याला एकदां बाप्तिस्मा दिल्हा आहे, त्याला पुन्हा बाप्तिस्मा द्यावा हें योग्य आहे कीं काय?

उ० जर त्याचा पहिला बाप्तिस्मा अयोग्य प्रकारें ह्मणजे ईश्वरी नेमाविरूद्ध झालेला असेल, तर तो बाप्तिस्मा नव्हे पण खेळ किंवा उगाच केलेला विधि असा आहे. ह्मणून त्याला पुन्हा ईश्वरी नेमाप्रमाणें यथायोग्य प्रकारें बाप्तिस्मा देणें योग्य आहे. परंतु ज्याचा बाप्तिस्मा ईश्वरी नेमास विरूद्ध नाहीं अशा प्रकारें झाला आहे, त्याला पुन्हा बाप्तिस्मा देणें हें अगदीं अयोग्य आहे. कारण असें करण्याविषयीं शास्त्रांतील कोणत्याहि आज्ञेचा किंवा उदाहरणाचा आधार नाहीं. आणि हा नेम प्रौढ मनुष्यास आणि लेंकरांस एकसारिखाच लागतो. ह्मणजे ज्याचा बाप्तिस्मा प्रौढपणीं झाला आहे, त्याला ज्या कारणावरून पुन्हा बाप्तिस्मा देणें योग्य नाहीं, त्याच कारणावरून बाल्यावस्थेंत ज्यांचा बाप्तिस्मा झाला आहे, त्यांसहि पुन्हा बाप्तिस्मा देणें योग्य नाहीं. कारण जसा प्रौढाचा तसा लेंकराचाहि बाप्तिस्मा, बाप, पुत्र व पवित्र आत्मा यांच्याच नांवाने होत असतो.

परंतु जर कोणी ह्मणेल कीं, बाळकांचा बाप्तिस्मा त्यांच्या विश्वासावरून होत नसतो, ह्मणून तो अयोग्य प्रकारें झालेला आहे, असें समजून, त्यांस पुन्हा बाप्तिस्मा देणें योग्य आहे; तर मग ज्यांचा बाप्तिस्मा प्रौढपणीं झाला आहे त्यांसहि याच कारणावरून पुन्हा बाप्तिस्मा देणें योग्य आहे असें ठरेल. कारण कधीं कधीं प्रौढ माणसेंहि विश्वासावांचून ह्मणजे कपटाने व ढोंगाने बाप्तिस्मा घेतात. यास्तव पुढें जेव्हां ते खरा विश्वास ठेवितात असें दिसेल, तेव्हां त्यांचा पहिला बाप्तिस्मा रद्द करून दुसऱ्याने त्यांस बाप्तिस्मा द्यावा; आणि त्यानंतर पुढें कधीं त्यांचा विश्वास खोटा आहे असें दिसल्यास, त्यांचा दुसराहि बाप्तिस्मा रद्द करून, जेव्हां ते खरा विश्वास ठेवितात असें दिसेल तेव्हां त्यांस तिसरा बाप्तिस्मा द्यावा, हें योग्य ठरेल. आणि अशा रीतीने पुनः पुनः बाप्तिस्मा देत गेल्यास बाप्तिस्मा देण्याची कांहीं सिमा राहणार नाहीं. आणि असें झालें असतां ज्यांचा बाप्तिस्मा झाला आहे, त्यांतून खरोखर बाप्तिस्मी झालेले कोण आहेत, हें या जगांत कोणास समजतां येणार नाहीं; आणि असें झाल्यास मग ह्या पृथ्वीवर ईश्वराच्या खऱ्या भक्तांची असी एकहि मंडळी स्थापित होणार नाहीं, असे वाईट व अनर्थक परिणाम या मतापासून होण्याजोगे आहेत. यास्तव ज्याचा बाप्तिस्मा शास्त्रांतील नेमाप्रमाणें एकदां झाला आहे, त्यांस पुन्हा बाप्तिस्मा देणें अगदीं अयोग्य आहे असें समजावें.

प्र० २२. बाप्तिस्मा देण्याची एक रीत एका मंडळीस योग्य वाटती व दुसऱ्या मंडळीस दुसरी रीत योग्य वाटती, यावरून एका मंडळींतील लोकानी दुसऱ्या मंड-

ळींतील लोकांसीं परस्परें धर्मव्यवहार करणें वर्ज करावें हें योग्य आहे कीं काय?

उ० नाहीं. असें करणें अगदीं अयोग्य आहे; ज्या गोष्टींविषयीं उघड शास्त्राज्ञा नाहीं, ह्मणजे जें करण्यांत किंवा न करण्यांत पाप किंवा दोष घडत नाहीं तें करण्याविषयीं अथवा न करण्याविषयीं सर्व मनुष्यें स्वतंत्र आहेत. ह्मणून जी रीत किंवा जो परिपाठ शास्त्राविरुद्ध नाहीं त्याविषयींचा मतभेद असल्यावरून त्यामुळें एका मंडळींतील लोकानीं दुसऱ्या मंडळींतील लोकांस अभक्तांसारिखें लेखावें, आणि ख्रिस्ती भावांस परस्परांसीं जो धर्मव्यवहार करणें योग्य आहे, तो करणें वर्जावें हें आपल्या विवेकास, ख्रिस्ती भावनेस आणि शास्त्राच्या अभिप्रायासहि अगदीं विरुद्ध आहे. १ करिं० १०:१७. १२:१२,१३.

---

## प्रकरण ३०.

## प्रभूचें भोजन.

प्र० १. प्रभूचें भोजन ह्मणजे काय?

उ० येशू ख्रीस्ताच्या मरणाच्या आठवणीसाठीं जो संस्कार स्थापिलेला आहे त्यास प्रभूचें भोजन ह्मटलें आहे.

प्र० २. हा संस्कार कोणी केव्हां स्थापिला?

उ० ज्या रात्रीं प्रभु येशू ख्रीस्त शत्रूच्या हातीं दिल्हा गेला, त्या रात्रीं त्याने स्वतां हा संस्कार स्थापिला. १ करिं० ११:२३–२५.

प्र० ३. ज्यांकडून हा संस्कार करावयाचा ते पदार्थ कोणते?

उ० मोडलेली भाकर आणि ओतलेला द्राक्षारस हेच. १ करिं० ११:२३–२५.

प्र० ४. हे पदार्थ कशांच्या उपमा आहेत?

उ० जेव्हां येशू ख्रीस्त मनुष्यांच्या पापाच्या प्रायश्चित्ताकरितां वधस्तंभावर मारला गेला, तेव्हां त्याचें शरीर मोडलें गेलें, त्याची उपमा ही मोडलेली भाकर आहे; आणि त्याचें रक्त ओघळविलें गेलें, त्याची उपमा हा ओतलेला द्राक्षारस आहे. १ करिं० ११:२३–२५.

प्र० ५. ह्या संस्कारांत घेतलेली भाकर आणि द्राक्षारस हीं येशू ख्रीस्ताचें खरोखर शरीर आणि रक्त आहेत असें समजावें कीं काय?

उ० असें अगदीं समजूं नये. ती भाकर आणि तो द्राक्षारस केवळ त्याच्या शरीराच्या उपमा मात्र आहेत, असें समजावें. कोणी बिघडलेले ख्रिस्ती लोक असें मानितात कीं, ह्या संस्कारांत घेतलेली भाकर आणि द्राक्षारस हीं पालटून आमच्या तारणाऱ्याचें खरोखर शरीर आणि रक्त असीं होतात. परंतु हें त्यांचें मत आपल्या डोळ्यानीं जें उघड दिसतें त्यासीं, आणि शास्त्रांतील बोधासीं इतकें अतिशय विरूद्ध आहे कीं, ह्या मताला मूर्त्तिपुजक लोकांच्या सर्वांहून असंगत आणि मूर्ख कांक्षेसारिखें मानणें योग्य आहे. कारण ख्रीस्ताचें मूर्त्तिमंत शरीर एकाच समयीं हजारों ठिकाणीं प्रत्यक्ष होतें असें मानणें यापेक्षां अनर्थक आणि विचारशून्य कल्पना कोणती आहे?

प्र० ६. या संस्काराला प्रभूचें भोजन हें नांव कशास्तव ठेविलें आहे?

उ० हें भोजन करण्याचा नेम स्वतां प्रभूनेच लाविला; आणि हें माझ्या आठवणीसाठीं करावें असी त्याची आज्ञा आहे; आणि मनुष्याच्या आत्म्याला सर्वकाळिक नाशापासून सोडविण्यासाठीं जें प्रायश्चित्तरूप अन्न प्रभूने सिद्ध केलें, त्याच्याच उपमेकरितां हें करावयाचें आहे; आणि अशा रीतीने हें भोजन करण्याकडून विश्वासणाऱ्यांस जो बोध व ज्या प्रेरणा होतात त्या त्यांच्या आत्म्यांला उत्तम आणि पौष्टिक खाद्याप्रमाणें आहेत. या सर्व कारणांस्तव या संस्काराला प्रभूचें भोजन हें नांव ठेविलें आहे.

प्र० ७. हा संस्कार कशाचा सूचक आहे ह्मणजे ह्यावरून कोणते अर्थ निष्पन्न होतात?

उ० हा संस्कार पाळण्याकडून तीन मुख्य अर्थ निष्पन्न होतात. (१) हा संस्कार ख्रीस्ताच्या मरणाचा स्मारक आहे. ह्मणजे जे हा संस्कार पाळितात त्यांस येणेंकडून ख्रीस्ताच्या मरणाविषयीं असें स्मरण होतें कीं, त्याकडून ख्रीस्ताची श्रेष्ठ प्रीति त्यांच्या मनामध्यें ठसण्याने त्यांच्या ठायीं ख्रीस्ताविषयींच्या प्रेमळ व आभारी मनोवृत्ति उत्पन्न होऊन वाढतात; आणि त्यांकडून त्यांच्या पापाचें अति दुष्टपण त्यांच्या मनांत ठसण्याने त्यांची स्वाभाविक दुरावस्था त्यांस असी उघड दिसती कीं, तेणेंकडून ते नम्र होतात, आणि आमचें तारण साधण्याने ईश्वराने आह्मावर अत्यंत मोठी कृपा केली आहे, असें मनांत वागवितात. (२) अणखी हा संस्कार ख्रिस्ती मनुष्यांचा परस्पर संबंध कसा आहे, हें दाखवितो. ह्मणजे हा संस्कार पाळितांना ते सर्व एकाच भाकरींतून खातात व एकाच प्याल्यांतून पितात; तेणेंकडून दर्शविलें जातें कीं, ते सर्व धर्मभाऊ

आहेत; ह्मणजे ते सर्व एकाच ईश्वराचीं लेंकरें आणि एकाच तारणाऱ्याचे शिष्य आणि एकाच सर्वकाळिक वतनाचे भागीदार आहेत. (३) अणखी हा संस्कार, तारणारा जो ख्रीस्त प्रभु त्याचा, त्याच्या शिष्यांसीं जो कृपेचा करार आहे, त्याचा दृश्य शिक्का असाहि आहे. ह्मणजे जे कोणी हा संस्कार घेतात ते तेणेंकडून दाखवितात कीं, आह्मी प्रभु येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवून त्याच्याच योगाने तारण पावण्याची आशा धरितों. आणि ज्यांस हा संस्कार ख्रीस्ताच्या नेमाप्रमाणें यथायोग्य रीतीने मिळतो, त्यांविषयीं तेणेंकडून ख्रीस्त जो मंडळीचा प्रभु तो दाखवितो कीं, म्या त्यांस अंगीकारिलें आहे आणि मी त्यांचा उद्धार करीन. हा संस्कार असे अर्थ सुचविणारा असतां जगाच्या समाप्तीपर्यंत ह्मणजे ख्रीस्त येशू जगाचा न्याय ठरविण्यास येईल त्या काळापर्यंत निरंतर चालावयाचा आहे. १ करिं० ११:२५,२६. १०: १६,१७.

प्र० ८. ख्रीस्तावर विश्वास ठेवणाऱ्या सर्व मनुष्यांनी हा संस्कार पाळावा हें अवश्य आहे कीं काय?

उ० होय, कारण हा संस्कार सर्व विश्वासणाऱ्यानी पाळावा असी ख्रीस्ताची आज्ञा आहे. आणि प्रेषितांनी व पुरातन ख्रिस्ती लोकांनी हें जाणूनच हा संस्कार पाळिला. आणि हा संस्कार पाळण्याने ख्रीस्ताचा सन्मान होऊन त्याचे उपकार मानिले जातात आणि पाळणाऱ्यांस त्यावरून बहुत सुबोध आणि सुप्रेरणा मिळतात. ह्मणून हा संस्कार पाळणें हें त्यांचें कर्त्तव्य आहे असें केवळ नाहीं, पण त्यांस फार लाभदायकहि आहे. यास्तव हा संस्कार

सर्व विश्वासणाऱ्यानीं सर्वदां पाळावा. गीत ११६:१२, १३. मात्थी १०:३२,३३. लुका २२:१९. प्रे० २०:७.

प्र० ९. प्रभूच्या भोजनाचा संस्कार कोणांस द्यावा?

उ० जे शास्त्रांतील मुख्य सिद्धांताविषयीं अगदीं असमंजस आहेत, किंवा जे वेडगळ अथवा भ्रमिष्ट आहेत, किंवा जे निधडपणें दुराचारी आहेत, किंवा जे अपश्चात्तापी व अविश्वासी आहेत, त्यांस ह्मणजे ज्यांच्या मनाचा पुनर्जन्म झाला नाहीं त्यांस देऊं नये. कारण ह्मणजे जे कोणी हा संस्कार घेतात त्यानी प्रभूच्या शरिराला अनुलक्षून योग्य प्रकारें ती भाकर खावी व तो द्राक्षारस प्यावा; आणि जो कोणी अयोग्य प्रकारें ह्मणजे प्रभूच्या शरिराला न अनुलक्षितां त्यांतलें खातो अथवा पितो, तो तेणेंकडून आपणावर शाप व दंड आणितो असें शास्त्रांत सांगितलें आहे. यास्तव ज्यांच्या मनाचा पालट झाला आहे, ह्मणजे जे येशू ख्रीस्तावर योग्य विश्वास ठेवितात, आणि धर्मनिष्ठपणें चालतात असें दिसतें, त्यांस मात्र हा संस्कार द्यावा. कारण हा संस्कार प्रभूने दृश्य मंडळींतल्या मनुष्यांसाठींच नेमून दिल्हा आहे. आणि मंडळींतील पुरूषांस व स्त्रियांसहि द्यावयाचा आहे. निर्ग० १२:४८. यशा० ४४:५. मात्थी १०:३२,३३. २ करिं० ६:१४,१५,१६. गीत ५०:१६. नीति १५:८.

प्र० १०. मंडळींत मिळण्यास व प्रभुभोजनाचा संस्कार घेण्यास मी योग्य आहें किंवा नाहीं, हें ज्याचें त्यानें कोणत्या प्रमाणांवरून समजावें?

उ० जर त्याला असें दिसून येईल कीं मी ख्रिस्ती आहें, ह्मणजे माझ्या मनाचा पुनर्जन्म झाला आहे, आणि

मी येशू ख्रीस्तावर खरा विश्वास ठेवून ईश्वराच्या कृपेचा अनुभव पावलों आहें, तर मी मंडळींत मिळण्यास व प्रभूचें भोजन घ्यावयास योग्य आहें असें त्याने समजावें. परंतु हें लक्षांत वागविलें पाहिजे कीं याविषयींचीं प्रमाणें सर्वांच्या ठायीं सारिख्याच परिमाणाने दिसून येतील असें नाहीं.

प्र० ११. ख्रिस्ती मनुष्याने कोणत्या भावना व मनोवृत्ति आपल्या मनांत बाळगून हा संस्कार घ्यावा?

उ० पश्चात्ताप, विश्वास, आज्ञाधारकपण, नम्रता, कृतज्ञता, आशा, शांति, आनंद, आणि बंधुप्रीति, ह्या भावना मनांत बाळगून प्रभूचें भोजन घ्यावें.

प्र० १२. हा संस्कार आपणाकडून यथायोग्य रीतीने घेण्यांत यावा ह्मणून मंडळींतल्या मनुष्यानी काय करावें?

उ० हा संस्कार घेण्यापूर्वीं त्यानी योग्य तयारी करावी; ह्मणजे ज्या मनोवृत्तींनी हा संस्कार घेणें योग्य आहे त्या आपल्या ठायीं नांदतात किंवा नाहीं, आणि त्या मनोवृत्तींप्रमाणेंच आचरण करावयास आपण झटतों किंवा नाहीं, असा विचार करावा. आणि तशा मनोवृत्ति धरून तदनुसारें आचरण्यास मोठ्या अगत्यवादाने आणि ईश्वराचें साह्य मागून झटत जावें. आणि हा संस्कार घेतांना जसें, तसें हा घेण्याच्या पूर्वीं आणि नंतरहि याविषयीं योग्य मनन करावें, हें अगत्य आहे. १ करिं० १०:२१. ५:७,८. ११:२८. २ करिं० १३:५. मात्थी ५:१६.

प्र० १३. हा संस्कार योग्य रीतीने घेण्यासाठीं जी पूर्वतयारी मंडळींतल्या मनुष्यांस करावयाची

आहे, तिजविषयीं त्यांचें साह्य करण्यासाठीं मंडळीच्या अधिकाऱ्यांनी काय करावें?

उ० हा संस्कार देण्याच्या समयापूर्वीं याच्या पूर्वतयारीविषयींचा उपदेश मंडळीस करावा. आणि जसें शाब्बाथ दिवसाच्या नैमित्तिक भजनास तसें हा उपदेश ऐकण्यासहि मंडळींतल्या सर्वांनी अवश्य जावें. आणि जो कोणी योग्य कारणावांचून हा उपदेश ऐकण्यास जाणें अंतरतो, त्याला त्या उपदेशाची आवड नाहीं असें दिसेल, आणि त्यावरून त्याच्या धार्मिकपणाविषयीं संशय उत्पन्न होऊन तो हा संस्कार घेण्यास योग्य नाहीं असें समजण्यास एक कारण होईल.

प्र० १४. प्रभूच्या भोजनांत अयोग्य प्रकारें खाणें व पिणें ह्मणजे काय?

उ० ख्रीस्ताची प्रकृति, त्याचे गुणस्वभाव, त्याचा अधिकार आणि त्याने केलेला तारणोपाय यांविषयीं योग्य समज नसतां, आणि या संस्काराचा हेतु व अभिप्राय योग्य प्रकारें न समजतां, आणि पाप, तारणारा, ख्रिस्ती कर्त्तव्यकर्मे आणि ख्रिस्ती मनुष्याचे अधिकार, यांविषयीं योग्य मनोवृत्ति न बाळगितां जो हा संस्कार घेतो, तो प्रभूच्या भोजनांत अयोग्य प्रकारें खातो व पितो असें समजावें.

प्र० १५. हा संस्कार अयोग्य प्रकारें घेण्याने काय होईल?

उ० जो कोणी हा संस्कार अयोग्य प्रकारें घेतो त्याजवर ह्या भोजनाचा प्रभु जो येशू ख्रीस्त त्याची अवकृपा होऊन, तो ईश्वराच्या न्यायाधीन होईल, ह्मणजे तो आपल्या ह्या पापाची योग्य शिक्षा पावेल. तथापि हें पाप अक्षम्य

आहे असें नाहीं. योग्य पश्चात्ताप केला तर याहि पापाची क्षमा होईल. "जो अयोग्य प्रकारें खातो व पितो तो प्रभूच्या शरिराला न लक्षून खाण्याने व पिण्याने आपल्यावर दंड आणितो," या शास्त्रवाक्याचा अर्थ असा आहे कीं, जो कोणी तें भोजन करितांना प्रभु येशूचा योग्य आदरमान करीत नाहीं व तें भोजन ज्या हेतूनें व ज्या बुद्धीने खावें, त्याहून वेगळ्या हेतूने व बुद्धीने खातो, तो त्यावरून शिक्षेस पात्र होतो. ह्मणजे जेव्हां ईश्वराचे भक्त वावगे चालतात तेव्हां ज्या ऐहिक शिक्षा ईश्वर त्यांस लावीत असतो, त्या शिक्षा पावण्यास तो पात्र होतो. आणि जर तो ह्या शिक्षा पावत असतां अपश्चात्तापी राहील तर तो सर्वकाळिक दंडासहि पात्र होईल हें उघड आहे. परंतु त्या वाक्यांतील दंड या शब्दाचा अर्थ त्या वाक्यांत ऐहिक दंड ह्मणजे शिक्षा असा होतो. कारण त्या वाक्यांत ज्या मूळ ग्रीक शब्दाचा तर्जुमा दंड असा केला आहे, त्या शब्दाचा अर्थ ऐहिक शिक्षा असाहि आहे. १ करिं० ११:२७,२९,३०,३४.

प्र० १६. हा संस्कार कोणी द्यावा?

उ० यथायोग्य प्रकारें दीक्षित झालेल्या ह्मणजे येशू ख्रीस्ताने लावून दिल्हेल्या नेमाप्रमाणें उपदेशकाच्या कामावर नेमलेल्या ख्रिस्ती उपदेशकांनीच हा संस्कार द्यावा. कारण जेव्हां ते या कामावर योग्य रीतीने नेमलेले असतां हा संस्कार देतात तेव्हां ते ख्रीस्ताने त्यांस दिल्हेल्या अधिकाराने व ख्रीस्ताच्या वतीने हा संस्कार देतात असें आहे.

प्र० १७. प्रभुभोजनाचा संस्कार देतांना काय काय करावें?

उ० (१) प्रार्थना करण्याने ती भाकर पवित्र करणें ह्मणजे ह्या संस्कारासाठीं वेगळी करणें आणि मग ती मोडून मंडळींतल्या सर्वांस वांटून देणें. (२) तसेंच तो द्राक्षारस प्रार्थना करण्याने पवित्र करणें आणि मग तो ओतून मंडळींतल्या सर्वांस वांटून देणें. (सूचना.—प्रभूच्या भोजनांत श्रोते वर्गांतील लोकांस द्राक्षारस न देतां केवळ भाकर मात्र देण्याची जी रीत रोमनक्याथोलिक वगैरे बिघडलेल्या ख्रिस्ती मंडळ्यांत चालत आहे ती अगदीं शास्त्राविरुद्ध आणि दूषणीय आहे.) आणि (३) शेवटीं ईश्वराच्या स्तुतीचें गीत गाणें; ह्या तीन मुख्य गोष्टी करावयाच्या आहेत. तथापि जसा शाब्बाथ दिवसाच्या नैमित्तिक उपदेशाच्या समाप्तीस आशीर्वाद देण्याची रीत आहे, तसा आशीर्वाद हा संस्कार आटोपल्यावर देण्याने समाप्ति करावी हेंहि योग्य आहे. मार्थी २६:२६–३०.

प्र० १८. कोणत्या अंगस्थितीने प्रभूचें भोजन घ्यावें?

उ० तें कोणत्याहि अंगस्थितीने घेतल्यास हरकत नाहीं. तथापि तें भोजन बसून घ्यावें हें आह्मास नीट दिसतें. कारण आह्मी आपलें नित्याचें भोजनहि बसूनच घेत असतों. रोमनक्याथोलिक वगैरे बिघडलेले ख्रिस्ती लोक ह्या संस्कारांत घेतलेली भाकर ही ख्रीस्ताचें खरोखर शरीर आहे, असें मानून त्या भाकरीचें भजन करण्यासाठीं गुडघे टेंकून हें भोजन घेतात, हें फार अयोग्य आहे. परंतु प्रातेस्तांट ह्मणजे सुधारलेले ख्रिस्ती यांच्या कित्येक मंडळ्यांतील लोक गुडघे टेंकून हा संस्कार घेतात, ते त्या भाकरीचें किंवा द्राक्षारसाचें भजन करण्यासाठीं गुडघे टेंकितात असें अगदीं नाहीं, हें आह्मास माहीत आहे.

तथापि कोणास गैरसमज न होण्यासाठीं, तेहि गुडघे टेकून प्रभूचें भोजन घेण्याची रीत सोडून, बसून तें भोजन घेण्याची रीत धरतील तर बरें होईल असें आह्मास वाटतें.

प्र० १९. दिवसाच्या कोणत्या समयीं हा संस्कार करावा?

उ० हा संस्कार दिवसाच्या अमुकच समयीं करावा असें शास्त्रांत सांगितलें नाहीं. ह्मणून दिवसाच्या कोणत्याहि समयीं करण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु पहिलें प्रभूचें भोजन जें ख्रीस्तानें स्वतां आपल्या शिष्यांस दिल्हें तें रात्रीं झालें, ह्मणून आतां सर्व ख्रिस्ती मंडळ्यानी हा संस्कार रात्रींच केला पाहिजे असें कोणी कोणी ह्मणतात. त्यांस आमचें विचारणें आहे कीं पहिलें प्रभूचें भोजन रात्रीं झालें ह्मणूनच आतां सर्व मंडळ्यानीं हा संस्कार रात्रीं पाळावा असें जर ह्मणतां, तर मग हा संस्कार वर्षांतून केवळ एकदां व पहिल्या ह्मणजे अबीब महिन्याच्या चतुर्दशीस माडीवर आणि आडे घेऊन घेतला पाहिजे असें कां ह्मणूं नये? कारण कीं पहिलें प्रभूचें भोजन याच रीतीनें घेतलें गेलें होतें. परंतु हा संस्कार करण्याविषयींची जी आज्ञा प्रभूनें दिल्ही, तींत त्यानें इतकेंच सांगितलें आहे कीं, "जितकेदां तुह्मी हें कराल तितकेदां माझ्या आठवणीसाठीं करा." यांत अमुकच दिवशीं किंवा अमुकच समयीं करा असें कांहीं सांगितलें नाहीं. ह्मणून ज्या मंडळीस जो समय सोईवार वाटेल त्या समयीं त्या मंडळीनें हा संस्कार करावा असा अधिकार प्रत्येक मंडळीस आहे. यास्तव जसा रात्रीचा समय तसा

दुपारचा किंवा सकाळचा समयहि या संस्कारास योग्य आहे.

प्र० २०. वर्षांतून कितीदां हा संस्कार करावा?

उ० याविषयींहि शास्त्रांत कांहीं नेम करून सांगितलें नाहीं. हा संस्कार करण्याविषयीं शास्त्रांत जें कांहीं सांगितलें आहे, त्यावरून पाहतां असें दिसतें कीं प्रभूच्या मरणाची आठवण योग्य प्रकारें होऊन राहण्यासाठीं जितकें वारंवार हा संस्कार करणें अगत्य आहे तितकें वारंवार आह्मी हा संस्कार करावा असी प्रभूची इच्छा आहे.

---

## प्रकरण ३१.

## मंडळीची व्यवस्था.

प्र० १. मंडळीच्या व्यवस्थेविषयींचे नेम कोठून कळतात?

उ० ह्या व्यवस्थेविषयींचे नेम केवळ पवित्र शास्त्रावरून समजतात. ज्या देशांत अमुक मंडळी आहे त्या देशांतील सरकारी अधिकाऱ्यानीं मुलखी ह्मणजे राजकीय व्यवस्थेविषयीं आपल्या तर्कानें केलेले कायदे जरी मंडळींतल्यानीं व्यवहारिक गोष्टींमध्यें मानले पाहिजेत, तरी मंडळीच्या धर्मसंबंधी व्यवस्थेविषयींचे नियम करण्याचा अधिकार सरकारी अधिकाऱ्यांकडे नाहीं. आणि मंडळींतील अधिकाऱ्यानींहि मंडळीच्या व्यवस्थेविषयींचे नियम आपल्याच तर्कानें करून चालवूं नये. परंतु केवळ शास्त्रांत सांगितलेल्या नेमांप्रमाणें त्यानीं मंडळीची व्यवस्था चालवा-

वी. ह्या व्यवस्थेसंबंधी प्रत्येक गोष्टीचा तपशीलवार नियम शास्त्रांत सांगितला नाहीं. परंतु याविषयींचे मुख्य नियम किंवा नियमाचीं तत्वें, जीं शास्त्रांत सांगितलीं आहेत, त्यांच्या आधाराने व त्यांतील अभिप्रायास अनुसरून सर्व गोष्टींविषयींचे नियम मंडळीने किंवा मंडळीने नेमलेल्या अधिकाऱ्यानीं ठरवावे, आणि त्यांप्रमाणें मंडळीच्या धर्मसंबंधी सर्व गोष्टींची व्यवस्था चालवावी. यहे० ४३:११. मात्थी १६:१९.

प्र० २. मंडळीमध्यें कोणकोणते अधिकारी असावे?

उ० पाळक आणि कारभारी असे दोन मुख्य अधिकारी प्रत्येक मंडळीमध्यें असावे. पहिल्या काळच्या मंडळ्यांमध्यें पाळक आणि कारभारी यांशिवाय, भविष्यवादी आणि प्रेषित असे दुसरे विशेष अधिकारी होते. परंतु त्या वेळेस ख्रिस्ती शास्त्राचे कांहीं ग्रंथ लिहावयाचे होते आणि ख्रिस्ती मंडळ्यांच्या व्यवस्थेविषयींचे नियम स्थापावयाचे होते, हें करण्याकरितांच ते विशेष अधिकारी त्या वेळेस ईश्वराने लाविले होते. परंतु हें काम झाल्यावर पुढें पाळक आणि कारभारी यांवांचून दुसरे कोणीहि अधिकारी मंडळीमध्यें असण्याचें अगत्य राहिलें नाहीं. ह्मणून आतां पाळक आणि कारभारी हे दोनच अधिकारी आहेत आणि हे मंडळीमध्यें शेवटपर्यंत राहतील असें शास्त्रावरून समजतें. फिली० १:१. एफे० ४:११.

प्र० ३. प्रत्येक मंडळींतले अधिकारी निवडून घेऊन नेमण्याचा अधिकार कोणाकडे आहे?

उ० तो अधिकार प्रत्येक पृथक् मंडळीकडे आहे.

प्रे० ६:३. १५:२,२२,२३. १ करिं० १६:३. २ करिं० ८:१९.

प्र० ४. असा अधिकार मंडळीला कोणी दिल्हा?

उ० मंडळीचा राजा आणि मुख्य अधिकारी जो ख्रीस्त प्रभु त्यानेच हा अधिकार प्रत्येक मंडळीस दिल्हा आहे. यशा० ९:६,७. ३३:२२. मात्थी १६:१९. कल० १:१८. १ करिं० ११:३. एफे० ५:२३.

प्र० ५. आपले अधिकारी निवडून नेमण्याचा आणि आपल्या सर्व धर्मसंबंधी गोष्टींची व्यवस्था करण्याचा अधिकार, सत्ता आणि हक्क, जो प्रत्येक पृथक् ख्रिस्ती मंडळीस ख्रीस्तापासून मिळाला आहे, तो सोडून दुसऱ्यांस द्यावा असें करणें तिला योग्य आहे कीं काय?

उ० नाहीं, अगदीं योग्य नाहीं. कारण असें करण्याने ख्रीस्त जो मंडळीचा राजा आणि प्रभु आहे, त्याची अवज्ञा होईल.

प्र० ६. कोणी मनुष्य अमुक मंडळीचा पाळक होण्यासाठीं काय काय झालें पाहिजे?

उ० ज्या मंडळीचा पाळक तो व्हावयाचा आहे, त्या मंडळीने किंवा त्या मंडळीने नेमलेल्या पंचानी त्यास निवडून पसंत करावें, आणि त्या मनुष्याने त्यांचें पाळकपण करण्यास पत्करिल्यावर त्याला त्या कामावर नेमण्याचा संस्कार यथाविधि व्हावा; असें होण्याने तो त्या मंडळीचा पाळक स्थापिला जातो.

प्र० ७. पाळकपणाचा संस्कार कोणत्या रीतीने व कोणाकडून व्हावा?

उ० त्याला उपदेशकपणाची दीक्षा देण्याने; ह्मणजे

शुभवर्त्तमानाचे उपदेशक होण्यास यथाविधि नेमलेले उपदेशक, ज्यांस वडील ह्मटलें आहे, त्यांनीं त्याच्या मस्तकावर आपले हात ठेवून प्रार्थना करण्यानें त्याचा संस्कार करावा. १ तिम० ४:१४. प्रे० १३:२,३.

प्र० ८. शास्त्रामध्यें मंडळीच्या पाळकाला कोणतीं वेगळालीं नामें ठेविलीं आहेत? आणि असीं वेगळालीं नामें ठेवण्याचें कारण काय?

उ० त्याच्या हुद्याचीं वेगळालीं कर्त्तव्यकामें दाखविण्यासाठीं पाळक, अध्यक्ष, सेवक, पाहेरकरी, वडील, शिकविणारा, कारभारी, आणि वकील, असीं वेगळालीं नावें त्यांस ठेविलीं आहेत. ह्मणजे मंडळींतल्यांस शास्त्रसंबंधी आत्मिक अन्न चारण्याचें काम त्याकडे आहे ह्मणून त्याला पाळक ह्मटलें आहे. अणखी मंडळींतल्यांची व्यवस्था व देखरेख करण्याचें काम त्याकडे आहे ह्मणून त्याला अध्यक्ष ह्मटलें आहे. अणखी मंडळींतल्यांची शुभवर्त्तमानसंबंधी सेवा करणें त्याकडे आहे ह्मणून त्यास सेवक ह्मटलें आहे. आणि मंडळींतल्यांचें रक्षण व कल्याण साधण्यासाठीं त्याला जी हुशारी व सावधगिरी ठेवायाची आहे, तिजवरून त्याला पाहेरकरी ह्मटलें आहे. आणि धर्मसंबंधी आचरणाचा यथायोग्य आणि पोक्त असा कित्ता त्यानें घालून दाखविला पाहिजे, ह्मणून त्याला वडील ह्मटलें आहे. आणि मंडळींतल्या मनुष्यांस धर्म शिकविण्याचें काम त्याकडे आहे ह्मणून त्याला शिकविणारा ह्मटलें आहे. आणि ईश्वरीशास्त्ररूप धनाची व देवाच्या अनेक प्रकारच्या कृपेची व्यवस्था करणें त्याकडे आहे ह्मणून त्यास कारभारी ह्मटलें आहे. आणि ईश्वराच्या बंडखोर व अपराधी प्रजेस समेट

आणि शांति यांविषयींचें शुभवर्त्तमान गाजविण्यासाठीं ईश्वराने त्यांस नेमून पाठविलें आहे, ह्मणून त्याला वकील ह्मटलें आहे. १ तिम० ३:१. इब्रीं० ३:१५. १करिं०४:१. यहे० ३:१७. १ पे० ५:१. एफे०४:११. २ करिं० ५:२०.

**प्र०** ९. ख्रिस्ती उपदेशकांचीं शुभवर्त्तमानाच्या सेवेसंबंधी मुख्य कामें कोणतीं?

उ० शास्त्राचा उपदेश करणें, प्रार्थनेमध्यें पुढारी होणें, बाप्तिस्मा व प्रभूचें भोजन हे संस्कार करणें, लग्न लावणें, लौकिक भजनाच्या प्रसंगांशिवाय दुसऱ्या वेळेसहि मंडळींतल्या मनुष्यांस आणि विशेषेंकरून त्यांच्या लेंकरांस धर्मसंबंधी गोष्टी शिकविणें, दुखणाईतांचा समाचार घेणें आणि मेलेल्यांची उत्तरक्रिया करणें, आणि मंडळींतल्यांचें धार्मिकपण वाढण्यासाठीं जे उपाय करावयाचे आहेत, ते सर्व करणें; हीं त्यांचीं मुख्य कामें आहेत. २ तिम० ४:२.

**प्र०** १०. जो मनुष्य ज्या मंडळीचें पाळकपण करितो त्याला त्या मंडळीपासून आपल्या उपजीविकेसाठीं नेमस्त वेतन घेण्याची सत्ता आहे कीं काय?

उ० होय निश्चयें आहे. आणि त्याच्या उपजीविकेसाठीं जें कांहीं मंडळी त्याला देती तें धर्म किंवा दान आहे असें मंडळीने समजूं नये, परंतु तें त्याच्या श्रमाचें यथान्याय व वाजवी वेतन आहे असें समजावें, आणि तें त्याला योग्य वेळेस देण्यास आपण त्याचे ऋणी आहों असें ध्यानांत ठेवावें. कारण मंडळीच्या पाळकाचें पोषण मंडळींतल्यानीं करावें असी ईश्वराची आज्ञा आहे, आणि जे पाळकाच्या

श्रमांचा उपभोग घेतात त्या सर्वांनी त्याचें वेतन देण्यामध्येंहि भागीदार व्हावें, हें आपल्या विवेकास योग्य दिसतें. यास्तव मंडळींतले जे कोणी हें कर्त्तव्य कर्म पूर्ण करण्यास अमान्य होतात, ते दोषी ठरतात. मात्थी १०:९, १०. १ करिं० ९:७,११, १४. १ तिम. ५:१८. गला. ६:६.

प्र० ११. जे मंडळीचे कारभारी व्हावयाचे आहेत त्यांची त्या कामाविषयीं दीक्षा व्हावी कीं काय?

उ० होय जे कोणी ह्या कामासाठीं मंडळीकडून निवडलेले आहेत, त्यांच्या मस्तकावर त्या मंडळीच्या पाळकाने आपले हात ठेवून प्रार्थना करण्याने त्यांस कारभाऱ्यांच्या हुद्याविषयींचा संस्कार करावा. प्रे० ६:२,६.

प्र० १२. मंडळींतल्या कारभाऱ्यांचीं मंडळीसंबंधी विशेष कामें कोणतीं?

उ० त्यांनी प्रभूच्या भोजनांत भाकर आणि द्राक्षारस हीं मंडळींतल्यांस वांटावीं, मंडळीच्या धर्मक्रिया चालविण्यासाठीं अथवा गरिबांच्या पोषणासाठीं, अथवा मंडळीसंबंधी दुसऱ्या कोणत्याहि कामासाठीं जें द्रव्यदान येतें, तें जमा करून ठेवावें, आणि मंडळीसंबंधी जीं व्यवहारिक कामें करावयाचीं असतील, तीं सर्व करावीं; आणि मंडळीची व्यवस्था करण्याच्या कामामध्यें पाळकाचें साह्य करावें. हींच कारभाऱ्यांचीं विशेष कामें आहेत.

प्र० १३. मंडळीच्या धर्मसंबंधी व्यवस्थेविषयीं जे नियम ख्रीस्ताने लावून दिल्हे आहेत, ते अमलांत आणण्याचा अधिकार कोणाकडे आहे?

उ० समस्त मंडळीकडे अथवा ज्या पंचांस मंडळी हें

काम करण्यास नेमून ठेविले त्यांकडे आहे. मात्थी १६:१९. १८:१५. १७.

प्र० १४. मंडळींतील काम काजाच्या ठरावामध्यें मंडळींतील स्त्रियांचें सम्मत घेणें योग्य आहे कीं, काय?

उ० नाहीं, हें काम मंडळींतील पुरूषांचेंच आहे, असें शास्त्रांतील बोधावरून, यहूदी व्यवस्थेंतील मंडळीच्या वहिवाटीवरून, आणि ख्रीस्ताच्या व प्रेषितांच्या काळच्या ईश्वरी भक्तांच्या वहिवाटीवरून, आणि तेव्हांपासून आजपर्यंत ज्या चांगल्या भक्तिशील मंडळ्या होत आल्या, त्यांच्याहि वहिवाटीवरून दिसून येतें. आणि सर्व सुधारलेल्या राज्यांतील राजकीय ठरावांविषयींहि हीच रीत चालत आहे. तथापि जरी मंडळींतील कामकाजाच्या ठरावांमध्यें मंडळींतील स्त्रियांची संमति घेणें योग्य नाहीं, तरी त्या कामाविषयीं जी कांहीं मसलत त्यांस देतां येईल, ती तो ठराव करणाऱ्यानीं त्यांपासून ऐकून घ्यावी. आणि त्या कामाविषयीं जो ठराव मंडळी करिती तो कसा काय आहे हें त्यांस समजूं द्यावें आणि तसा ठराव करण्याचीं कारणेंहि त्यांस समजवावीं. आणि हें सर्व करितांना त्यांची योग्य भीड व मर्यादा राखावी आणि त्यांसीं ममतेने वर्त्तावें हें अवश्य आहे. १ करिं० १४:३४,३५. १ तिम० २:११,१२.

प्र० १५. मंडळीसंबंधी सर्व कामकाजाचा ठराव किती जणांच्या संम्मतीने करावा?

उ० मंडळीसंबंधी हरएक ठराव मंडळींतल्यांच्या बहुमताप्रमाणें ह्मणजे अधिक पक्षाच्या मताप्रमाणें करावा. तथापि मंडळीमध्यें फूट न होतां हरएक गोष्टीविषयीं स-

र्वांचें एक चित्त व एक मत होईल असी तजवीज करीत जावी.

प्र० १६. सदरहु ठराव होतांना अल्प पक्षाचे लोक ज्यांची त्या ठरावास सम्मति नाहीं, त्यांनीं कसी मनोवृत्ति धरावी?

उ० त्यांनी उगाच दुराग्रहानें किंवा स्वमताभिमानानें कशाविषयींहि असम्मति होऊं नये, परंतु जें आपणांस खरोखर अयोग्य वाटतें त्याविषयींच मनोभावानें, प्रीतीनें आणि नम्रतेनें आपली असम्मति द्यावी. आणि आपणांस जें अयोग्य वाटलें तें योग्य आहे असें कोणी दाखवून देऊं लागल्यास, त्याचीं प्रमाणें ऐकून घ्यावीं आणि त्याकडून खातरी झाल्यास आपलें पहिलें मत सोडून जें योग्य दिसतें त्याविषयीं सम्मति देण्यास मान्य असी बुद्धि नेहमी धरावी. मंडळींतल्या सर्वांनीं असी बुद्धि धरल्यास बहुत अनर्थ निवारण होतील.

प्र० १७. जे कोणी मंडळींत मिळावयास इच्छितात ते मंडळींत मिळण्यास योग्य आहेत किंवा नाहींत, याविषयीं त्यांची परीक्षा पाहून जे योग्य दिसतील त्यांस घ्यावें आणि जे अयोग्य दिसतील त्यांस वर्ज करावें, हें मंडळीस योग्य आहे कीं काय?

उ० होय, निस्संशय योग्य आहे. कारण ख्रीस्तानें मंडळीला तसा अधिकार दिल्हा आहे, आणि असें करण्याविषयीं त्याची स्पष्ट आज्ञाहि आहे. या गोष्टीविषयीं मंडळीहि ख्रीस्ताची प्रतिनीधि असी या जगांत आहे. १ योहा. ४:१.

प्र० १८. जे मंडळींत मिळण्यास इच्छितात त्यांची

परीक्षा मुख्यत्वेंकरून कशाविषयीं आणि कोणी पाहावी?

उ० मंडळींतल्या सर्व मनुष्यांनीं अथवा हें काम करण्यासाठीं ज्यांस मंडळीने नेमिलें आहे, त्यांनी मंडळींत मिळण्यास इच्छिणाऱ्यांची परीक्षा पाहतांना, त्यांस शास्त्रांतील मुख्य सिद्धांत समजतात किंवा नाहीं, आणि त्यांच्या ठायीं खरें धार्मिकपण आहे किंवा नाहीं; ह्मणजे ते शास्त्रांतील बोधाप्रमाणें भावना धरून नीट चालावयास झटतात किंवा नाहीं, याविषयीं मुख्यत्वेंकरून त्यांची परीक्षा पाहावी. आणि ज्याला शास्त्रांतील मुख्य सिद्धांतांचा चांगला समज आहे व ज्याच्या भावना त्यांप्रमाणें आहेत, त्यालाच मंडळींत घेण्यास पसंत करावें, आणि जो असा नाहीं त्यास मंडळींत घेऊं नये; कारण तशाला मंडळींत घेण्याने त्याचा कांहीं लाभ नाहीं, परंतु त्याची व दुसऱ्यांची मोठी हानी मात्र होण्याजोगी आहे. तथापि जे विश्वासांत अशक्त त्यांस वागवून घेण्याच्या बुद्धीने स्वीकारावें. १ पेत्र० ३:१५. रोम० १४:१.

प्र० १९. जे मंडळींतले आहेत ते परस्परांचीं कोणतीं कर्त्तव्यें लागतात?

उ० त्यांनी एकमेकांच्या हिताविषयीं नेहमीं जपणी करावी. आणि जेव्हां कोणी वावगा चालतो, तेव्हां नम्रतेने व प्रीतीने त्यास बोध करून त्याच्या चुकीविषयीं त्यास निषेधावें, आणि एकमेकांच्या सद्गुणांची वृद्धि व परस्परांचें हित साधण्याविषयीं झटत जावें. हींच त्यांचीं परस्परांसीं कर्त्तव्यें आहेत. १ तिम० ५:२०. गल० ६:१.

प्र० २०. मंडळींतल्या मनुष्यांस मंडळीने कोणत्या कारणावरून शिक्षा लावावी?

उ० जेव्हां ते कांहीं पाखांड मतें धरितात किंवा शास्त्रांतील नेमांविरुद्ध वर्त्तणूक करितात तेव्हां मंडळीने त्यांची चौकशी करून त्यांच्या अपराधाप्रमाणें त्यांस शिक्षा लावावी. १ करिं. ५:११. तित. ३:१०.

प्र० २१. मंडळींतले जे वावगे चालतात त्यांच्या शिक्षेविषयींचा कांहीं विशेष नेम ख्रीस्ताने लावून दिल्हा आहे कीं काय?

उ० होय. मात्थी १८:१५–१७ यांत सांगितलें आहे कीं, "तुझ्या भावाने तुझा अन्याय केला तर जा, तूं व तो एकांतीं असतां त्याचा दोष त्याला सांग. त्याने तुझें ऐकिलें तर त्वां आपल्या भावाला आपलेंसें केलें आहे. परंतु त्याने न ऐकिलें तर तूं अणखी एकदोघांस आपल्या बरोबर घे, दोन किंवा तीन साक्ष्यांच्या तोंडाने प्रत्येक गोष्ट ठरवावी ह्मणून. आणि त्याने त्यांचें न ऐकिलें तर मंडळीला कळीव, आणि त्याने मंडळीचेंहि न ऐकिलें तर मूर्त्तीपूजक किंवा जकातदार यासारिखा त्याला मान.

प्र० २२. सदरहु नेम हरएक प्रकारच्या अपराधाविषयीं व अन्यायाविषयीं लागू आहे कीं काय?

उ० हा नियम मुख्यत्वेंकरून परस्परांच्या घरगुती अपराधांविषयीं सांगितला आहे खरा. तरी या नियमाचा मुख्य अभिप्राय दुसऱ्या सर्व अपराधांसहि लागू आहे. ह्मणजे जेव्हां मंडळींतील कोणी कांहीं लौकिक अपराध करितो, तेव्हां त्याची चौकशी करून त्यास शिक्षा लावायाचा क्रम या नियमाच्या अभिप्रायाप्रमाणेंच व्हावा. ह्मणजे बोध करणें, निषेध करणें, आणि मंडळींतून दूर करणें ह्याच त्याच्या शिक्षेच्या पायऱ्या असाव्या. आणि

मंडळीने किंवा मंडळीने नेमलेल्या धर्माधिकाऱ्यानी कोणी मनुष्यास धर्मसंबंधी अपराधाबद्दल शारीरिक शिक्षा कधीं लावूं नये; ह्मणजे शरिरावर फटके मारणें, कैदेंत घालणें किंवा पैक्याचा दंड करणें इ० प्रकारच्या शिक्षा कधीं करूं नये. मंडळींतल्या शिक्षा ह्या नेमांत सांगितल्याप्रमाणें केवळ आत्मिक आणि मानसिक असाव्या.

प्र० २३. धर्मसंबंधी अपराधाच्या शिक्षेकरितां मंडळींतून दूर करणें याचे कांहीं प्रकार आहेत कीं काय?

उ० होय. सस्पेंड करणें ह्मणजे मंडळींतल्या संस्कारापासून अल्प काळपर्यंत दूर ठेवणें, आणि धर्मबहिष्कृत करणें, ह्मणजे मंडळींतील संस्कारापासून अगदीं दूर करून त्यांस विधर्म्याप्रमाणें मानणें, असे दोन प्रकार आहेत. जो मोह किंवा परीक्षा लागून पापांत पडलेला असतां, मंडळीसमोर आपलें पाप कबूल करून तें सोडण्याची व सुधारला जाण्याची इच्छा दाखवितो, त्याला त्याची परीक्षा पाहण्यासाठीं सस्पेंड करावें. आणि जो पापांत पडला असतां त्याविषयीं कबूल होत नाहीं, किंवा कबूल झाला तरी तें सोडून सुधारला जाण्याची बुद्धि दाखवीत नाहीं, आणि पूर्वीप्रमाणें किंवा त्याहून अधिक अपराध करीत जातो, त्याला धर्मबहिष्कृत करावें. धर्मबहिष्कृत करणें हीच मंडळींतील सर्वांहून मोठी शिक्षा आहे. याहून मोठी शिक्षा मंडळीच्याने कोणास लाववत नाहीं. १ करिं० ५: ४,५. १ तिम० १:२०.

प्र० २४. ज्यास धर्मबहिष्कृत केलें आहे, त्यासीं मंडळींतल्यानीं कसें वागावें?

उ० त्यानीं त्यासीं धर्मसंबंधी गोष्टींत कांहीं भागीपणा

घेऊं नये असें केवळ नव्हे पण व्यवहारिक व प्रपंचिक गोष्टींत देखील त्यासीं मोठी मैत्री किंवा स्नेह राखूं नये आणि अति सलगीचा सहवास त्याबरोबर करूं नये. तथापि त्याचें कल्याण इच्छून त्याला सुधारण्यास आणि त्याचें कल्याण करण्यास आपणाकडून होईल तितके प्रयत्न करावे हें योग्य आहे. परंतु साधारण व्यवहारसंबंधी कामधंद्यामध्यें व सरकारी कामकाजामध्यें व कुटुंबांतील कामामध्यें व स्वाभाविक संबंधामध्यें जो सहवास करणें अगत्य आहे, तो धर्मबहिष्कृत झालेल्यासीं असें केवळ नव्हे परंतु जो मुळींच विधर्मी आहे, त्यासींहि करण्यास कांहीं हरकत नाहीं. १ करिं० ५:९–१३.

प्र० २५. जे कोणी आपल्या अपराधामुळें मंडळींतून दूर केलेले आहेत, ते जेव्हां पश्चात्तापी होऊन सुधारतात, तेव्हां त्यांस पुन्हा मंडळींत घ्यावें कीं काय?

उ० होय. जर ते खरोखर पश्चात्तापी दिसतात आणि योग्य रीतीने सुधारले जाऊन मंडळींत पुन्हा मिळण्यास इच्छितात, तर त्यांनी आपल्या अपराधाचा योग्य पत्कार मंडळीसमोर करावा आणि विश्वासुपणाने व योग्य रीतीने वागण्याविषयींचा नवा करार करावा, मग मंडळीने त्यांस स्वीकारावें. २ करिं० २:६–८.

प्र० २६. मंडळींतल्या ज्या मनुष्याने आपला अपराध केला किंवा दुसरें कांहीं पाप केलें आहे, त्याला अद्याप योग्य शिक्षा लागली नाहीं आणि प्रभूच्या भोजनांत येतो, ह्मणून त्यामुळें आपण प्रभूच्या भोजनास जाणें वर्ज करावें असें करणें कोणी ख्रिस्ती मनुष्यास योग्य आहे कीं काय?

उ० नाहीं, असें करणें अगदीं अयोग्य आहे. कारण

असें करण्याविषयीं कांहीं शास्त्राज्ञा किंवा उदाहरण नाहीं. आणि विचार करून पाहिलें असतां उघड दिसतें कीं आह्मी प्रभूच्या भोजनांत जें सहभोजन करितों, तें मंडळींतील कोणीएकासीं अथवा अमुकजनासींच आहे असें नाहीं. तर तें समग्र दृश्य मंडळीसीं आहे. यास्तव त्या मंडळीमध्यें कोणीएक किंवा अमुकजन वावगे चालणारे असल्यावरून सर्व मंडळीसीं व ख्रीस्त प्रभूसीं सहभोजन करणें वर्जावें हें अयोग्य आहे.

प्र० २७. ज्याने कोणाचा अपराध केला आहे त्याने प्रभूच्या भोजनास येण्यापूर्वीं काय करणें अवश्य आहे?

उ० ज्याचा अपराध त्याने केला आहे त्याजवळ जाऊन त्याने आपला दोष कबूल करावा आणि आपण त्याविषयीं पश्चातापी झालों आहें असें दाखवून त्यापासीं क्षमा मागावी. असें केल्यावांचून जर तो प्रभूच्या भोजनास येतो तर तो प्रभूचें भोजन घेण्याने आशीर्वाद नव्हे, शाप मात्र आपणावर आणील. याको० ५:१६.

प्र० २८. ज्याने अपराध केला तो जर याप्रमाणें पश्चात्तापी होऊन क्षमा मागतो तर ज्याचा अपराध त्याकडून झाला होता त्याने काय करावें?

उ० जर तो खरा पश्चात्तापी दिसतो तर त्याची क्षमा करून त्याने आपला अपराध केला नसल्यासारिखें पुढें त्यासीं वागावें. मात्थी १८:२१,२२.

प्र० २९. जी धर्मसंबंधी शिक्षा मंडळींतल्या मनुष्यास लावायाची आहे तिचा हेतु काय आहे?

उ० अपराध्यांस वाटेवर आणणें, मंडळीचा अपवाद दूर करणें आणि मंडळींतील दुसऱ्यांस पापाची भीति

वाटून ते अपराध न करीत असें करणें, हाच तिचा हेतु आहे. आणि जर ही शिक्षा यथायोग्य प्रकारें करण्यांत आली तर येणेंकडून ज्याने अपराध केला त्याचें असें केवळ नाहीं पण सर्व मंडळीचें समाधान, पवित्रीकरण, आणि सुवृद्धि होईल. १ करिं० ५:५.

---

## प्रकरण ३२.

## वर्षसहस्रक.

प्र० १. वर्षसहस्रक ह्मणजे काय?

उ० असा काळ यावयाचा आहे कीं, त्यामध्यें ईश्वराच्या भक्तांची या पृथ्वीवरील मंडळी सर्वांहून मोठी समृद्धि आणि सुख पावेल, आणि पृथ्वींतील सर्व प्रजा ह्मणजे सर्व राष्ट्रें आणि वंश हे येशू ख्रीस्ताकडून आशीर्वादित होतील, आणि मंडळीची ही चढती कळा, ह्मणजे भरभर हजार वर्षांपर्यंत सतत राहील, त्या काळास वर्षसहस्रक ह्मटलें आहे.

प्र० २. असलें वर्षसहस्रक होईल हें कशावरून समजलें आहे?

उ० त्याविषयीं शास्त्रांत उघड आणि स्पष्ट असीं जीं अनेक भविष्यवचनें आहेत, त्यांवरून समजलें आहे. प्रग० ११:१५. २०:२,३. गीत २:८. ७२:८–११. यशा० २:२. मला० १:११. दानि० २:३४,३५.

प्र० ३. या वर्षसहस्रकांत कोणत्या विशेष गोष्टी घडतील?

उ० (१) ह्या काळामध्यें मनुष्यांवर पवित्र आत्म्याची

विपूळ वृष्टि होईल; (२) आणि आत्मिक प्रकाशाची आणि ईश्वरी ज्ञानाची मोठी वृद्धि होऊन मानसिक अंधार आणि भ्रम यांचा क्षय होईल. (३) मनुष्यांमध्यें सर्वत्र मोठी प्रीति स्नेह आणि शांति होईल. (४) धर्मसिद्धांत, कर्त्तव्यकर्मै, संस्कार आणि आचरण, यांविषयीं सर्वांची मोठी सम्मति होईल. (५) भक्तांमध्यें मोठें स्वनियमन, आनंद आणि सत्सुखभोग, हे फार होतील. (६) जमीन भरपूर पीक देईल, आणि पृथ्वी मनुष्यांनी फार भरेल आणि तीं सर्व मनुष्यें शुभवर्त्तमानांत सांगितलेल्या आज्ञांप्रमाणें मोठ्या आवडीने आणि अगत्यवादाने चालतील. (७) आणि पृथ्वींतील सर्व मनुष्यें किंवा निदान सर्व राष्ट्रें व वंश तरी ईश्वराकडे फिरतील आणि ख्रीस्त येशूवर विश्वास ठेवून तारण पावतील. ह्या विशेष गोष्टी त्या काळांत होतील. यशा० २:४. ११:६–९. २५:६,७. ३०:२३. ३३:२४. ४४:३,४,५. ५५:१२. इर्म० ३१:३४. एफे० ४:५, १३,१५. जख० ८:१२. अणखी दुसऱ्या प्रश्नाखालीं लिहिलेलीं वाक्यें पाहावीं.

प्र० ४. ज्या काळामध्यें ख्रीस्त प्रभु हा पहिल्या पुन्हा उठण्यांतील भक्तांसहवर्त्तमान ह्या जगांत राज्य करील ह्मणून सांगितलें आहे, तो हाच काळ आहे कीं काय?

उ० होय, तो हाच काळ आहे. परंतु त्या काळीं ख्रीस्त पहिल्या पुन्हा उठण्यांतील लोकांसहवर्त्तमान ह्या जगामध्यें राज्य करण्यासाठीं आपण मूर्त्तीमंत ह्या पृथ्वीवर पुन्हा उतरून एथें राहील असें समजणें योग्य नाहीं. कारण पृथ्वीवरील राहणाऱ्या मनुष्यांबरोबर अशा रीतीने राहण्यासाठीं ख्रीस्ताला आपली गौरवी स्थिति सोडून,

ह्मणजे ज्या आकाशिक तेजाने आणि वैभवाने युक्त हो- त्सातां तो आतां आकाशांत राहतो, तें सोडून देऊन, पुन्हा मर्त्य व अशक्त असी मनुष्यप्रकृति धारण करावी लागेल. कारण कीं जर तो आपल्या गौरवी स्थितींत पृथ्वीवर येऊन राहील, तर कोणी मनुष्याच्याने त्याजकडे पाहवणार देखील नाहीं, तर मग त्याजबरोबर सहवास करणें दूरच आहे. परंतु तो आपलें आकाशिक गौरव व वैभव सोडून पुन्हा मर्त्य व अशक्त असी मानवी प्रकृति धारण करील, असें समजण्यास कांहींच आधार नाहीं. आणि त्याच्या गौरवी स्थितीने त्याने या पृथ्वीवर आपल्या जगवासी भक्तांबरोबर राज्य करावें, हें तर अगदीं असं- भव्य आहे. ह्मणून त्या काळचें त्याचें पृथ्वीवर येऊन राहणें हें आत्मिक अर्थाचें आहे असें समजलें पाहिजे. ह्मणजे त्या सहस्र वर्षांपर्यंत तो कांहीं विशेष प्रकारें आप- ल्या आत्म्याकडून आपल्या भक्तांच्या अंतःकरणांत वस्ती करील. आणि त्यांमध्यें आपलें राज्य कांहीं विशेष प्रकारें चालवील, असें समजलें पाहिजे. आणि यावरूनच अनु- मान होतें कीं, तें पहिलें पुन्हा उठणेंहि आत्मिक अर्था- चेंच आहे. ह्मणजे त्या काळीं जे ह्या पृथ्वीवर राहतील त्यांमध्यें धर्माचें मोठें संजीवन होऊन, मंडळीची फार मोठी संमृद्धि, पवित्रता आणि सुखोत्पत्ति होऊन राहील. आणि जसा योहान्न बाप्तिस्मा करणाऱ्यास एलीयाचा आ- त्मा होता ह्मणून ह्मटलें आहे, तसा पुरातन काळचे मार्टर्स ह्मणजे धर्मासाठीं आपला प्राण देणारे यांची बुद्धि त्या सहस्रकाच्या काळच्या ख्रिस्ती मनुष्यांच्या ठायीं दिसून येईल. आणि जे सद्भक्त पूर्वीं मरण पावले, त्यांची बुद्धि

त्या सहस्रकाच्या काळच्या भक्तांच्या ठायीं दिसून येईल, हें सुचविण्याच्या हेतूनेच त्या सहस्रकाच्या काळच्या भक्तांस, पूर्वींचे पुन्हा उठलेले भक्त असें ह्मटलें असावें असें दिसतें. प्रग० २०:४–६.

प्र० ५. त्या सहस्रकाच्या काळचे सर्व ख्रिस्ती लोक पूर्ण पवित्र ह्मणजे अगदीं निष्पाप होतील कीं काय?

उ० असें नाहीं. कारण कीं "पाप करीत नाहीं असा कोणी मनुष्य ह्या पृथ्वीवर नाहीं," हें ह्मणणें जसें आतांच्या सर्व मनुष्यांस तसें सहस्रकाच्या काळच्या सर्व मनुष्यांसहि लागू होईल. तथापि त्या काळीं पृथ्वीवर हल्लींपेक्षां फार कमी पाप होईल यांत कांहीं संशय नाहीं. उप० ७:२०.

प्र० ६. जसीं हल्लीं तसीं सहस्रकाच्या काळांतहि मनुष्यांचीं लेंकरें पतित आणि भ्रष्ट असीं जन्मतील कीं काय?

उ० होय, कारण कीं सर्व मनुष्य संतानानी आपल्या वडिलांच्या स्वभावाचें व्हावें, हा ईश्वराचा साधारण नेम जसा आतांच्या लेंकरांस तसा सहस्रकाच्या काळच्या लेंकरांसहि लागू आहे. योहा० ३:६. ईयो० १४:४.

प्र० ७. त्या सहस्रकाच्या काळामध्यें सद्भक्तांस कांहीं दुःख किंवा कष्ट लागतील कीं काय?

उ० होय, सर्व ईश्वरी भक्तांस कांहींना कांहीं तरी कष्ट व दुःखें या जगांत लागतील. कारण कीं ह्या परीक्षेच्या अवस्थेंत मनुष्यास दुःख संकटें लागल्यावांचून राहणें असंभव्य आहे, असें दिसतें. ईयो० १४:१.

प्र० ८. त्या काळामध्यें शुभवर्त्तमानाचा उपदेश करणें आणि ख्रिस्ती संस्कार करणें याचें कांहीं अगत्य राहील कीं काय?

उ० होय, राहील यांत काय संशय? कारण जसें आतां तसें सहस्रकाच्या काळांतहि शुभवर्त्तमानाचा उपदेश हाच मनुष्याचीं मनें फिरविण्याचें व त्यांची पवित्रता होण्याचें मुख्य साधन होईल. आणि बाप्तिस्मा हा जसा आतां तसा तेव्हांहि ईश्वराच्या मंडळींत मिळण्याचा दृश्य शिक्का असा होईल. आणि प्रभूचें भोजन हें जसें आतां तसें तेव्हांहि ईश्वराच्या कृपेच्या कराराचा शिक्का असा घेणें योग्य होईल. कारण ख्रीस्ताच्या दुसऱ्या येण्यापर्यंत ह्मणजे तो शेवटील न्याय ठरविण्यास येईल तोंपर्यंत हा संस्कार मंडळीने पाळावा असा नेम त्याने लावून दिल्हा आहे. मात्थी २८:१९. १ करिं० ११:२६.

प्र० ९. ह्या सहस्रकाचा काळ केव्हां आरंभेल?

उ० जेव्हां ईश्वराच्या कृपादानाचीं साधनें सर्वत्र पुरतेपणीं करण्यांत येतील आणि ईश्वराच्या साह्याने तीं सफळ होतील तेव्हां तो काळ आरंभेल. अमुकच दिवशीं किंवा अमुकच महिन्यांत किंवा अमुकच वर्षीं तो काळ आरंभेल, असें शास्त्रांत कोठें सांगितलें नाहीं. तथापि दानियेल भविष्यवादी आणि योहान्न प्रेषित यांच्या पुस्तकांत याविषयीं जीं भविष्यवचनें आहेत, त्यांवरून पाहतां असें अनुमान होतें कीं, कदाचित् सृष्ट्युत्पत्तीच्या सातव्या वर्षसहस्रकाच्या आरंभीं हा काळ लागेल. ह्या भविष्यवाक्यांवरून समजतें कीं, हें सहस्रक लागल्यापूर्वीं १२६० वर्षांपर्यंत ईश्वराची मंडळी रोमनक्याथोलिक लोक व मुसलमान लोक यांकडून पिडली जाईल, आणि ह्या उभयांकडून लागणाऱ्या छळणुकांचा आरंभ जसा एकाच वेळेस झाला तसा त्यांचा शेवट एकाच वेळेस होईल. ख्रि-

स्ती शकाच्या ६०६ व्या वर्षीं ह्मणजे जेव्हां फोकस बादशाहाने रोम शहरांतील बिशप ह्मणजे मुख्य पाळक यास पोप ह्मणजे सार्वत्रिक मुख्य पाळक असा स्थापिला तेव्हांपासून रोमनक्याथोलिक मत आरंभलें असें ह्मणावें. आणि महंमदाचा धर्महि त्याच काळीं सुरू झाला. आणि ६०६ यांत १२६०ही संख्या मिळविली असतां १८६६ वर्षें होतात. यास्तव जर सन ६०६ या वर्षीं तीं दोन्ही पाखंडें आरंभलीं असें समजणें योग्य आहे, तर सन १८६६ या वर्षापासून मंडळीची सुटका आणि तिच्या वैऱ्यांचा नाश यांचा आरंभ होईल, असें समजणें योग्य आहे असें दिसतें. ह्मणून सुमारें ह्याच वेळेस विधर्मी आणि यहूदी यांतले बहुत लोक ख्रिस्ती धर्मांत येतील, आणि तेव्हांपासून मंडळीच्या ऐहिक गौरवी स्थितीचा ह्मणजे त्या धन्य आणि आनंदकारक वर्षसहस्त्रकाचा आरंभ होईल असें जाणावें. सर्वांहून विख्यात टीकाकार आणि भविष्यवादांविषयीं ग्रंथ लिहिणारे यांतील बहुतेकांचें मत असेंच आहे. दानि० ७:२५. प्रग० ११:२. यहे० ३६:२४,२८. यशा० ११:१२. लूका २१:२४. रोम० ११:२५.

प्र० १०. ह्या गौरवी आणि धन्य काळाची अवधि किती होईल?

उ० बहुधा शास्त्रांतील भविष्यवाक्यांच्या शब्दाप्रमाणें एक हजार वर्षांचीच होईल असें वाटतें. परंतु भविष्यवाक्यांमध्यें बहुत ठिकाणीं एक दिवस एक वर्षाच्या ठिकाणीं धरलेला आहे, त्या मानाने पाहिल्यास आणि वर्षाचे दिवस ३६० धरल्यास तो काळ ३,६०,०००

तीन लक्ष साठ हजार वर्षांचा होईल, असें कोणाकोणास वाटतें.

प्र० ११. ह्या सहस्रकाच्या काळाची प्रवृत्ति कशानें होईल?

उ० ईश्वरभक्तांनीं त्याविषयींचीं साधनें जशीं करावीं तशीं केल्यानें आणि ईश्वराचा आशीर्वाद त्यांजवर आल्यानें ह्या काळाची प्रवृत्ति होईल.

प्र० १२. ज्या अनेक परोपकारिक मंडळ्या धर्माच्या वृद्धीसाठीं सांप्रत यत्न करीत आहेत त्यांच्या कामाचा ह्या गोष्टीसीं कांहीं संबंध आहे कीं काय?

उ० होय, त्या मंडळ्यांचे प्रयत्न ह्या गौरवी काळाच्या प्रवृत्तीचीं साधनेंच आहेत असें समजावें. पवित्रशास्त्रप्रसारक मंडळ्या, पुस्तकें आणि निबंध प्रसिद्ध करणाऱ्या मंडळ्या, मिशन मंडळ्या, शाबाथ शाळा; आणि ज्या दुसऱ्या शाळांमध्यें खरी विद्या आणि मुख्यत्वें शास्त्र शिकविलें जातें त्या सर्वांकडून ह्या गौरवी काळाच्या प्रवृत्तीची तयारी चालली आहे.

प्र० १३. ह्या सहस्रकाच्या काळाच्या समाप्तीस काय होईल?

उ० तेव्हां सैतान पुन्हा थोडा वेळपर्यंत मोकळा सोडला जाईल. आणि पुन्हा तो ईश्वराच्या भक्तांस पिडूं लागेल. परंतु त्याचा काळ फार थोडा होईल असें दिसतें. प्रग० २०:७,८.

प्र० १४. सैतानाला बांधून ठेवणें आणि त्याला मोकळा सोडणें ह्या शास्त्र वाक्यांचा अर्थ काय?

उ० हीं केवळ लाक्षणिक वाक्यें आहेत. त्यांचा अर्थ

असा आहे; जेव्हां ईश्वर सैतानाला असें आकळितो कीं, तो ईश्वराच्या भक्तांला पिडण्यापासून राहतो, तेव्हां तो बांधून ठेवला आहे, असें ह्मटलें आहे. आणि जेव्हां ईश्वर त्यास या प्रकारें आकळीत नाहीं ह्मणजे त्याला आपल्या भक्तांची पीडा करूं देतो तेव्हां तो मोकळा सोडलेला आहे, असें ह्मटलें आहे.

प्र० १५. सैतानाला पुन्हा मोकळा सोडण्याचा काळ समाप्त झाल्यावर मग काय होईल?

उ० तेव्हां जगाची समाप्ति होऊन सर्व तत्वें जळून विरघळतील आणि ख्रीस्त येशू हा मोठ्या सामर्थ्याने आणि वैभवाने प्रगट होऊन आपल्या गौरवी न्यायासनावर बसेल. आणि सर्व दूत व मनुष्यें यांचा सार्वत्रिक न्याय करून त्यांतील प्रत्येकाला यथायोग्य आणि सर्वकाळिक असें प्रतिफळ भरून देईल. अशा भयंकर आणि गौरवी गोष्टींनी ह्या जगाची समाप्ति होईल. २ पे० ३:१०. २ थेस्स० १:७–१०.

प्र० १६. ह्या सहस्रकाच्या काळाविषयीं ख्रिस्ती मनुष्यांचीं विशेष कर्त्तव्यें कोणतीं आहेत?

उ० हा काळ येण्याची उत्कंठा धरणें याची वाट पाहणें, हा येण्याविषयीं ईश्वराजवळ प्रार्थना करणें, आणि ह्याची प्रवृत्ति होण्याचीं जीं साधनें आपणास करितां येतील, तीं सर्व अगत्यवादाने आणि तत्परतेने करणें; हींच ह्या काळाविषयींचीं ख्रिस्ती मनुष्यांचीं विशेष कर्त्तव्य कर्मैं आहेत.

समाप्त.

